

# महाराष्ट्र लोक साहित्य माला





महाराष्ट्र लोक साहित्य समिति, पुणें.

# समितीचें निवेदन

महाराष्ट्र लोकसाहित्यमालेचें हें चौथें पुस्तक तिसऱ्या पुस्तकाप्रमाणेंच एका विशिष्ट विषयाला वाहिलेलें आहे. मालेच्या पहिल्या पुस्तकांत लोकसाहित्याचे प्रकार दाखविले आहेत, तर दुसऱ्यांत बव्हंशीं प्रादेशिक साहित्याचा परामर्श घेतला आहे. 'दंतकथा, दैवतकथा आणि देवताचार' हा तिसऱ्याचा विषय आहे. हा जसा सामाजिक संशोधनाभ्यासाला उपयुक्त आहे, तसाच प्रस्तुत पुस्तकांतील 'महाराष्ट्रांतील आदिवासी लोकसाहित्य' हा आहे. आज आदिवासींची भौतिक सुधारणा करण्याकडे सरकारचें जसें विशेष लक्ष लागलें आहे तसेंच त्यांचें जीवित-रहस्य उलगडून दाखविण्यासाठीं, मानववंशशास्त्रज्ञांची धडपड चालू आहे. तर या वन्यधर्मी, वनवासी (सर्व दृष्टींनीं) समाजाचें जीवनसंगीत साहित्यद्वारा ऐक-विण्याची कामगिरी कोणी रसिक वाङ्मयव्यासंगी करीत आहेत. या सर्व गोष्टींमुळें आदिवासींचा अधिकाधिक परिचय नागरी जनतेला होत आहे व त्यांच्याविषयीं जिव्हाळा वाटूं लागला आहे.

समितीचें १९५९–६० सालचें प्रकाशन कसेंतरी, कांहींतरी संमिश्र ग्रामीण गोष्टी–गाणीं हीं देण्याकडे न लावतां, एखाद्या भरीव वाङ्मय–विषयाला वाहिलेलें असावें, असें पहिल्या सभेंत ठरलें व त्यासाठीं आदिवासी लोकसाहित्याची योग्य अशीच निवड झाली. महाराष्ट्रांत अनेक आदिवासी वर्ग आहेत. तेव्हां शक्य तितक्यांची सांस्कृतिक माहिती व वाङ्मय गोळा करण्याचें अवघड काम मागच्याप्रमाणेंच सर्व सभासदांनीं मोठ्या नेटानें केलें. सभासदांखेरीज डॉ. नरेश कवडी, डॉ. विजया पुणेकर, डॉ. ल. ना. चापेकर, श्री. श्री.रा. पोतदार, श्री. र. शं. सावळे, सौ. प्रभा परुळेकर, श्री. वा. ब. कर्णिक, पं. महादेवशास्त्री जोशी, श्री. वि. वा. जोशी, (चांदा), श्री. सौ. मोहिले, श्री. उ. ब. विटेकर व श्री. शि. स. जाधव (अहमदनगर कॉलेजचे विद्यार्थी), यांनीं मोठ्या आस्थेनें आपापल्या अभ्यासाचा विषय असणाऱ्या आदिवासी जमातींचें वाङ्मयसाहित्य पाठविलें, याबद्दल समिति त्यांचे मनःपूर्वक आभार मानते. वरील यादींतील कित्येक मंडळींनीं मागेंहि अशीच मदत केलेली आहे. यामुळेंच अगदीं थोड्या अवधींत समितीचीं प्रकाशनें निघूं शकतात.

विद्यमान समितीच्या सभासदांत, लोकसाहित्याचा ज्यांचा कित्येक वर्षांचा गाढ संशोधनाभ्यास आहे त्या पंडिता दुर्गाबाई भागवत यांचें नांव नाहीं, हें वाच-कांच्या चटकन् लक्षांत येईल. याचा खुलासा असा कीं, त्यांनीं एका निष्ठापूर्ण तात्त्विक भूमिकेवरून समितीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला व तो मोठ्या खेदानें, नाइलाज म्हणून सरकारला स्वीकारावा लागला. समितीची मोटी हानि

झाली आहे यांत शंका नाहीं. यापुढें, नागविदर्भ आणि मराठवाडा यांना प्रतिनिधित्व देऊन या महाराष्ट्र लोकसाहित्य-समितीचा विस्तार करण्याची सरकारी योजना अमलांत येणार आहे असें ऐकतों. तींत श्रीमती दुर्गाबाई भागवत यांचा समावेश असेल, अशी आशा करतों.

पुणें जिल्ह्याचे शिक्षणाधिकारी समितीचे कार्यवाह असतात व त्यांचा उपयोग सरकारी कामकाज लवकर निकालांत निघण्याकडे चांगला होतो. विद्यमान विद्वान् शिक्षणाधिकारी श्री. मोहिले यांचें सहकार्य चालू सालीं समितीस वेळोवेळीं मिळालें. तसेंच, मुंबई राज्याचे आजचे विद्याधिकारी डॉ. अप्पासाहेब पवार हे पूर्वी मध्यवर्ती लोकसाहित्य समितीचे कार्याध्यक्षच होते; त्यांचा सांस्कृतिक इतिहासाचा मोठा व्यासंग आहे. तेव्हां त्यांनीं कित्येक गोष्टींत जातीनें लक्ष घालून समितीच्या अडचणी दूर केल्या. तरी या दोघां शासनाधिकाऱ्यांचे विशेष आभार मानणें आवश्यक आहे.

पुढील सालांत समितीचा विस्तार होऊन, कार्यक्षेत्रहि वाढेल व समितीच्या लोकप्रिय वाङ्मय-प्रकाशनाबरोबरच उच्च संशोधनपर साहित्याचेंहि कांहीं प्रकाशन होत राहील व समितीला शिक्षणसंस्थांत मानाचें स्थान मिळेल, अशी आकांक्षा बाळगण्यास हरकत नाहीं.

गुढीपाडवा,<br>
शक १८८२

चिं. ग. कर्वे<br>
अध्यक्ष<br>
महाराष्ट्र लोकसाहित्य समिति

# प्रस्तावना

## आदिवासी आणि त्यांची संस्कृति

कोठल्याहि राष्ट्रांत लोकांच्या वसाहतींचे कालानुक्रमें अनेक थर असतात. मागाहून, बाहेरून येणारा समाज, आधींच्या स्थायी झालेल्या समाजापेक्षां जास्त सुधारलेला असतो. तेव्हां साहजिकच आदिसमाज मागें पडतात, नवसमाजापासून दूरदूर गिरिवनांतून राहतात व आपले जुने आचारविचार टिकवून ठेवतात. अशीच गोष्ट आपण ज्यांना वन्यजाती किंवा आदिवासी जाती म्हणतों त्यांची झालेली आहे. अखिल भारतांत हे लोक संख्येनें अडीच कोटी तरी भरतील. यांचे साधारणतः चार वर्ग पाडले जातात : १. पूर्णवन्य, २. अर्धवन्य, ३. अर्धबट सुधारलेले–शेतीभाती करणारे; व ४. पूर्णपणें इतर नागरी समाजांत मिसळले गेलेले. तेव्हां दर खानेसुमारीला या आदिवासींची संख्या घटत जात असणार यांत शंका नाहीं.

आदिवासींची फार मोठी संख्या आसाम प्रदेशांत आढळते व तेथें पूर्ववेदकालीन संस्कृतीचे अवशेष अद्यापि दिसतील व म्हणूनच मानववंशशास्त्रज्ञांचें लक्ष ज्यास्त तिकडे असतें. त्याखालोखाल मध्यप्रदेश ( जुना मध्यप्रांत आणि उडिया धरून भाग ) व नंतर आपला सातपुडा येतो. जुन्या मध्यप्रांतांतील गोंडवनांत सुमारें तीन लाख गोंडवस्ती आहे. राजकुलांतील गोंडांना राजगोंड असें सार्थ नांव आहे. त्यांना वन्य म्हणतां येणार नाहीं. नागविदर्भ आणि मराठवाडा सोडून मुंबई राज्यांतील महाराष्ट्रांत जी आदिवासींची वस्ती आहे तिचें वर्गीकरण असें–

## महाराष्ट्रांतील आदिवासी वसाहती

| जिल्हा | प्रमुख जमात |
|---|---|
| १. पश्चिम खानदेश | भिल्ल |
| २. नाशिक–– | |
| (१) कळवण व पेठ भाग | कोकणे, कोळी. |
| (२) इगतपुरी ता. | ठाकूर, महादेव कोळी. |
| ३. ठाणें–– | |
| (१) डहाणू-उंबरगांव, जव्हार, मोखडें हे तालुके | वारली, कोकणे, महादेव कोळी. |
| (२) उंबरगांव ता. | दुबळे ( गुजराथी ), धोडी. |

| | |
|---|---|
| (३) शहापूर ता. | ठाकूर, कातकरी. |
| ४. कुलाबा | ठाकूर, कातकरी. |
| ५. अहमदनगर-- | |
| अकोला ता. | ठाकूर, महादेव कोळी. |
| ६. पुणें-- | |
| आंबेगांव ता. | पारधी |

## लोकसंख्या

मुंबई राज्यांत एकंदर आदिवासी २२,६७,०७९ ( १९४१ ) आहेत.

| जमात | लोकसंख्या |
|---|---|
| भिल्ल | ६०७४५८ |
| वारली | १४२७४० |
| ठाकूर | ९९३३६ |
| महादेव कोळी | ६६७३८ |
| कोंकणे | ९०१०५ |
| कातकरी | ८६७३८ |
| धोडी | ४६६० |

## आदिवासींचा जीवन-धर्म

प्राथमिक समाजांतील धर्मांत सर्व जीवनाचा व विश्वाचा संकलित विचार नसतो. त्या समाजाची शक्ति जीवनांतील प्राथमिक गरजा संपादन करण्यांतच खर्च होत असते. तात्पुरत्या गरजा भागविण्याकरितां जेवढा विचार करतां येईल तेवढाच. त्यांचीं ध्येयें अगदीं जवळचीं असतात. अन्न, रोगनिवारण, संकटनाश, प्रजोत्पादन व प्रजारक्षण एवढ्यांत सगळा जीव घोंटाळतो व तेवढ्याकरितांच देवतांची, भुतांची किंवा गूढ अलौकिक शक्तींची आराधना हा असंस्कृत मानव करतो किंवा त्यांचें साहाय्य घेतो. या प्राथमिक धर्मस्वरूपांतून पद्धतशीर धार्मिक तत्त्वज्ञान निघूं शकत नाहीं. तरी त्या स्थितींतहि प्रगल्भ धर्मांचीं बीजें सांपडतात. ( हिंदुधर्माची समीक्षा, पृ. ३९-४० ).

म्हणजे प्राथमिक समाजांच्या धर्मांत विश्वव्यापक तत्त्वाची कल्पना नसते. प्राथमिक मनुष्याचें मन दैनंदिन योगक्षेमाच्या विवंचनेंतच गढलेलें असते. तेव्हां त्यानें निर्मिलेला धर्म त्याच्या व्यावहारिक गरजांपुरतांच मर्यादित असतो.

सामुदायिक जीवनाची गरज हें धर्मांचें एक अंग आहे. या जीवनाची संवेदना प्राथमिक संस्कृतींतील व्यक्तींत फार तीव्र असते. सगळा योगक्षेमच प्रत्यक्ष समुदायाच्या आश्रयानें चालतो. सगळी जमात परंपरेचें रक्षण करण्यास तत्पर

असते. जमिनीवरील व व्यक्तीवरील संकटांच्या जबाबदारीची भावना तिला फार तीव्र असते. अलौकिक शक्तींचा कोप होऊं नये म्हणून व त्यांची कृपा व्हावी म्हणून साधना व आराधना या धार्मिक कर्मांची अंमलबजावणी समुदायच करतो. सामाजिक घडामोडींच्या पाठीमागें अलौकिक शक्तींचा हात असतो, असें साहजिकच या समाजास वाटतें. त्यामुळें सामाजिक कर्तव्यें किंवा सामाजिक बंधनें या शक्तींच्या भीतीनें पाळलीं जातात. प्रत्येक जमातीच्या विशिष्ट देवता असतात. त्यांचें स्वरूप त्या जमातींच्या वैचारिक पात्रतेप्रमाणें कल्पिलेलें असतें.

प्रत्येक सजीव–निर्जीव वस्तूंत कोणीतरी पुरुष, भूत किंवा एखादा जीव वास करतो व तो त्या वस्तूस चेतनत्व आणतो, अशी प्राथमिक संस्कृतींतील लोकांची कल्पना असते. हे जीवात्मे जिवंतपणीं किंवा मेल्यावरहि आपणांस पछाडतात, आपलें बरेंवाईट करतात. या जीवात्म्याच्या कल्पनेवरून देव, पितर, यक्ष, राक्षस, स्वर्ग, मोक्ष इ. कल्पना निघाल्या. याच कल्पनेमुळें पशु, पक्षी, वृक्ष, वनस्पति, नद्या, समुद्र, पर्वत इ. च्या ठायीं जीवात्मा असतो असें माणसानें समजूत करून घेऊन यांच्या संतोषार्थ अनेक धार्मिक विधि तयार केले; पितृपूजा ही अशीच एक आहे. ( टेलर—–प्रिमिटिव्ह कल्चर ).

**विधिनिषेध**—–असंस्कृत मानवजातींतले विधिनिषेध सुधारलेल्या नीतिशास्त्राच्या मुळाशीं आहेत. या जातींतून असे विधिनिषेध फार असतात. त्यांची उत्पत्ति नीट लागत नाहीं. या विधिनिषेधांचा उगम **देवकनिष्ठेत** ( टॉटेमिझम ) झाला असें शास्त्रज्ञ सांगतात. प्रत्येक कुलाचें एक प्रतीक असून त्याचेंच नांव त्या कुलाला पडतें. या प्रतीकाची उपासना करतात. त्याला मारत नाहींत. त्याच्या साक्षीनें कुलाचे धार्मिक आणि सामाजिक विधि चालतात. देवकांची आराधना आज सुधारलेल्या जातींतहि आहे.

जादूटोणे—–जादू ही धर्माची प्रथमावस्था आहे. जादूचें वैयर्थ्य पटूं लागलें म्हणजे धर्म उत्पन्न होतो. निसर्गाच्या अलौकिक शक्ति लहरी स्वभावाच्या आहेत, त्यांना शरण गेलें पाहिजे, त्यांचें मन वळविलें पाहिजे, ही भावना धर्माला जन्म देते. बाबिलोनिया आणि भारत यांत वैद्यक, कायदा, जादू व धर्म हे एकाच धंद्यांतून निर्माण झाले आहेत. अथर्वेपुरोहित वैद्यक, जादू आणि पौरोहित्य हीं तिन्ही कामें करीत. कायदा हा पूर्वी धर्माचाच भाग होता. यातुविद्येचें माहात्म्य प्रकट किंवा गुप्त असें सर्वत्र आढळून येतें.

आदिवासींत तर जादूटोण्याचें प्रस्थ विशेष. या लोकांना भगत आणि चेटकिणी यांचें फार भय वाटत असतें व तें निवारण्यासाठीं पुन्हां उलट मंत्रतंत्र, तोडगे करतात. या अभिचार तंत्राचा संबंध मानववंशशास्त्र, तसेंच समाजशास्त्र यांशीं आहे हें उघड आहे. जादू ही तारक आणि मारक अशा दोन प्रकारची

मानतात. डॉ. एल्विननें बैगा आदिवासींच्या संबंधांत या प्रकारांचें विस्तृत वर्णन दिलें आहे. रोगांचें निवारण करणाऱ्या जादूगाराला ' गुणिया ' म्हणतात ( कोंकणांत याला ' बरवा ' असें नांव आहे व त्यावरून बर्वे हें आडनांव पडलें, असें डॉ. केतकर सांगत ). वैदू लोक हेहि जादुगारच. त्यांना औषधांप्रमाणें मंत्रतंत्र आणि तोडगेहि माहीत असतात. त्यांच्या स्त्रिया आजार, दृष्टिबाधा वगैरेंचें निवारण करण्यासाठीं लोकांना गोंदण्याचा धंदा करतात. गोंदणें ही एक जादुविद्याच आहे. हिरवा रंग जीवनदायी मानीत असल्यानें पानाच्या रसानें गोंदण्यांत येतें.

जादुविद्या ही बापापासून मुलाला याप्रमाणें एका कुटुंबांत परंपरागत येत असते. स्त्रियांना ही विद्या शिकविण्यांत येत नाहीं, कारण विश्वास टाकण्याच्या लायकीच्या त्या नसतात. त्यांच्या पोटांत कांहीं राहात नाहीं. स्त्रियांना भुताखेतांची विद्या, चेटूक मात्र येतें व ही त्यांची जादुगिरी फक्त मारक असते. पुरुषांची विद्या तारक असल्यानें पुरुष-मांत्रिकाला आदिवासी समाजांत मानाचें स्थान असतें. जन्म-मृत्यु लग्नविधि व इतर संस्कार त्यांच्या हातून होतात. यामुळें पांढरपेशांतील पुरोहित वर्गाप्रमाणेंच जादुगारांचा धंदेवाईक वर्ग आदिवासींत आहे.

शरीर आणि मन यांच्या स्वास्थ्यासाठीं जसा जादूचा उपयोग करतात, त्याचप्रमाणें निसर्गावरहि मात करण्यासाठीं प्रयोग करतात. मध्यप्रदेशांत गारपगारी ही मंत्रिकांची एक जात आहे. ती शेतावर पडणाऱ्या गारांचें निवारण करते, पावसाचें भविष्य सांगते, अशी लोकांची समजूत आहे. एखाद्याला आपल्या कह्यांत आणण्यासाठीं अथर्ववेदांतील वशीकरण मंत्रांप्रमाणें आदिवासी भगतांचे मोहिनी मंत्राचे तोडगे आहेत. पिशाच-निबंधनहि ते करतात. हिंसक जनावरांचा उपद्रव नाहींसा करतात. ( ' अभिचार किंवा जादूटोणा ' हा कु. दुर्गा भागवत यांचा लेख नवभारत, वर्ष १३ अंक १ मध्यें आला आहे तो पाहा. )

आतां प्रस्तुत ग्रंथाचा विषय जो आदिवासींचें लोकसाहित्य त्याकडे एकदम वळूं.

## आदिवासी लोकसाहित्याचे विशेष

नेहमीं असें म्हटलें जातें कीं, जुन्या काळच्या खेड्यापाड्यांतील गाणीं व कथा हीं कोणीं केलेलीं नसून अनादि, अपौरुषेय आहेत. आजच्यासारखी ती साहित्य-निर्मिति नाहीं. यावर कोणी विश्वास ठेवीत नसले तरी एवढें खरें कीं, हा ठेवा समाजानें शेंकडों वर्षांपासून जतन केलेला असून, याचा उगम किंवा कर्तृत्व मुळींच माहीत नाहीं. या ' वाङ्मया 'चा सारखा सारखा वापर होत असल्यानें यांत बदल झाला आहे व तो अभ्यासाच्या दृष्टीनें अनिष्ट आहे.

अनागर लोकांच्या बोलण्यांत उपमा-अलंकार फार येतात, हें आपण पाहतोंच. सहज कांहीं सांगतांना उपमा, रूपक, लक्षणा वगैरे तोंडून बाहेर पडतात.

त्यांच्या नेहमींच्या भाषेची ही लकबच आहे. अशी लाक्षणिक भाषाशैली त्यांच्या काव्यांतून प्रतीत होत असल्यास नवल नाहीं. त्यांचे साहित्यालंकार त्यांच्या भोंवतालच्या निसर्गव्यापाराचें निरीक्षण करून उचललेले असतात. हे निसर्गालंकार जसेच्या तसे घेतले जात.नाहींत; त्यांचा विपर्यास तरी करतील, किंवा त्यांत भर तरी घालतील, किंवा त्यांचें औचित्य समजूत घेण्याचें काम श्रोत्यांवर सोंपवितील. कवीचा उद्देश ज्या भावना श्रोत्यामध्यें जागृत करावयाचा असतो तो बव्हंशीं सफल होतो, असा अनुभव आहे. भावनांची आर्तता आणि निसर्गाचें सूक्ष्म आणि रसिक वृत्तीनें निरीक्षण, हे अभिजात कवीला आवश्यक असणारे गुण या अनामिक अनागर कवीमध्यें आपणाला आढळून येतात.

पाश्चात्य समाजांत अशी लक्षणा वृत्ति, व्यंजना विद्या किंवा सांकेतिक भाषा फार करून आढळत नाहीं. ती प्राच्यांचीच ईश्वरी देणगी म्हणतां येईल. तेव्हां जसें आपणाला या अलंकारिक भाषेचें यथार्थ आकलन होईल, तसें युरोपियन संशोधक पंडितांना होणें कठिण आहे, यांत शंका नाहीं.

इतर ग्रामीण गाण्यांतून सर्रास आढळणारा आदिवासींच्या साहित्यांतील आणखी एक प्रकार म्हणजे समरूपता किंवा तेच तेच शब्द पुन्हां पुन्हां पण नवीन क्रियेसाठीं घालून प्रासानुप्रासाची गोडी उत्पन्न करणें. उदाहरणांत दाखले याच ग्रंथांतील कांहीं गाणीं घेऊं.

( १ ) तुझी किनार पिवळी दिस
हारु या जोड जोड या जोड
आडवा धरूं व जोड या जोड
आडवा धरूं व येळ या जोड
आडवा धरूं व सर या जोड

( आणखी दागिन्यांचीं नांवें घालून ). पृ. १८

( २ ) चला जात्र धुये नागाचे जंतरे गो
नागांना वावू शेताचा शेणपा गो
नागांवा वावू शेवतनचीं फूलं गो
( यानंतर निरनिराळ्या फळाफुलांचीं उपचारांचीं नांवें घालून ). पृ. ८९

( ३ ) वाट पाते कोंकनच्या पोंव्याची गो,
कोंकनच्या पोंव्याची
कदीं येती कोंकनचीं बालं गो,
कोंकनचीं बालं

कोंकनच्या बालांची आयला काय गोरी लागली गो,
काय गोरी लागली
कोंकनचीं बालं आयच्या चरनाला लागतान् गो,
चरनाला लागतान्.

--पृ. ९५

**दंतकथा**--या लोकांतील दंतकथा पाहिल्यास, त्यांत अंतःसृष्टींतील व्यापारांपेक्षां निसर्ग आणि जीवन यांतील समस्यांचा शोध घेण्यावर विशेष भर असतो. तेव्हां पऱ्यांच्या कथांतून आढळणार नाहीं अशा तऱ्हेची धार्मिक निष्ठेची गंभीर मनोवृत्ति या कथांत दिसते. यांत ऐतिहासिक किंवा अनाकलनीय सत्य आहे असें हे लोक मानतात. स्वतःला सुखाची प्राप्ति व्हावी किंवा कांहीं मनीषा पुरी व्हावी असें परीकथांतल्याप्रमाणें यांतील तात्पर्यहि नसतें. आहे ही जगरहाटी या लोकांना पूर्णपणें मान्य असून, याची उलथापालथ व्हावी असें त्यांना कधींहि वाटत नाहीं. यांच्या दंतकथा म्हणजे सृष्टीचा आरसा रूपकांनीं मढवून दाखविलेला व त्यांत त्यांचें अगदीं प्राथमिक स्वरूपाचें तत्त्वज्ञान प्रतिबिंबित झालेलें; एवढी जाणीव आपण ठेवल्यास त्यांच्या साहित्यांत आपणांस गोडी वाटेल.

**देवताचार आणि लोकाचार**--महाराष्ट्र लोकसाहित्य मालेच्या तिसऱ्या पुस्तकांतील प्रस्तावनेंत दंतकथा आणि दैवतकथा यांचा थोडा विचार केलेला आहे. दंतकथा आणि देवताचार यांचा निकट संबंध आहे. कांहीं वेळां दंतकथांतून देवताचार निघतो व बळावतो. तसेंच, जमातीच्या कांहीं चालीरीति दंतकथांमुळें उत्पन्न होतात व चालू राहतात. वेष आणि अलंकार याखालोखाल खाद्यपदार्थांविषयीं दंतकथांतून विचार-चर्चा केलेली दिसते. मृत्यूनंतरची व्यवस्था--प्रेताचें दहन आणि दफन--कशी करावी यासंबंधींहि माहिती दंतकथा देत असतात.

या कथांतून आदिवासींच्या शिकारीचे पवित्रे, शिकार करतांना ओढवलेलीं संकटें, दैनंदिन आयुष्यक्रमांतील सुखदुःखांचे प्रसंग, नवराबायकोंतील प्रणय आणि कलह, पोटासाठीं कराव्या लागणाऱ्या उद्योगांतील वांटणी, वगैरे शेंकडों गोष्टी सांगतांना, त्यांत दैवी चमत्कार नाटकी पद्धतीनें रसभरित वर्णन केले असतात व त्यांच्या अगदीं सरळ आणि साध्या राहणीला चांगला उठाव दिला जातो. निकृष्ट जीवनयात्राहि सुखाची ठरते.

बहुधा एकच मध्यवर्ती कल्पना घेऊन तिच्या भोंवतीं साधी सरळ गोष्ट विणलेली असते. इतर भारतीय वाङ्मय-प्रकारांतून ( विशेषतः पौराणिक ) नीतीचे धडे देण्यासाठींच म्हणून जशा कल्पित गोष्टी रचलेल्या दिसतात, तशा आदिवासी साहित्यांत फारशा आढळणार नाहींत, हें त्याचें एक वैशिष्ट्य सांगतां येईल. सृष्टीची उत्पत्ति, चंद्रसूर्य, ग्रहणें यांसारख्यांच्या कथा परंपरागत आपल्या पौराणिक

कथांप्रमाणेंच सर्व जमातींतून आढळतात, यांत नवल नाहीं. कारण, आदिवासी हे अहिंदु नाहींत. दिवसां नक्षत्रें कां दिसत नाहींत? तर चंद्रानें सूर्याला फसवून त्याच्याकडून त्याचींच मुलें खावविलीं! मदिरेचा शोध माणसाला कसा लागला? तर एका आदिवीरानें पक्ष्यांना ती चाखतांना पाहिलें! अशा तऱ्हेच्या कथा सर्व समाजांत सामान्य आहेत. पुष्कळदां असें दिसून येतें कीं, त्यांच्यांतील एखाद्या देवतेला हिंदु नांव दिलें जातें; पण त्या नांवाच्या हिंदु देवतांच्या कथेशीं किंवा चारित्र्याशीं या आदिवासी देवतेचें कसलेंहि साम्य नसतें. हिच्या लीला निराळ्याच. आपला महादेव मात्र सर्वांचा आवडता देव आहे. भीमसेन नांवाची पर्जन्यदेवता आढळते.

आदिवासींच्या कथांतून कांहीं ठराविक कल्पना आढळतात त्या अशा—

( १ ) माणसांचें प्राण्यांशीं नातें. उदा० एखाद्या बाईचें पशुपक्ष्याशीं लग्न होणें; किंवा त्या बाईला मनुष्येतर संतति होणें.

( २ ) मनुष्याचें प्राण्यांत रूपांतर किंवा प्राण्याचें मनुष्यांत रूपांतर. याचीं उदाहरणें सर्व राष्ट्रांतल्या लोककथांतून आढळतात.

( ३ ) निर्जीव पदार्थांनीं माणसांचें ऐकणें व त्यांनीं बोलणें. जादूगारांनीं असे चमत्कार केलेले सर्वत्र सांगण्यांत येतें.

( ४ ) प्राण्यांनीं आपली कृपा माणसावर दाखवून त्याला साहाय्य देणें. वर सांगितल्याप्रमाणें ज्या माणसाशीं नातें असेल त्याला प्राणी मदत करतातच, पण इतर आवडत्या माणसाच्याहि साहाय्याला धांवून जातात. विश्वप्रलयांत एका माशानें मनूला वांचाविल्याची प्राचीन भारतीय कथा आहेच.

( ५ ) मनुष्यभक्षक किंवा माणसाचा बळी घेणारे जे असतात त्यांपासून भीति. नायक-नायिका अशांच्या तावडींत सांपडलेल्या व नंतर सुटलेल्या कथा बहुतेक देशांतून पूर्वापार आढळतात. नरमेधांची चाल फार प्राचीन दिसते. शुनःशेपाची वैदिक दंतकथा प्रसिद्धच आहे.

( ६ ) नरकाची किंवा यमलोकाची कल्पना. मृत्यूनंतर पाप्याला यमयातना कशा सोसाव्या लागतात याचीं हृदयभेदी वर्णनें पुराणकारांनीं केलेलींच आहेत.

( ७ ) नवराबायकोच्या गांठीभेटीवर व परस्परांनीं परस्परांचीं नांवें घेण्यावर निर्बंध. कालपरवांपावेतों आपल्याकडेहि जुन्या घराण्यांतून नवऱ्याला बायको दिवसां दिसत नसे व बायकोनें नवऱ्याचें नांव उच्चारावयाचें नसे. समारंभांतून नांव घेण्याची प्रथा यामुळेंच पडली.

( ८ ) सर्वांत धाकट्या मुलाला वारसा मिळणें. साहजिकपणें शेंडेफळावर माणसाची फार प्रीति असते व त्यामुळें त्याचे भाऊ त्याचा दुस्वास करतात.

( ९ ) काळीज किंवा आत्मा शरीरांतून काढतां घालतां येणें. एखाद्याचें मर्म कशांत आहे हें समजून घेऊन त्याचा नाश करणें, अशा पुष्कळ गोष्टी आपण ऐकतों. शरीराच्या एखाद्या भागांत माणसाचें बल असतें व तें काढून घेण्याचा प्रयत्न होतो.

(१०) मृतात्म्यांचा प्राण्यांच्या शरीरांत प्रवेश.

यांसारख्या सामान्य कल्पना ज्या आदिवासींच्या दंतकथांतून आढळतात त्याच नंतर सुधारलेल्या लोकांनीं उचलून व त्यांना निराळीं रूपें देऊन, आपल्या वाङ्मयांत समाविष्ट केल्याचीं अनेक उदाहरणें दाखवून देतां येतील.

सत्यकथा––सर्वच पौराणिक कथा किंवा दंतकथा रूपकात्मक, काल्पनिक असतात असें जुनें मत आज सर्वस्वीं मान्य होणार नाहीं. राम आणि कृष्ण हे ऐतिहासिक पराक्रमी पुरुष फार प्राचीन काळांत होऊन गेले व त्यांच्या अंधुक स्मृतीवर पुराणें रचिलीं आहेत असें समजणें, जसें आजच्या शास्त्रीय युगांतहि अगदीं वेडेपणाचें मानलें जात नाहीं, त्याचप्रमाणें कांहीं दंतकथा मूळच्या सत्यकथा असूं शकतील; त्या केवळ कादंबरी स्वरूपाच्या नसतील. तर फार प्राचीन काळीं त्यांतील प्रसंग घडले असून, त्यानंतर आजतागायत त्यांचा पगडा जनमनावर घट्ट बसला आहे, अशी वस्तुस्थिति असावी. कांहीं दंतकथा कधींतरी एकदां मंत्र-तंत्रांतील कृतींचा भाग म्हणून प्रचलित असतील व नंतर त्यांना रूपकांनीं सजविलें असेल. पुष्कळदां असें घडतें कीं, संस्कार लुप्त होतात पण त्यांच्या कथा जिवंत राहतात. तेव्हां या सजीव दंतकथांवरून आपणांस मृत संस्कारांची कल्पना करतां येते.

कांहीं कथा ज्याप्रमाणें जादूटोणा आणि संस्कारविधि यांशीं संबद्ध दिसतात त्याप्रमाणें कांहीं घटना विवरणात्मक म्हणजे विशिष्ट घटनांचा शास्त्रार्थ सांगणाऱ्या असतात. कांहीं मनोरंजनपर धर्मशास्त्रांतील अद्‌भुत कथांसारख्या वाटतात. तथापि, अशाहि कांहीं सत्यांश असलेल्या दंतकथा असतात कीं, त्या गंभीर वातावरण निर्माण करतात व आदिसमाज जीवनावर चांगला प्रभाव गाजवितात.

## आदिवासींची कला

आदिवासींमध्यें कलांचें दर्शन अनेक गोष्टींत होत असतें. शरीरमंडन, वेषभूषा, भांडींकुंडीं, बाहुल्या, भिंतीवरील चित्रें, लाकडी सामानावरची नक्षी, दगडावरील शिल्प इ. विविध क्षेत्रांत सिंधु संस्कृतीइतक्या प्राचीन काळापासून अवगत झालेलें कौशल्य ते दाखवितात. अंगावर गोंदून घेणें, नाकाकानांना दागिने घालण्यासाठीं टोंचणें, केंसांत फुलें माळणें, रंगीबेरंगी वस्त्रें विणणें, शिंपाकवड्यांच्या सुंदर माळा करणें, दिव्यासाठीं प्राण्यांचीं शरीरें असलेल्या समया घडविणें, दाराखिडक्यांवर नक्षी कोरणें, मृतांच्या स्मारकासाठीं ‘ वीरकल्ल ’ सारखे उठावदार

चित्रांचे दगडी खांब उभारणें, खेळांतील मुखवटे रंगविणें, अशा असंख्य कलायुक्त कृति ते करीत असतात. इतर हिंदुसमाजाप्रमाणेंच त्यांच्या कलेला धर्माचें अधिष्ठान असतें. कलेसाठीं कला त्यांना माहीत नाहीं. दैवतकथांतील एखादा प्रसंग त्यांच्या भाविक मनांत आणि डोळ्यांपुढें खेळत असतो व त्याला अनुरूप होईल अशीच कलाकृति ते बनवितात.

आदिवासींची कला हीन आणि अचेतन आहे, अशी टीका करण्यापूर्वीं, टीकाकारानें या लोकांनीं कोणत्या निकृष्ट परिस्थितींत आपल्या जीवनांत आनंद टिकविला आहे याचा विचार करावा. ते ज्या खेड्यापाड्यांतून, रानावनांतून दिवस कंठतात त्यांतहि आर्थिक नागवण चालली आहे आणि राजकीय जुल्म होत आहे; त्यांना लागणाऱ्या गरजेच्या जिनसा झपाट्यानें नाहींशा होत आहेत. त्यांना जें शिक्षण दिलें जात आहे तें त्यांच्या समाजांतील आजवरच्या विचारांना आणि पराक्रमांना तुच्छ लेखण्यास सांगत आहे. यांमुळें त्यांच्यांतील जुन्या कलावस्तु त्यांना स्वतःलाच हिणकस वाटतात व सुधारकी जीवनांतील सामानसुमान तेवढें काय तें सौंदर्यशाली असा साहजिक ग्रह होतो. पांढरपेशा वर्गांत आजहि त्रिसाडी, तांबट किंवा साळी म्हणजे जे हातकाम करतात त्यांना वरच्या दर्जाचे मानलें जात नाहीं; मग आदिवासींनीं कितीहि सुंदर वस्तु तयार केली तर तिचें कौतुक कसें होणार ! तेव्हां हे पुरातन कारागीर अशा वस्तु लोकांच्या दृष्टीस पडूं देत नाहींत.

परिस्थिति आणि सामाजिक बंधनें यांच्या जाचणीमुळें कलाकुसर दाखविण्यास पाहिजे ती धातु मिळत नाहीं. अमक्या जातीनें अमक्याच धातूवर काम केलें पाहिजे, असें पूर्वापार सामाजिक नियंत्रण असे. त्यांतून आदिवासी म्हणजे हिंदु-समाजाच्या बाहेरचे; तेव्हां त्यांना माती, दगड आणि लाकूड या साधनांचाच तेवढा वापर करतां येतो. तरी देखील झाडपाला, गवत आणि फुलें यांचे ते अलंकार बनवून ऐटीनें वापरीत. पण आतां त्यांना अशा ‘ रानटी ’ शृंगाराची लाज वाटूं लागली आहे. कारण नवें शिक्षण ! ‘ शिकलेले ’ आदिवासी खालच्या हिंदु जातींकडून आपलीं कलेचीं कामें करून घेतांना दिसतात तेव्हां कलेचें दुर्दैव म्हणावें, दुसरें काय ? शिवाय, सुधारलेल्या लोकांतील अलीकडचा दिखाऊ साधेपणा ते उचलीत असल्यानें, रोज वापरावयाच्या जिन्नसांत आपली जुनी कला दाखविण्याचें ते मुद्दाम टाळतात असें दिसतें.

नवयुगांत सर्वत्र असंस्कृत, रानवट लोकांना जीवन कंठण्यासाठीं सुधारणांचा अवलंब करावा लागत आहे. यांत कलावंतांच्या दृष्टीनें असा धोका आहे कीं, या लोकांतील परंपरागत कलांचा लोप होतो. आफ्रिकेंतील जंगली किंवा अमेरिकेंतील रेड-इंडियन यांचीं खेदजनक उदाहरणें आहेतच. सृष्टींत जें कांहीं नैसर्गिक, साधें आणि उघड आहे तें वाईट, अशी या लोकांची कल्पना झाली असो, किंवा त्यांना आपलें शरीर झांकण्यासाठीं जाडेंभरडें का होईना, एखादें वस्त्र हातानें विणतां येत

असो; पण गळा, हात, केस यांसारखे अवयव सुशोभित करणारे अलंकार बनविणें, आतां त्यांना जड जाऊं लागलें आहे. यामुळें त्यांचा जुना सुखाचा आयुष्यक्रम जात चालला; पण नवा उत्साह, आनंद, जीवन-संगीत यांची आवड उत्पन्न होईल अशी थोडी देखील कल्पना दिली जात नाहीं, याचें वाईट वाटतें.

पं. जवाहरलाल नेहरू आदिवासींच्या उद्धाराबाबत एके ठिकाणीं म्हणतात.—

"आदिवासींच्या संस्कृतींत नाच आणि गाणें यायोगेंच त्यांचें जीवन आनंदमय होत असतें. आमचे सुधारलेले समाजसेवक त्यांना या गोष्टी असंस्कृत म्हणून टाकावयास सांगतात. याचा परिणाम असा होतो कीं, या लोकांजवळ विपुल प्रमाणांत असणारा आनंद नाहींसा तर होतोच पण त्या जागीं दुसरी कांहीं फायद्याची गोष्टहि मिळत नाहीं. या कारणानें हे लोक आळशी, निरुत्साही आणि चैतन्यशून्य बनतात. तेव्हां हा त्यांना सुधारण्याचा मार्ग निःसंशय चुकीचा आहे."

पण त्यांना सुधारण्याचा रास्त अचूक मार्ग कोणता, हें अद्यापि ठरावयाचें आहे. त्यासाठीं सरकारी व इतर समाजसेवक संस्थांचे प्रयोग चाललेले आहेत. केवळ सांस्कृतिक, सामाजिक अभ्यासाच्या दृष्टीनेंहि या प्रश्नांत लक्ष घातलें जात आहे.

**संशोधनपर अभ्यासाची गरज**—आदिवासी जमातींचा संशोधनात्मक अभ्यास करण्यासाठीं भारतांत बिहार, मध्यप्रदेश, ओरिसा, राजस्थान आणि पश्चिम बंगाल या राज्यांतून संस्था निघाल्या आहेत. मुंबई आणि गोहत्ती विद्यापीठांनीं देखील सांस्कृतिक पातळीवरून संशोधन चालविलें आहे. मुंबईची ॲन्थ्रॉपोलॉजिकल सोसायटी आणि गुजरात रिसर्च सोसायटी यांचेहि असेच प्रयत्न दिसतात. पुणें विद्यापीठ गोखले इन्स्टिटयूटच्या सहकार्यानें अशा संशोधनाला आरंभ करीत आहे.

तेव्हां महाराष्ट्र लोकसाहित्य समितीनें या मार्गावर हें लहानसेंच पाऊल टाकलें आहे. प्रोत्साहन मिळाल्यास भराभर मोठीं पावलें टाकण्यास तिला धीर येईल.

२०४।२ सदाशिव पेठ,
बागवाडी, पुणें २.

चिंतामण गणेश कर्वे

## प्रस्तावना–संदर्भग्रंथ

फ्रेझर––दि गोल्डन बौ.

मॅलिनोवस्की––मिथ्स इन् प्रिमिटिव्ह सायकॉलॉजी.

एल्विन––( १ ) ट्रायबल मिथ्स ऑफ् ओरिसा.

( २ ) फोक सॉंग्स ऑफ छत्तिसगड.

( ३ ) दि ट्रायबल आर्ट ऑफ् मिडल इंडिया.

बिडने––अमेरिकन ॲन्थ्रॉपोलोजिस्ट, १९५०.

टेलर––प्रिमिटिव्ह कल्चर.

बोआस––लँग्वेज अँड कल्चर.

हॉफमन––( १ ) मुंडा पोएट्री.

––( २ ) ट्रायबल आर्ट.

अँड्रयू लांग––ग्रिम्स हाऊसहोल्डटेल्स या ग्रंथांतील प्रस्तावना.

लक्ष्मणशास्त्री जोशी––हिंदुधर्माची समीक्षा.

सर्वोदय अंक––२६ जानेवारी १९६०.

सावे, खं. ज.––महाराष्ट्रांतील वन्य जाती ( महाराष्ट्र परिचय ग्रंथ ).

मुंबई राज्य सरकारनें नियुक्त केलेली

# महाराष्ट्र लोकसाहित्य समिति

पुणें



उद्देश

महाराष्ट्रांतील जुनें लोकसाहित्य जमा करणें व तें वेळोवेळीं प्रसिद्ध करणें

## पदाधिकारी मंडळ

अध्यक्ष

श्री. चिंतामण गणेश कर्वे, पुणें.

चिटणीस

पुणें जिल्हा शिक्षणाधिकारी, पुणें.

सभासद

डॉ. कु. सरोजिनीबाई बाब्रर, पुणें.

डॉ. कमलाबाई देशपांडे, पुणें.

श्री. सौ. अनसूयाबाई लिमये, पुणें.

प्रा. दा. गो. बोरसे, अकोला.

# अनुक्रमणिका

---

महाराष्ट्रांतील

# आदिवासी लोकसाहित्य

## डांग समाज

### १. डांग आणि डांगी लोकसाहित्य

• संग्राहक : डॉ. **नरेश कवडी,** एम्. ए., पीएच्. डी.

आज डांग जिल्हा म्हणून ओळखला जाणारा प्रदेश ब्रिटिश अमदानीपूर्वी चौदा भिल्ली संस्थानांचा समूह होता. ब्रिटिश अमदानींत गाढवी संस्थानाकडे प्रमुखपद होतें व राज्यकारभार खानदेशाच्या कलेक्टरकडे होता. आज तो स्वतंत्र जिल्हा असून आहवा हें जिल्ह्याचें ठिकाण आहे. जिल्ह्याचें क्षेत्रफळ अंदाजें एक हजार चौरस मैल असून, दक्षिणोत्तर कमाल लांबी ५२ मैल आहे, तर रुंदी २८ मैल आहे.

हा भूप्रदेश म्हणजे एक अखंड अरण्य वाटतें. उंच डोंगरांनीं वेढलेल्या आणि अतिशय खोल अशा असंख्य दऱ्यांनीं भरलेल्या या प्रदेशांतून अंबिका, पूर्णा, कार्प्री, गिरा या नद्या सुरत जिल्ह्याकडे वाहत जातात. डांगमधील सर्वोच्च भाग साधारण साडेचार हजार फूट उंचीचा आहे.

डांगला जाण्यासाठीं बिलिमोरा या स्टेशनावर उतरून वघई-आहवा हा एक मार्ग आहे. नाशिक जिल्ह्यांतल्या मुल्हेर (ता. बागलाण) या गांवाहूनहि आहव्याला जातां येतें. नाशिक जिल्ह्यांतल्याच वणी किंवा दिंडोरी इथूनहि डांगमधें जातां येतें. तसेंच खानदेशांतून नवापूर मार्गेंहि आपण जाऊं शकतों. आणखीहि एकदोन मार्ग आहेत.

**प्राचीन परंपरा :**

लंकाविजयानंतर राम आणि सीता पुष्पक विमानांतून परत जात असतां विंध्य पर्वताच्या दक्षिणेला त्यांना अगस्ति ऋषींचा आश्रम दिसला. त्यांचें दर्शन घेण्यासाठीं रामचंद्र खालीं उतरले तेव्हां अगस्तींच्या सल्ल्यावरून त्यांनीं डांगजवळच्या बांसदा संस्थानांतल्या पातरवडा या गांवांत यज्ञ केला. या यज्ञासाठीं रामचंद्रांनीं हिमालयाजवळच्या प्रदेशांतून ब्राह्मण बोलावले होते. दुसरी दंतकथा अशी आहे कीं, रामचंद्रांनीं डांगमधल्या अंबिका नदीच्या कांठींच हा यज्ञ केला व डांगमधल्या आदिवासींतूनच कांहीं आदिवासींना निवडून त्यांना ब्राह्मण बनवलें.[१] या ब्राह्मणांकरितां रामचंद्रांनीं बाण मारून पाण्याचा झरा निर्माण केला. डांगच्या पश्चिमेला बांसदा संस्थानांत आज उनाईचा झरा म्हणून दाखवला जातो तो हाच झरा. डांगमधल्या झाडी गरखाडीजवळ असलेल्या जंगलाच्या पट्ट्याला आजहि सीतेचें वन म्हणतात.

डांगच्या सीमेवरील नाशिक जिल्ह्यांतला मुल्हेरचा किल्ला पांडवांच्या काळीं मयूरध्वज आणि ताम्रध्वज या नांवाच्या भावांनीं बांधला असें म्हणतात.[२] डांगमध्यें आजहि एका गांवाचें नांव पांडव असें असून जवळच पांडवगड नांवाची गुहा आहे. पांडव वनवासांत असतांना कांहीं काळ या गुहेंत राहात होते असें सांगतात.

कथाकल्पतरूवरून असें दिसतें कीं, अश्वमेध यज्ञाच्या वेळीं अर्जुन घोड्याचें रक्षण करीत करीत डांगच्या जंगलांत शिरला होता. त्या काळीं या भागाला चंपावती[३] म्हणत. या भागांतल्या लोकांचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांचीं मोठीं पोटें. अर्जुन या भागांत आल्यावर त्याचें आणि त्याच्या बरोबरच्या सैनिकांचीं पोटेंहि मोठीं झाल्यानें अर्जुनाला एक वर्षभर तिथेंच

---

१ इंडियन अँटिक्वेरी, खंड १, पृ. १४२

२. बडोदा संस्थानचें गॅझेटियर, पृ. ५८२

३. "किर्र झाडी दरी हो डोंगर" या ओळीनें सुरू होणारें 'सातपुडा' किंवा 'पांवागड' या नांवाचें एक प्रसिद्ध स्त्रीगीत आहे. त्यांत चंपावती, भिल्ल, कोळी, पांवागड, गर्बा इ. असलेले शब्द पाहतां तें गाणें डांगमधल्या घटनेवरच असावें असें वाटतें.

मुक्काम करावा लागला. डांगची हवा, पाणी व अन्न यांमुळें आजहि आदि-वासींचीं पोटें मोठीं दिसतात. ( मलेरिया-प्रतिबंधक उपायानें आतां डांग-मधला मलेरिया जवळ जवळ नष्ट झाला आहे असें म्हणतात. ) त्यावरून ' चंपावती ' हें अरण्य म्हणजे डांगच असावें.

## ऐतिहासिक परंपरा :

नाशिक आणि खानदेश या भागांवर देवगिरीकर यादव, मोगल, बहामनी राजे किंवा अहमदनगरचे निजामशाही राजे यांची राजवट असतांना डांगी संस्थानें स्वतंत्रच असावीं असें वाटतें. इ. स. १६३७ मध्यें औरंगजेबानें बागलाण प्रांत काबीज केला. तेव्हां हा प्रांत दोनशें मैल लांब व शंभर मैल रुंद होता.त्यावरून डांगी संस्थानेंहि त्या वेळीं यांतच समाविष्ट होतीं असें दिसतें.

इ. स. १६६४ मध्यें शिवाजी महाराजांनीं सुरतेवर चाल केली तेव्हां ते डांगमार्गेच गेले. १६७२ सालीं डांगच्या वायव्येला असलेला साल्हेरचा किल्ला मराठ्यांच्या ताब्यांत होता. इ. स. १७२३ मध्यें निजाम स्वतंत्र झाला आणि हा प्रदेश त्याच्या ताब्यांत गेला. खर्ड्याच्या लढाईनंतर निजामानें बागलण प्रांत पेशव्यांना दिला. १७६८ सालीं पेशव्यांनीं गोविंदराव गायकवाडची पत्नी राणी गहिनाबाई हिला साल्हेरचा किल्ला नजर केला. मात्र मराठा राजवटींतहि सुरगाणा आणि डांग हीं संस्थानें बंडखोर मुलूखच ठरलेलीं होतीं. ब्रिटिश राजवटींत मुल्हेर, धीवेल, पिंपळनेर इ. ठिकाणीं ब्रिटिशांनीं कडक बंदोबस्त ठेवला होता. १८१९ आणि १८२१ सालीं डांगी भिल्लांनीं सुरगाणा आणि मारपेट या ब्रिटिश मुलखांत लुटालूट केल्यानें ब्रिटिशांनीं १८२२ सालीं आपली फौज डांगमध्यें पाठविली आणि डांगी भिल्लांना शरण आणलें. तरीहि १८२९ पर्यंत अधून-मधून डांगी राजे ब्रिटिश प्रदेशांत धुमाकूळ घालीतच. इ. स. १८३० मध्यें डांगमधल्या सर्व संस्थानिकांना ब्रिटिशांनीं कैद केलें आणि नंतर त्यांचीं राज्यें खालसा करून वर्षासनें ठरवून दिलीं. १८४० पर्यंत अधूनमधून एखादा संस्थानिक बंड करण्याचा प्रयत्न करी असें दिसतें. १८४२ च्या सुमारास ब्रिटिश सरकारनें डांगी संस्थानिकांशीं एक करार करून डांग-मधल्या सागवानासाठीं दरसाल ११२३० रुपये देण्याचें मान्य केलें. याच

सुमारास डांगचा राज्यकारभार खानदेशच्या कलेक्टराकडे सोप
आला. १९०२ ते १९३५ या अवधींत हा भाग सुरतेच्या डिव्हि
फॉरेस्ट ऑफिसरकडे होता आणि १९३५ ते १९४७ पर्यंत याचा क
पोलिटिकल एजंट पाहत असे.

१९ जानेवारी १९४८ रोजीं भारताच्या गव्हर्नर जनरलनें
मुंबई राज्यांत समावेश केला आणि मराठी व गुजराती अशा दोन्ही स
भाषा ठरविण्यांत आल्या. तथापि २५ मे १९४९ रोजीं डांग जिल
भाषा मुंबई सरकारनें मराठी हीच ठरवली.

**लोक :**

डांगमध्यें सर्वांत अधिक संख्या भिल्लांची आहे. त्याशिवाय क
कुणबी आणि वारली हे आहेत. कॅप्टन ग्रॅहम यांनीं इ. स. १८४३
लिहिलेल्या 'भील ट्राइब्ज ऑफ् खानदेश' या आपल्या पुस्तकांत (पृ
म्हटलें आहे कीं, डांगमधले भिल्ल हे हिंदुस्थानांतले सर्वांत अधिक
लोक आहेत. विल्सन यांनींहि आपल्या 'ॲबोरिजिनल ट्राइब्ज ऑफ्
प्रेसिडेन्सी' या ग्रंथांत (पृ. ४) हेंच मत व्यक्त केलें आहे. आज
मधले आदिवासी पाहतांना या ग्रंथकारांचीं मतें प्रत्ययाला येत नाही
सांगायला नको. उलट आज डांगमधलें आदिवासी फार सौम्य, प्राम
निरुपद्रवी असेच—निदान बाहेरून जाणाऱ्यांना तरी वाटतात.

भिल्ल जमातींत अहीर, चौधरी, देशमुख, गायकवाड,
पवार, शिंदे, वाघमारे इ० आडनांवें आढळतात. नाशिक जिल्ह
कळवण तालुक्याच्या सीमेवर असलेल्या डांगी भागांत भिल्ल स्वत:ला
कोळी म्हणवतात. भिल्लांच्या तुलनेनें इतर जमातींत थोडी अधिक सु
दिसते.

तथापि रूपरंग आणि वेषभूषा यावरून जमाती ओळखणें
आहे. बहुतेक सर्वांची वेषभूषा सारखीच असते आणि दिसतातहि सा
काळा रंग, अंगावर केस कमी, लहान बांधा, सामान्य नाकडोळे हीं
वैशिष्टयें. जाडजूड अथवा तगडा आदिवासी क्वचितच दिसतो. मात्र
करण्याची ताकद भरपूर आहे.

स्त्रीपुरुषांची वेषभूषा तोकडी असते. कमरेचें वस्त्र गुडघ्यापर्यं

म्हणजे पुष्कळ झालें. छातीवरून लुगड्याचा पदर घ्यायलाहि स्त्रिया अलीकडेच शिकल्या आहेत. स्वच्छास्वच्छतेच्या कल्पना कमालीच्या शिथिल.

## लोकजीवन :

डांगमधलें खेडें म्हणजे तीसचाळीस झोपड्या. त्याहि दूर दूर. बांबू, गवत, पालापाचोळा यांनीं झोपडी तयार होते. झोपडींतला संसार म्हणजे मातीचीं भांडीं, जाडीभरडीं वस्त्रें आणि फारतर बाज. झोपडीला दार असलें तरी त्याला कधीं कुलूप लावण्याचें कारण पडत नाहीं. एकतर लोक प्रामाणिक आणि कुणीं मनांत आणलें तरी चोरी करायची कशाची ? अन्न म्हणजे जाडाभरडा तांदूळ किंवा नागली. दुधासाठीं जनावरें बाळगावीं हें अलीकडे त्यांना शिकवावें लागलें. कोंबडी, बकरी, हरीण, ससा, कबूतर इ० चें मांस आणि मासे, खेकडे आवडीनें खातात. पण आवडीचें अन्न मिळेनासें झालें तरी कष्ट करण्याची तयारी मात्र नाहीं. मग रानटी कंदमुळें, शेतांतले उंदीर यांवरहि गुजराण करण्याची तयारी. तंबाकू आणि दारू हीं व्यसनें भरपूर.

## संस्कृति :

विवाहपद्धति, चालीरीति, धार्मिक आचारविचार या दृष्टींनीं हे आदिवासी महाराष्ट्रांतल्या बहुजनसमाजासारखेच आहेत. अंधश्रद्धेचें प्राबल्य फार. भुतेंखेतें, जारणमारण, चेटुक–भानामती यांवर अतिशय श्रद्धा. विशेषतः स्त्रिया या विद्येच्या मागें फार लागतात. ही विद्या हस्तगत करण्यासाठीं मुलगा किंवा नवरा यांचाहि बळी दिल्याचीं उदाहरणें पूर्वीं घडत. दारूबंदीमुळें आतां मद्यपान कमी झालें असेल. एरवीं धार्मिक विधींसाठींच दारूची आवश्यकता लागत असल्यानें दारूचा प्रसार फार होता. नाग साप, वाघ, डोंगर, मुंज्या, बरमदेव, गांवदेव, हनमत, मावली, वीर ( मृत पूर्वज ) यांची पूजा चालते. विवाहाच्या वेळीं पाटलाची उपस्थिति आवश्यक असते. प्रत्येक लग्नाच्या वेळीं संस्थानिकाला सात रुपये मिळत आणि पाटील त्यांतलेच दोन रुपये घेई. नाशिककडच्या भागांत कांहीं जमाती विवाहासाठीं ब्राह्मणाला बोलावून नेतात. मूल जन्मल्यावर पांचव्या दिवशीं 'पाचोरा' नांवाचा विधि करतात. सुईण मुलाला पाळण्यांत ठेवून त्यांना सांगते-मुलगी असल्यास ) आईनें बोलावलें कीं धांवत ये, पण बापानें बोलावलें

तर पळून जा. ( मुलगा असल्यास ) बापानें बोलावलें कीं धांवत ये, पण आईनें बोलावलें तर पळून जा. शहाणा आणि सुखी हो. बाजारांत जाऊन दारू पी आणि सरकारला भिऊं नको.

तरुण स्त्रीपुरुषांना आपले जोडीदार निवडण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असतें. स्त्रीपुरुषांच्या सामाजिक दर्जात फरक दिसत नाहीं. परंतु स्त्रियांच्यामध्यें वैषयिकता अधिक असते, अशी समजूत दर्शविणाऱ्या कांहीं अश्लील म्हणींवरून पुरुषांच्या मनांत स्त्रियांच्याविषयीं थोडीशी तुच्छतेची भावना असावी असें वाटतें. एरवीं स्त्रीचा दर्जा समान वाटतो. स्त्रिया पुरुषांना सर्व क्षेत्रांत मदत करतात. लग्न झाल्यावर एक वर्षानें स्त्रीपुरुष एका बिछान्यावर झोपतात. तोंवर पति आपल्या पत्नीला ' गावाळी ' म्हणतो. स्त्रियांचे स्तन हे फक्त मुलांना पाजण्यासाठीं आहेत अशी कल्पना असल्यानें, शृंगारांत त्यांना स्थान नाहीं. म्हणूनच छातीवरून पदर घेण्याची पद्धतहि परवांपरवांपर्यंत प्रचलित नव्हती. स्त्रीनें अथवा पुरुषानें कितीहि लग्नें केलीं तरी तो कमीपणा समजत नाहींत.

एकंदर जीवनविषयक दृष्टिकोन हा भोगप्रधान वाटतो. मृत्यु म्हणजे आनंद आणि सुख यांचा शेवट; तेव्हां जिवंत असेपर्यंत चैन करावी हीच कल्पना आढळते. आत्म्याचें चांगलें पोषण करावें तोंवर तो देहांत राहतो; आणि न केल्यास कंटाळून देहाला सोडून जातो अशी त्यांची समजूत आहे.

## लोकभ्रम :

शकुन-अपशकुन यांच्या कल्पना फार सांपडतात. दृष्ट आणि चेटुक यांचें त्यांना फार भय वाटतें. पिवळी चिमणी दृष्टीस पडली तर तो अपशकुन मानला जातो. उलट कुकरुस नांवाची हिरव्या रंगाची चिमणी दिसल्यास तो चांगला शकुन समजतात. कुठल्याहि कामासाठीं देवाला कौल लावण्याची पद्धत आढळते. चेटुक केल्यानें मरण पावलेला माणूस मनुष्यभक्षक वाघ होऊन माणसें मारतो अशी त्यांची कल्पना आहे. पुरुषापेक्षां स्त्रियांत चेटुकविद्येची आवड अधिक असल्यानें, आणि ही विद्या हस्तगत करण्यासाठीं त्या जवळच्या नातेवाईकाचा बळी देतात अशी कल्पना असल्यानें पुरुष आपल्या आईला किंवा बहिणीलाहि भितात. या विद्येवर उतारा ' भगता ' जवळ असतो; आणि साहजिकच भगताचें गांवांत फार प्रस्थ असतें. या भगतांत पानफोड्या,

दगडफोड्या इत्यादि प्रकार आहेत. पानावर पाहून उपाय सांगणारा तो पानफोड्या भगत आणि दगडावर पाहून उपाय करणारा तो दगडफोड्या भगत. चेटकिणीहि फक्त भगतालाच भितात. रोगराई, आजार यांसाठींहि भगताचीच मदत घेतली जाते. हे आदिवासी काखेंतले केस काढीत नाहींत. आपल्या काखेंतला केस जर शत्रूला सांपडला तर त्याच्या साह्यानें तो आपल्यावर चेटुक करील असें त्यांना भय वाटतें. भुलवेल नांवाची वेल ओलांडली तर माणसाची स्मृति नष्ट होते व जुगवेल नांवाची वेल जाळल्यानें ती परत येते अशी समजूत आहे. केस पांढरे झाल्यावर पुरुष उघड्या डोक्यानें हिंडत नाहींत. पाकोळीनें आपले पांढरे केस पाहिले तर ती तें देवाला कळवते व आपल्याला मृत्यु येतो, अशी त्यांची समजूत आहे. रात्रीच्या वेळीं वाघाला खाड्या किंवा जनावर म्हणतात व सापाला पानी किंवा जीवजंतु म्हणतात. तंबाकू देतांना घेतांना दोघेहि परस्परांच्या हाताला स्पर्श करतात. नंतर घेणारा आपला डावा हात उजव्या कोपराला लावतो आणि उजव्या हातानें कपाळाला तीनदां स्पर्श करून मग तंबाकू खातो.

**दंतकथा :**

सबंध डांगमधें निरनिराळ्या स्थलविशेषांशीं अनेक दंतकथा निगडित आहेत. अहिराडी नांवाच्या गांवांत नदीच्या पात्रामधें दोन ओबडधोबड दगड आहेत. हे दगड सवतीचे म्हणून ओळखले जातात. दोघी सवती तिथें येऊन गप्पा मारीत असतां, एकीनें दुसरीला नदींत ढकलून दिलें; तिनें पडतां पडतां दुसरीलाहि ओढून घेतलें आणि अशा रीतीनें दोघी मरण पावल्या. नंतर देवानें त्यांना शिळा बनवलें असें सांगतात.

दुसऱ्या एका गांवीं दगडाचा मोठा ढीग दिसतो. असें सांगतात कीं, एक गवळी राजा आपल्या सैन्यासह तिथून जात असतां प्रत्येक सैनिकानें एक एक दगड उचलून तिथें ठेवल्यानें तो ढीग तयार झाला आहे.

ब्रिळिअंबा नांवाच्या टेकडीवर जनक नांवाचा राजा राहत असे. हा इतका सामर्थ्यवान् होता कीं, तो तिथून ओरडला तर त्याचा आवाज सुरतेंत ऐकूं जाई. त्यानें एका चारण स्त्रीला पळवून नेण्याचा प्रयत्न केल्यावरून चारणांनीं त्याला ठार केलें.

गरखाडी गांवाजवळ गोसावी नांवाची टेकडी दाखवितात. त्या

टेकडीवर एक खड्डा दिसतो तो गोसाव्याची धुनी म्हणून दाखविली जाते आणि आसपास सांपडणारी पांढरी माती ही त्या धुनींतली राख आहे, असें सांगतात.

**करमणूक :**

नाच आणि गाणीं ही यांची मुख्य करमणूक. त्याशिवाय निरनिराळे खेळ व गोष्टी सांगणें हींहि करमणुकीचीं साधनें आहेत. तमाशाहि फार लोकप्रिय आहे. मात्र तमाशांत स्त्रिया नसतात. सारा भर नाच्या पोरावर असतो.

परंतु डांगी स्त्री-पुरुषांना अत्यंत प्रिय गोष्ट म्हणजे नाच. विवाहादि समारंभांत आणि सणावारीं तर रात्रभर सारे स्त्रीपुरुष बेहोष होऊन नाचाचा आनंद लुटतात. नाच स्त्रीपुरुषांचा संमिश्र असतो. ढोलकी, सूर, कहाळी (सनई) इ. वाद्यें नाचाच्या वेळीं वापरलीं जातात. नाचाच्या फिगड, पावरी, धनुकली, बारदार, वेलतोड्या वगैरे पंधरावीस चाली (प्रकार) आहेत. वाद्यें वाजवणारे मधें उभे असतात आणि स्त्रीपुरुष हातांत हात धरून त्यांच्या भोंवतीं नाचतात.

गाण्यांचे ठळक प्रकार म्हणजे नाचाचीं गाणीं, लग्नाचीं गाणीं, सणाचीं गाणीं, घरटीली (जात्यावरच्या ओव्या). नाचाच्या गाण्यांत ठाकऱ्या, ढांक व इतर असे प्रकार आहेत. लग्नाच्या गाण्यांत, हळद लावतांना, बाशिंग बांधतांना जीं गाणीं म्हणतात त्यांना 'धवळ' असें म्हणतात व हीं गाणीं म्हणणाऱ्या स्त्रीला 'धवळारी' म्हणतात. इतर गाण्यांना पेनाचीं गाणीं म्हणतात.

ठाकऱ्या गाणीं ठाकऱ्या नाचाच्या वेळीं म्हणतात. हा नाच पावसाळ्यांत पुरुष पायाला घुंगरू बांधून करतात. साथीला ढोलकी असतेच. या गाण्याचा एक नमुना—

पानी पड रामाचा रे ।
कुनब्याचे कामाचा रे ।
पानी पड सिताचा रे ।
कुनब्याच्या हिताचा रे ।
नागली रे तुझी पात रे ।



डांगच्या आदिवासींचें नृत्य



ठाणें जिल्ह्यांतील आदिवासींचें ' भोवाडा ' नृत्य

दिसते निळी काच रे ।
लावायाची घात रे ।
मरूं दे घातबीत रे ।
निजूं दे सारी रात रे ।।

ढांक किंवा लहान ढोलकी याची साथ घेऊन जें गाणें म्हटलें जातें त्याला ढांक म्हणतात. ‘ धवळ ’ हें बहुधा प्रदीर्घ असतें.

☆ ☆ ☆

## २. डांगी गाणीं

संग्राहिका : **कुसुम तपस्वी**, बी. ए.

बागायत शेती डांगमध्यें परवांपर्यंत तरी नव्हती. शेतीसंबंधीचें गाणें नजीकच्या भागांतील बोलभाषेंतून इकडे आलें असावें.

१. पाणी चालं पाटेला सरकार पाणी चालं पाटेला ।
मळा लावला मीरचेचा सरकार मळा लावला मीरचेचा ।
मीरच्या फुला छायागार सरकार मीरच्या फुला छायागार
वांगीं फुलं घामागार सरकार .... ....
वाग लागुंदे सुंडेस[1] सरकार .... .....

२. काळा जामनीचा घोडा ब्रिडावजी .... ....
त्यावर बांबलूची गारगीर बसवजी
त्यावर इसवा इंजिन टाकवजी.

३. लेरे मुला बांगडी दणाणली
बांगडी दणाणली मोहन का तुळसी बजावली ।
आखल निखल गये मोती बांगडी.

४. खाल्लया देशाची भगुर माटी
जोडवें नाहीं मी कशी येऊं कशी येऽऽऊं कशी येऊं ग ।

१. चांगलें.

तोडा नाहीं मी कशी येऊं कशी येऽऊं कशी येऊं ग.
येळा नाहीं मी कशी येऊं कशी येऽऊं कशी येऊं ग।

शिमग्याच्या सणांत डांगी स्त्रीपुरुष एकमेकावर रंग उडवतात त्या-संबंधीचें हें गाणें पहा.

५. काळी निळी चोळी त्याला मोत्याला उंजल। मोत्याला उंजल।
नको हरी रंग टाकूं हारु भीजशी रऽ
नको हरी रंग टाकूं तोडा ,, ,,
नको हरी रंग टाकूं नथ ,, ,,

६. आखूड अंबाडी लांबा छोती रऽ कोना कारभारी हो जी।
हातमा आरसा बायको पारखा सुक्या कारभारी हो जी।

गांवांतील गुरें सांभाळणाऱ्या माणसास ढोरक्या म्हणतात.आपल्याकडे बलुतें देतात तसें यालाहि दाणे भाकरी देऊन गांवकरी याला सांभाळतात.

७. बादीर[१] भाऊ जुर्सा काठी घामण्याची।
बादीर भाऊ तुझ्या काठीला घांगुर।
बादीर भाऊ तुझ्या गायी पाला खात।
बादीर भाऊ तुझ्या मन मारवाड्याचं।

डांगच्या सरहद्दीवर मुल्हेर, हातगड, सोनगड असे किल्ले आहेत. अशा किल्ल्यासंबंधीचे उल्लेखहि त्यांच्या बोलभाषेंत आहेत.

८. बारी कसऽ केल रुई फुल व जामनेर किल्लयावर जी जी।
राजभाऊला जबाब दिला व जामनेर किल्लयावर जी जी।
माझी बमाईला जबाब दिला जामनेर किल्लयावर जीं जीं।
माझ्या ग बापाला जबाब दिला व जामनेर किल्लयावर जी जी।
माझ्या ग बाईला जबाब दिला व जामनेर किल्लयावर जी जी।

डांगी लोकांचा सर्वांत मोठा सण शिमगा. सणाच्या पांच दिवसांत ते मुळींच काम करीत नाहींत.रंगीबेरंगीं नवे कपडे नेसतात व स्त्रिया गालाला व ओंठाला लाल रंग लावतात. गुलाल खेळतात. लाल रंग त्यांना खूपच आवडतो.

---

१. गुरें पाळणारा.

( शिमगा )

९. होळी बाई सयले एका मुलालींचा माल ।
माझें जोडवें झालें लाल । माझें जोडवें झालें लाल हो ।
माझे हारु झाले लाल । माझे हारु झाले लाल हो ।
माझे तोडा झाले लाल । माझे तोडा झाले लाल हो ।
माझे सांखळा झाले लाल । माझे सांखळा झाले लाल हो ।

डांगी लोकांचीं लग्नें फार उशीरां—कधीं चार मुलें झाल्यावरहि होतात. वाङ्निश्चयावरच संसाराला सुरुवात होते. वधूवरांचें पटलें नाहीं तर वाङ्-निश्चय मोडतां येतो. लग्नें एका वेळीं ४।६ जोडप्यांचीं लागतात. त्यासाठीं ते नजीकच्या भागांतून मुद्दाम ब्राह्मण लग्नाला बोलावतात. लग्नांतलीं हीं गाणीं पाहा.—

१०. वाघुटीच झीरा उपसूं गायी गायी गाऽऽयी गायी ।
ये रऽ भाऊ पाणी पी ये । माझ्या डोळ्या आसवी ये पाणी ।
ये रऽ भाऊ भोजना करऽ ।

११. बारीक दोरी राजे ऽ ऽ चालीलं ।
हारु लेरऽ राजे ऽ ऽ रानीलं ।
साडी लेरऽ राजे ऽ ऽ रानीलं ।
तोडा लेरऽ राजे ऽ ऽ रानीलं ।
सांखळा लेरऽ राजे ऽ ऽ रानीलं ।

१२. पाराची[1] गाठी तुटली व्ह माय माझ्या पाराची गाठी.....
सासुचा झगडा लागला माय .... ....
तहुन पळाया लागलं माय .... ....
मणी त विवाया लागलं माय
देश त वताङ्कलं[2] लागलं माय.

दोन बायका करण्याची प्रथा डांगी लोकांत आहे.

१३. घटका दिला मी आंबुण्याला । आंबुण्याला ऽऽ हो ।
दोने सवतीच्या भांडणं झालं हो । भांडण झालं हो ।

---

१. मण्याची. २ धरण्यासाठीं.

दोने सवतीच्या झिट्ट्या मिल्या हो । झिट्ट्या मिल्या हो ।
तेला लईन चौखुन भाकर । चौखुन भाकर हो ।

डांगी स्त्रिया अंगावर खूप दागिने घालतात. ते सर्वसाधारणपणें कथिलाचे असतात.

१५. कागद झीगीमीजी फुलक्याचा डांग ।
पायींचा तोडा मला नाहीं व टोल ।
पायींचा जोडवा मला नाहीं व टोल ।
गळ्याचा हार मला नाहीं व टोल ।
डोर्काचा सांखळ मला नाहीं व टोल ।

१६. पाण्याला जाते झोके देत बाईऽग ।
तढ उभा धाकला च देर ग ।
तेन हो धरली माझी मांटी बाई ग ।
माझा हो सासरा दुगड[1] भारी आहे ग ।
मार हो दिदा चौऱ्याचा[2] बाई ग ।
दुगट चौऱ्याचा

१७. बारीकु दोरी वळी हो ।
नवरीचे सकाळला बेगुड करा माणकु करा ।

१८. पिकेल डांबरीखालीं पोटींनी डाव ज मांडीला जी रामू ।
ना रस्त्यांत चालला री रामू
बा जुगाला फिरेला री रामू
बा येऊद करेला री रामू ।
बा भाणुण करेला री रामू ।

१९. लग्न बी नवतो करूं बाबोजी ।
सासूची माया हो बाई मला नाहीं सुटली ।
सासऱ्याची माया हो बाई मला नाहीं सुटली ।
नंदेची माया हो बाई मला नाहीं सुटली ।

२०. मावलींचे दुरंगी कांडेला । कमद्या[3] भात मी कांडेला ।
कोण्याच्या हो लग्नाला कांडेला । कमद्या भात मी कांडेला ।

---

१ दुष्ट. २ चाबकाचा. ३ कमोद.

काकडच्या[1] हो लग्नाला कांडेला । कमद्या भात मी कांडेला ।
बाबलूच्या हो लग्नाला कांडेला । कमद्या भात कांडेला ।
गंगजूच्या हो लग्नाला कांडेला । कमद्या भात मी कांडेला ।

२१. सीताबाईला मागण करूं बाईला मागण करू ।
तपि तोडील तोडील नाहीं हो तपि तोडील तोडील ।
सीताबाईला समजून येईल व तपि तोडील । तोडीलें नाहीं हो ।
सीताबाईला राग येईल बाईला । जाऊन बशील पेट्यांत नाहीं हो ।

२२. आम्हीं चमचमत बिजलं जसं ।
फासा टाकुनि मारली माशी[2]।
मासा विकुनि लयली साडी ।
मासा विकुनि घेतला चोळी ।

२३ चांदबूकी बाई तूं ।
मान्या मांडीवर तानं बाळ ।
घडलिला शंभराचा ।
त्याचं नांव मोतीराम ।
त्याला सुरगाण झाले मधीं ।
एक आकडा चुकत होता ।
मला मास्तर मारत होता ।

२३. चांदबूकी बाई तूं ।
मान्या मांडीवर तान बाळ ।
घडलिला शंभराचा ।
त्याचं नांव मोतीराम ।
त्याला सुरगाण[3] झाले मधीं ।
एक आकडा चुकत होता ।
मला मास्तर मारीत होता.

फावल्या वेळांत नाचणें आणि गाणीं म्हणणें हा डांगी लोकांचा छंद आहे. क्वचित् प्रसंगीं तोंडाला कागदी मुखवटे लावून ते कांहीं नाटय-

१ काकडच्या—पुरुषाचें लाडकें नांव. २ मासे. ३ डांगशेजारीच नाशिक जिल्ह्याचा आदिवासी सुरगाणा भाग आहे.

प्रकारहि करतात. गाणीं म्हणतांना बायका एकमेकींस अगदीं चिकटून बसतील. गाणीं एकटी बाई किंवा पुरुष कधींहि म्हणणार नाहींत. त्यांना साथ करणारी मंडळी नजीक असली तरच गाण्यास सुरुवात होते. चार ओळींचा एखादा तुकडा म्हटला कीं मग सर्वजण मनसोक्त हंसतात. हंसणें हीच त्यांच्या जीवनाची गुरुकिल्ली आहे.

☆ ☆ ☆

## ३. डांगमधील आदिवासींचीं लोकगीतें

संग्राहक : **सौ. विमल मोहिले,** एम्. ए.

नाशिक, सुरत आणि पश्चिम खानदेश या तीन जिल्ह्यांनीं वेढलेला, घनदाट वृक्षवेलींनीं व्याप्त असा एक सातपुड्यावरील उंच भूप्रदेश म्हणजेच डांग जिल्हा. त्याला जिल्हा म्हणायचें इतकेंच. वास्तविक त्याचें क्षेत्रफळ एखाद्या तालुक्याइतकेंच आहे. उंची समुद्रसपाटीपासून जवळ जवळ दोन ते तीन हजार उंच असून पावसाळ्यांत भरपूर पाणी पडतें. त्यामुळें कित्येक ठिकाणीं अरण्य इतकें दाट आहे कीं, तेथील भूमि खरोखरीच ‘ असूर्यंपश्या ’ आहे. वाघासारखीं हिंस्र जनावरें आणि नागांसारखे विषारी जिवाणूहि तेथें भरपूर दिसतात.

असा हा डांग जिल्हा म्हणजे छोट्या छोटया संस्थानांचा एक समूह आहे. तेथील वस्ती बहुतेक भिल्लांचीच आहे. पावसाळ्यांत शेती करणें व इतर वेळीं शिकार करणें हाच त्यांचा उपजीविकेचा मुख्य व्यवसाय. जमिनीवर मालकी हक्क कुणाचाच नाहीं. कुणीं कुठेंहि झोंपडें बांधावें आणि धान्य पेरावें. एका ठिकाणीं कायम राहणें त्यांच्या रक्तांतच नाहीं. वर्षांतून ९।१० महिने कंदमुळें व पाला यांवर राहणाऱ्या या वन्य जमातीचें करमणुकीचें एकमेव साधन म्हणजे नृत्यगायन. त्यांच्या हिशेबीं नृत्य व गायन हीं दोन नाहींत. ते नाचतांना गाणीं म्हणतील व गातांना नृत्य करतील. नृत्यगायनाची त्यांना अतिशय आवड आहे. त्याच्यापुढें अत्युत्कृष्ट नाटक, सिनेमाहि त्यांना तुच्छ वाटतात. कुठेंहि ढोलक्यावरची थाप अथवा

गाण्याची लकेर ऐकूं आली कीं डांगी लोक असतील तेथून आणि असतील तसे धांवत येतील.

डांगी लोकगीतें छोटीं छोटीं असतात. परंतु त्यांच्या म्हणण्याच्या पद्धतीमुळें एक एक गाणें अर्धा अर्धा तास सुद्धां चालतें. स्त्रिया व पुरुष एकत्रच गाणीं म्हणतात व नृत्य करतात. गाणीं म्हणणाऱ्यांचे दोन गट करतात. प्रथम एक गट एक चरण म्हणतो. तोच चरण दुसरा गट म्हणतो. पुन्हां पहिला गट तोच चरण म्हणतो. अशा तऱ्हेनें एक एक चरण पंधरा वीस वेळां म्हटला जातो व छोटें गाणें एक एक तास पुरतें.

डांगमधील भिल्ल-भिल्लिणी डांगच्या 'असूर्यंपश्यां' भूमीवर राहत असले, आपलीं घरेंदारें सोडून उतरले नसले तरी बाह्य जगाचें ज्ञान त्यांना मुळींच नाहीं असें नाहीं. ते म्हणतात—[गाणें म्हणणारे भेंडमाळ गांवचे राशी कडू, हिरू आरड्या, सुंद्री पांड्या, नवसा आवजो )

१. गवळीच्या त्या देवी बाई ईवनांत[१] बसेला
ईवनांत बसेला बाई ईवन उडवेला
ईवन उडवेला बाई कैलासीं व लावेला
कैलासीं व लावेला बाई मुंबई सहराला
मुंबई सहराला बाई ईवन उतरेला
ईवन उतरेला बाई इंग्रज लोकांनीं
जहाज जोडेला व जहाज जोडेला
इरोप देशाला व इरोप देशाला
बाई जहाज व चालेला बाई सायब र उतरेला
सायब उतरेला बाई घराला व चालेला.

हिंदूंचें पवित्र क्षेत्र वाराणशी त्यांना माहिती आहे. मात्र काशी-विश्वेश्वराऐवजीं त्यांनीं त्यांच्या देवाची, मारुतीची तेथें स्थापना केली आहे. एक भिल्ल वधू म्हणते—

२. राया नाचूं चला, वाऱ्या नाचूं चला
वारीन काशीला देऊळ बांधला

१ विमान.

देऊळ कश्याला मारवती बसवाया
मारवती कश्याला नवस बाळियाला.

एका भिल्ल युवकाला आपल्या मैत्रिणीला देशभर फिरवून आणण्याची महत्त्वाकांक्षा आहे. तो म्हणतो—

३. तुझ्यासाठीं वरी निंब याला दोन ग
मुंबई याची हवा पायाला ग
सुरती चीनी हवा पायाला ग

अशा तऱ्हेनें ते दोघेहि बडोदा, नवसारी, अहमदाबाद, अलाहाबाद इ. अनेक मोठमोठ्या शहरांची हवा खाऊन परत डांगला येतात.

विवाहानंतर दोघी मैत्रिणी एकमेकींना भेटतात. एकमेकींची थट्टामस्करी करतात. भेटायला गेलेल्या मैत्रिणीला आपल्या घरीं चालत जाण्याचा कंटाळा येतो. अनेक मैलांचें अंतर कापायचें आहे. ती म्हणते—

४. ये इच्या घर व घोडा बी नाहीं आहे घोडा बी नाहीं
आमचे पाहि[1] भंगेलो भारी व भंगेलो भारी
घोडा बी व्हता लष्करीं नेला व लष्करीं नेला
ये इच्या घर गाडी बी नाहीं व गाडी बी नाहीं
येवदुस घर गाडी बी नाहीं व गाडी बी नाहीं
गाडी बी व्हती लष्करीं नेली व लष्करीं नेली
ये इच्या घर मोटर बी नाहीं व मोटर बी नाहीं
मोटरबी व्हती लष्करीं नेली व लष्करीं नेली.

पायीं चालणें हेंच ज्यांचें एकमेव वाहन त्यांना नागरी वाहनांची चांगली माहिती आहे. तथापि हीं कृत्रिम वाहनें किती परावलंबी असतात तें पाहा—

५. इकून दरे तिकून दरे मधीं आहे व जमीन तर
सायकलीचे तुटले हार कशी बसूं व सायकलांत
मोटारीचे तुटले हार कशी बसूं व मोटारींत
टांग्याचे तुटले हारे कशी बसूं व टांग्यांत
शांभर रुपये मोजून कशी बसूं व टांग्यांत.

१. पाय.

त्यापेक्षां आपली पायगाडी बरी. कुठंहि, केव्हांहि जावं. २०-२५ मैल वाटचाल म्हणजे फार नाहीं. अशाच दोघी बहिणी खरेदीला निघाल्या आहेत. सासरचें मूळ आलें आहे. डांगमध्यें कुंकू कुठें मिळणार ? तेव्हां घाटावर निघाल्या आहेत—

६. घाटावरूनी ग घाटावरूनी
दोघ्या बयनी आम्हीं घाटावरूनी ग
आम्हीं दरड चढिऊन व दोग्या बयनी
आम्हीं लुगड्यासाठीं व दोग्या बयनी
आम्ही कुकुसाठीं व दोग्या बयनी
आम्हीं गरसोळसाठीं व दोग्या बयनी
आम्हीं नवरा मूळ आनी व दोग्या बयनी.

डांगी स्त्रियांचे अलंकार म्हणजे पितळेच्या सांखळया अगर चवल्या, पावल्या व रुपयांच्या माळा. कानांत तांब्यापितळेची, क्वचित् चांदीची सुंकली. त्यालाच साजेसा पोषाख. स्त्रियांच्या कमरेला घट्ट कासोटा घातलेलें लुगडें, अंगांत चोळी व डोक्यावरून चादर. पुरुषांच्या कमरेला रुमाल आणि अंगांत कुडतें. डोक्याला रुमाल किंवा पागोटें असलें तर असलें, नाहीं तर नाहीं. तथापि या वनवासींना नागरी वस्त्रालंकारांची माहिती आहे. एक वधू आपल्या पतीला म्हणते—

७. बोला हो बोला कांहीं तरी म्होरं जी बोला
राया मी बोलायची नाहीं हो कधीं
सखे मी बोलायची नाहीं हो कधीं
दिपाळी शाल्ह आलाया कधीं.

ही नववधू शाल्हसाठीं रुसली आहे तर एक प्रौढा बंगल्यासाठीं सगळे दागिने मोडायला निघाली आहे. खालीं दिलेलें गाणें 'छेकडा' प्रकारांतील आहे. 'छेकडा' म्हणजे 'लावणी'. स्त्रिया सहसा हीं गाणीं म्हणत नाहींत.

८. कडु जी राया जीव माझा रमिला
बंगली बांधाया हा बंगली बांधाया

पायाचा तोडा मोडला का तोडला बंगली बांधाया
गळेचा हारु मुडला का तुडला बंगली बांधाया
नाकाची नथ मुडली का तुडली बंगली बांधाया
दंडाची येळी मुडली का तुडली बंगली बांधाया
कानाचे काप मुडले व तुडले बंगली बांधाया.

पतिपत्नींचें भांडण आणि काडीमोड हा जणुं डांगी लोकांचा स्थायी भावच आहे. अशीच एक पत्नी पतीला सोडून निघाली आहे. तिनें जाऊं नये म्हणून पति तिला निरनिराळीं प्रलोभनें दाखवीत आहे. (म्हणणारे—बायजु अनाजी, पातु डग्या, रेवती सुकूर, लासी जान्या.)

९. तुझी किनार पिवळी दिस
हारु या जोड जोड या जोड
आडवा धरूं व जोड या जोड
आडवा धरूं व येळ या जोड
आडवा धरूं व सर या जोड
आडवा धरूं व काप या जोड
आडवा धरूं व नय या जोड
किदर मोरे कानानी
कुठं व जाते सोडूनी
खायाला पान इडा
तुला बसाया देतों गादी पलंग
पियाला देतों झारी पानी
खायाला देतों साखर पेढा
तोंड पुसाया देतों कोरा रुमाल.

असें जरी असलें तरी त्यांच्या लेखीं अधिक किंमत नैसर्गिक फुलनाच. कानांवर फुलांचे झुबके ठेवण्याची हौस सर्वांनाच—विशेषतः पुरुषांना फार. चांगलीं फुलें कोठें मिळतील, कोणतें रान फुलांवांचून ओ दिसतें हें त्यांना माहिती आहे. ते म्हणतात,

१०. गादवीच्या' रानाला र फुलं नाहीं मिळ काना र
मन देहेर'च्या रानाला र मन फुलाचा झुबकल काना र

प्रिंप्रीच्या[1] राना र फुल नाहीं मिळ काना र
वासुर्णाच्या[1] राना र फुलाचा झुबुक काना र र
सुरगाणच्या[1] राना र फुल नाहीं मिळ काना र
वासदाच्या[1] राना र फुलाचा झुबुक काना र.

नृत्य-गायन हें डांगी लोकांचें जीवन आहे. निरनिराळ्या विषयांवर, निरनिराळ्या प्रसंगांवर त्यांनीं गाणीं रचलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीं दिलीं आहेत.

दिवाळीचें गाणें

११. दिवाळीचा थाट ना आई पाहील वाट ना
राया माहेरीं जाऊं द्या ना राया हो
भाऊ येईल संदेकाळीं आलास मजला नेयाला
बसा नि पाणी प्या ना
किराडिल भात ना
तांबानीचा थाट ना
उरील ती राहूं द्या ना
मी तर माहेरीं जातां व प्रेमीच्या पांखरा.

बांबूचें गाणें

१२. जाळीच्या पात्राला निकल सोन्याच्या
तारा सोन्याच्या तारा निकल सोन्याच्या तारा
तारा तुटूं दे माझा ढोल येऊं दे
ढोल्या येऊं दे माझा ढोल्या येऊं दे

शिकारी

१३. राग दरा साग दरा व मन दरा व
नाहीं बरा रे मन दरांत नाहीं
बरा रे मन खडकाला पाझरा
खडकाल पाझर रे मन हिड्यानी देखेला रे
हिड्यानी देखेला रे मन भोगटीं घातेला रे

१. डांगमधील निरनिराळीं राज्यें व डांगजवळील संस्थानें.

मन सात मारा पाडे रे
सात मारा पाड्याला रे चार मारा
झोकला रे चार मारा झालेला रे मन
मोर हानला मान्यांत रे मोर हानला मान्यांत रे
जाऊन पडला पाण्यांत रे जाऊन पडला पाण्यांत रे
मन हिड्यांनीं धरेला रे
हिड्यांनीं धरेला रे मन घराला चालेल रे
घराला चालेला रे मस्यार बनवेला
मस्यार बनवेला रे सगोती बनवेला रे.

ठाकऱ्या—हा एक नृत्य-प्रकार आहे. हें नृत्य बसून करावयाचें असतें.

१४. किखऱ्या डोंगरू र होरे वाकसाना तासेला र
वाकसाना तासेला र ढिलपी उडवेला र
ढिलपी उडवेला र समदाराच्या कांठीं र
समदाराच्या कांठीं र जाऊन पडला र
जाऊन बसला समदीर वाचेला र
समदीराला वाचेला र.

जंगलदेव, वाघदेव, हीं डांगी लोकांचीं दैवतें. जंगलांत ठिकठिकाणीं एखाद्या शिळेवर वाघाचें, वेताळाचें क्वचित् मारुतीचें चित्र खोदलेलें दिसतें. तथापि राम, सीता, यशोदा, कृष्ण इत्यादि देवतांच्या कथा त्यांना माहिती असाव्यात हें खालीं दिलेल्या गाण्यांवरून दिसतें.

१५. तारु तारु रामुराया नमु राया जन्मु गेला वाया
रामु तुजी भाजी गेली व गेली
बारवेला पाण्या गेली व गेली
पाणी भर उडी दुडी व पाणी भर उडी दुडी
सीताबाई पाणी भर व पाणी भर उडी दुडी.

१६. गौळन म्हणते गौळनीला ग
यश्वदेला झाला बाळ व बाळा झाला
पाण टाकते ये वळणीला तान्ह्या बाळा झोका देतो
हात दमले व झोका देता हात दमले.

कारल्याचें गाणें —( कारलीं-भाजी)

१७. कुपीला कारेळू गड्या जमने कुपीला कारेळू
मांडवू लागेला गड्या जमने मांडवू लागेला
येलीया गोवेला गड्या जमने येली या गोवेला
येली या गोवेला गड्या जमने फुलेला घामा घोर
फुलेला घामा घोर गड्या जमने कारेळू लागेला
कारेळू लागेला गड्या जमने कारेळू तोडेला
कारेळू तोडेला गड्या जमने भाजी या बनवेला.

१८. साती गौळ्याच्या सुना हो जाई बारवाला
पाण्या हो घागर बुडे, चुंबळ पडे हो
घागर आली पातळ पाण्याला
चुंबळ आली माघार मासानी
देरे देरे माझी घागर
देरे देरे माझी चुंबळ
खुरला आंबा भरला हांडा
डवला गेला नवश्या नगरीं हो
नवश्या नगरीं कांहीं कामा हो
कुठें आहे बाळू वाण्या हो
तठ आहे बाळू वाण्या हो
त्याचं आहे देऊळ कण्या हो
तिला जाऊन मागं आणूनि हो
तिला लावी पर आणूनि हो.

अशा प्रकारचीं असंख्य विषयांवरील असंख्य गाणीं डांगमधील त्या वन्य जमातींच्या तोंडांत अहर्निश खेळत असतात. त्यामुळेंच त्या अर्धपोटी, अर्धनग्न स्त्रीपुरुषांचें कष्टमय जीवन त्यांना सुसह्य वाटतें.

☆ ☆ ☆

# भिल्ल समाज

## १. भिल्ली लोकसाहित्य

संग्राहक : **उमेश बळवंत बिटेकर** बी. एस्सी., मनमाड

**राहणी :**—बहुतेक गोंड, नागा यांसारख्या मागासलेल्या जमातीप्रमाणेंच भिल्ल डोंगराळ भागांतच जास्तकरून राहतात. ज्या ठिकाणीं आपल्या पोटापाण्याची व्यवस्था व लपण्यास उत्तम जागा असेल असें त्यांना वाटतें तेथेंच यांची वस्ती असते. हे अशिक्षित असून त्यांचीं घरें उतरत्या छपरांचीं असतात. धनुष्यबाण हें त्यांचें हत्यार.

**देवदेवता :**—इटे भगत व म्हसोबा हे त्यांचे देव. म्हसोबापुढें बकऱ्याचा बळी दिला जातो. लग्नाच्या वेळीं इटे काढतात. त्या वेळीं सुद्धां बकरा कापला जातो.

**आचारविचार :**—शिक्षण घेणें पापकृत्य आहे असा यांचा समज असतो. लग्नाचा दिवस मोठा सण समजला जाऊन तें मोठ्या थाटामाटानें होतें. एकुलता एक मुलगा असेल तर थाटमाट फारच जोरदार असतो. त्या प्रसंगीं डागडागिने व इतर महत्त्वाचें सामान गहाण ठेवून कर्ज काढतात व थाटमाट करतात.

### लग्नाचीं गाणीं

गाणें १ लें

बांबेरलकी नाटक तूं भेंक दे उठा दे ।
आम्ही फाटी खेलनेवाले तूं गीम लगा दे ।
बांबेरलकी नदीवाले भेंक दे उठा दे ।
आम्ही नलके पानी पिनेवाले गल्लास लगा दे
भैया गल्लास लगा दे ।
बांबेरलके हॉटेलवाले भेंक दे उठा दे ।
भैय्या भेंक दे उठा दे ।
आमी चायके शिंगलवाले गिम लगादे
भैय्या गिम लगा दे ।

हें वरील गाणें १०–१२ वर्षांपासूनच गाण्याची प्रथा पडली. त्या आधीं ही प्रथा नव्हती. पूर्वींपासून म्हटलें जाणारें गाणें खालीलप्रमाणें—

गाणें २ रें

डोंगराला पडी गई वाट, माय मना जालमले ॥ ध्रु० ॥
खोकट उनी दिनी गोंडा घोर्लीये ।
कशी तोडूं बोलनी भाजीये
डोंगराला पडी गई वाट, माय मना जालमले ॥ १ ॥
ससा उना दिना तेर्वा भुसकारी मारीये ।
कशी तोडूं थोडनी भाजीये
डोंगराला पडी गई वाट, माय मना जालमले ॥ २ ॥
कोल्ला उना देनी तेर्नी हुकीये ।
कशी तोडूं घोलनी भाजीये ।
डोंगराला पडी गई वाट, माय मना जालमले ॥ ३ ॥

हें गाणें जेवणाचा स्वयंपाक करीत असतांना म्हणतात.

गाण्यांना नाच, लेझीम व ढोलकें यांची साथ असते. घरांत कोणी आजारी पडलें कीं त्यास देवीनें धरलें असें समजतात. मग जवळच्या देवळांत जायचें व देवास आळवून ऐपतीप्रमाणें नवस करायचा. खंडोबा, म्हसोबा, देवी इत्यादि निरनिराळ्या देवदेवतांची पूजा करावयाची. हे लोक जरी गरीब असले तरी नवस पूर्ण करतात. मुलाच्या लग्नाच्या वेळीं गोंधळ काढतात. लग्नाच्या अगोदर नवरदेवाच्या आईला बोकड कापून मुलाचा नवसाहि पुरा केला जातो. नवस पुरा न केल्यास देवी आपल्यावर कोपून आपल्या घरादारांचा नाश करून धुळीस मिळवील अशी त्यांची दृढ समजूत असते. लग्नकार्यांत कपडे व सुग्रास अन्न यांवर भरपूर खर्च केला जातो.

**व्यसनें व संवयी :**—हे लोक दारू पिऊन नाच करतात. नाचण्यामध्यें त्यांना फार हौस वाटते. चिलीम ओढणें, मासे धरणें, शिकार करणें, मासे मारणें, पक्षी धरणें इत्यादि त्यांच्या संवयी होत.

**आवडीनिवडी :**—लग्नांत दारू पिऊनच नाच करणें. वाटेल त्या व वाटेल तशा शिव्या देणें. पुरुषांनीं लुगडें नेसून नाचणें. कारण नसतां देवीस निरनिराळे नवस करणें व फेडणें. लग्नांत नवरदेव व नवरी

यांना खांद्यावर घेऊन नाचणें. लग्नाच्या जेवणांत तेलगुळाचें जेवण जो करील त्यास फार मोठा मानतात व त्याचा सदासर्वदा मानसन्मान करतात.

(निवेदक : श्री. द. शि. गोसावी.)

**लग्नाची चाल** :--प्रथम चारपांच खेड्यांवर वराकडचीं माणसें मुलीला ठेवून लग्न ठरवतात. स्वतः लग्नास आमंत्रण देण्याची पद्धत असते.

लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं लिंब अथवा जांभळांच्या झाडाचीं चार लाकडें उभीं करून त्यांवर मंडप घालतात. पडदे वगैरे नसतात. नंतर वरास स्नान घालतात तेव्हां गाणें म्हणतात व खूप हळद लावून बाशिंग बांधतात व हातांत कंकण बांधतात.

नंतर वराकडील माणसें व वर हे सर्व १,२ वाजण्याच्या सुमारास वधूच्या गांवीं जातात व रात्रीं ३,४ वाजतां लग्न लावतात. तेव्हां जेवण वगैरे नसतें. पुंगी व त्यावर ताल धरणारे डफ यावर नाचतात. लग्न लागल्यावर घाईनें घाईनें गाणीं म्हणत म्हणत नवऱ्याच्या घरीं वधूस घेऊन येतात. तेथें त्यांच्या ओळखीच्या ठिकाणीं जाऊन जेवण व आंघोळ करतात. असा विवाहाचा कार्यक्रम असतो.

त्यांच्यांत कांहीं चाली चांगल्या तर कांहीं अत्यंत वाईट असतात. भुतेंखेतें, ग्रहांचे शुभाशुभ, देव, नवस किमया, रमल इत्यादींवर त्यांचा विश्वास असतो.

नवसामुळें ऐच्छिक काम चांगलें होतें व मग तें झाल्यावर देवाला संतुष्ट करण्यासाठीं एखाद्या प्राण्याचा बळी द्यावा अशी प्रथा आहे.

**समजुती**:—खालील आचार-विचारांवर त्यांचा विश्वास असतो.—

( १ ) मध्यरात्रीं, अमावास्येच्या भर दुपारीं कुत्रा भुंकला कीं, माणसें मरतात.

( २ ) मांजर आडवें गेलें कीं काम होत नाहीं.

( ३ ) झोंपतांना पालथें झोंपूं नये.

( ४ ) पायांत अढी घालून झोंपल्यास वाईट स्वप्नें पडतात.

( ५ ) बसतांना पालथी मांडी घालूं नये.

( ६ ) अमावास्येच्या दिवशीं जंगलांत पडूं नये अगर घरीं लाकडें आणूं नयेत.

( निवेदक : दिलीप भोसले )

( ७ ) संक्रांतीच्या दिवशीं शिकार केली तरच फक्त वर्षभर शिकार मिळते. संक्रांतीस शिकार मिळाली नाहीं तर मग वर्षभर फार हाल होतात. शेवटीं घरदार सोडून उपाशी राहावें लागतें व ईटे भगत हें त्यांचें दैवत खवळतें व जन्मभर डाव धरून त्रास देतें.

## म्हणी व उखाणे

( १ ) जाळावांचून कड नाहीं, मायावांचून रड नाहीं.
( २ ) सून वनी घरांत, सासू पडनी घरांत.
( ३ ) माय जळस, लेक शिजस. ( तुरकाडी )
( ४ ) काळी काडीना हात लावायान आन् झेंडूना फुल झेल्यान ( साप व विंचू )
( ५ ) एवढसं कारटं चटणी किती खातं. ( वांगं )

नांव घेण्याचा उखाणा—चांदिनं धंगाळ अंघुळीले, जरीकांठी धोतर नेसाले, चंदनपाट बसाले, केसरी गंध लावाले, दिल्लीना आरसा पाव्हाले, भागवत वाचायलें, चांदिना गडवा पेला आन् गंगा भागीरथीनं पानी यांची पकवान भोजन खावाले, वर तरे तेरन्या, कोसिंबीरी, सतरंजीना सोभा, कान गोळ्या धारन्या, चुना लोनावळाना, जायफळ नगरना, जायपत्री मद्रासनी, चिकण सुपारी सोलापूरनी, एवडं सामान विडानं, ताट बीलावरनं, घुंगरसनं आडकित्ता, हंडया झुंबरनं लखलखाट, समया लाया तीनसे साठ, आणि ××××××× रावांच्या जीवासाठीं ती हा कया थाट.

( एवढा एकच नांव घेण्याचा उखाणा मनमाडमधील भिल्ल जमातींत प्रचलित आहे. )

( निवेदक : सखारामराव. )

उखाणे व चुटके चटकदार असून ते बहुधा मराठी उखाण्यांशीं जुळतात.

उदा०—आदिवासी उखाणा—' काळी गाय कांट खाय, पानी बगून सनें उबी व्हाय. ' ( चप्पल )

मराठी उखाणा:—' काळी गाय, कांटे खाय, पाणी पाहून उभी राहे. ' ( चप्पल )

आदिवासी उखाणा:—' एवसा गडू भुईमान छू. ' ( कांदा )

मराठी उखाणा:—‘ एवढसासा गड्डू जमिनींत दडूं ’. ( कांदा )

आदिवासी चुटके व म्हणींचा सुद्धां वापर करतात. कांहीं कोडीं व म्हणी खालीलप्रमाणें:—

( १ ) नांव नांव नी काय बिशाद...........मना खिसांत.

( २ ) जिकडे गई वाजं तिकडे गई सांज.

( ३ ) दिसायाते गीरती अन् गांव भर फिरती.

( निवेदक : सीताराम कापसे. )

## भिल्ली गोष्ट

### (१) शिरमंत व्हा

एक आपली जात म्हानलाच पोऱ्या व्हता. तो शाळामान जाये. तठे त्यांनीं एक राजाना पोऱ्यासी वळख पडी. हौ आपली जातवाला भिलना पोऱ्या त्यांना सारखा रव्हाले लागा तव्हळ त्या तठं बापना त्यालेय घूस. आपन गरीब आदमी संत. आपून लोकास्नी असा थाट नहीं कराले पाइजे. त्यानासाठीं आपुलाजवळ ना पैया ना कांहीं. पन् त्या पोऱ्यानं नहीं मीन. तो एक दिन नदीकांठं धरीधरी पालना लांब. रस्त्यारनाव त्यानंसे लागली तिस ( तहान ). त्यानं एक झीरामान पानी पिधं तठे त्याला दोन लाल गोह्या दिखन्यांत तो परत घर चला वग.

रवि दिन तो राजानं घर त्यांना पोऱ्यासंग खेनव लागत्रा तवळ त्या गोत्या त्यानां बापनं पाह्यात. राजाले ठाऊक हतकीं ह्या हिरावा एकडा व्हति मनून सने त्यानं त्याके घरभर जवाहा पिनात अन् त्या बोल्या लैलीनात

त्यांना बापलं हें जवळ समजलं तवळ त्यासनं दिन खुळे तायात आणि त्या जशा शिरमंत जयात तसे तुमी आमी वै जों अमनी गोट से.

( निवेदक : रामड्या भिल्ल. )

### ( २ ) वनवाळा

आटपाट नगर व्हतें. तेथें एक गरीब म्हतारी रहात व्हती. तिले ना मुल ना बाळ. दळण कांडण करावं, पोट भरावं. पण तिले वनाया एकलकोंड्या आयुष्यना कटाळा. एक दिवस ती गयी ज्योतिबा देवकडे, देवनी पुजा कर्यी आणि एक वर मागा. “देवा महाराजा, मी तुला सोनाना

करगुटा दिव, मना घरांत पाळणा झुलूं दे. लकसमी खेळूं दे. तुला मी नवस फेडसूं. '' मग देव भक्तावर प्रसन्न झया. बाईनी मागनी मान्य करवी.

व्हतां व्हतां बाईना घरांत पैसा खेळूं लागला, कष्टले विसावा मिळा. पण त्यावात तिनें नवस फेडाया ध्यान राहिन नहीं. देवळे वना तिना राग. व एक दिवस देवन बैराग्यानं सोंग घिदं. तो तिला घर गया. त्यानं भिक्षा मांगी. जातां जातां तो तिला दारांत थुंकना तन्ये देठ उगवना. भाईनं त्यांची भाजी खादी. नियले दिवस एक गमात ती बाळतीन गयी. बाईला मूल व हुआ डुक्कर जय. तिनं छाती दडवी गयी. पण डुक्करसारखी ही पोरगी ही मानसासारखी बोले, हसे खेळे त्यामुळें तिन तिले न्हावावं धुवावं, चांगलं जेवण घाल.

एकदीन गल्लींतल्या पोरींसबरोबर ही झोक्यास लाह्या धी सने खेळाले निघवी पण तिलये पोरी खेळूं देत ना. जिनं तिनं तिलये दगड मारत पण ती गयी कयी पालेण्यकोस्तर खेळणीं तव्हळ ती एकटीच थी मग तिनं सुंदर पोरगींत रूपांतर जय राजाना पुवानं तिनं पाह्यलं. त्यानं तीवर मन बठनं. तो तिनाकडे गया तर्शा ती डुक्कर गयी. मंग घर गयी.

पण पोरानं तिना ध्यास धिया. बापाबरोबर भांडीसव त्यानं तिना संगें लग्न कय. पहिल्या दिवशीं राजपुत्र पलंगावर मऊ गादीवर झोपना. शेजारीं डुक्कर सारखी पोरगी झोंपनी. लोनाना मुलाचं नवल वारख. गांव भर हा विष्य हुआी गया. पण राजपुत्रना डोळा लागतांच तिनं सुंदर रूपांतर जय. दुनियलं सर्व सुख देवनं विवात मोती दीध. राजानं पोर हात लावतांच तिन डुक्कर जय. मग त्यांत तिलगे विचार, "असं का व्हस ?" त्यावर पोरधीन आईन ज्योतीबाच्या नवसाची माहित्या दिधी. राजपुत्रना देवाला करगुटा सोन्याचा दिधा. ती सुंदर मुलगी जयी. दोघासनें सुखानं संसार कया. सर्वकडे आनंद जया.

( ही कथा भिल्ल जमातींत फार पूज्य मानली जाते व म्हणून ठरवलेला नवस ते कोणत्याहि परिस्थितींत पुरा करतात. )

( निवेदक : सीताराम )

☆ ☆ ☆

## २. तडवी भिल्ल

संग्राहक : **प्रा. दा. गो. बोरसे**, अकोला

निवेदक : **सौ. सुशीलाबाई बोरसे**

पूर्वखानदेश जिल्ह्यांत धर्मांतर केलेल्या भिल्ल लोकांना तडवी अशी संज्ञा आहे. तडवीमध्यें दोन पोट जाती आहेत. यावल रावेर भागांत राहणाऱ्या तडवींना तडवी पठाण म्हणतात. त्यांची भाषा हिंदी-मराठी मिश्रणानें बनलेली आहे. जामनेर पाचोरें भागांत राहणाऱ्या तडवींना खानदेशी तडवी म्हणतात. अंगानें काळे आहेत. तथापि तेलगूपेक्षां पुष्कळच उजळ रंग त्यांचा आहे. नाक वासकट. उंची ५ ते ५।। फुटांपर्यंत आढळते. त्यांची आर्थिक परिस्थिति अत्यंत खालावलेली आहे. बहुतेक स्त्री-पुरुषांना मोलमजुरी करूनच पोट भरावें लागतें. भिल्ल जमातींचा इनामदारीचा गुण यांच्याहि अंगीं दिसून येतो व सधन व्यापारी, शेतकरी घराची व शेताची राखण करण्यासाठीं यांची मुद्दाम नेमणूक करतात. हे राखणीस असतांना शेतांत आलेले १६ आणे पीक घरांत येऊं शकतें.

मी परंपरागत भिल्ल भूमिचा दास
तुजपासुन लाभो पोटापुरता घास
लखलाभ असो तुज सनदेचा अभिमान
तुम्हि ऐदी मालक माती पाचोळ्याचे
मोहवी सदा मज हिरवें रूप महीचें.

असा यांचा बाणा. पोटापुरती भाकर व अंगावर लज्जारक्षणासाठीं फाटकीं वस्त्रें मिळालीं तरी त्यांत संतोष मानणारा हा वर्ग आहे. मोलमजुरी नाहीं मिळाली तर जंगलांत जातील व तेथून ५ मैलांवरील गांवापर्यंत फॉरेस्ट ऑफिसरांचा डोळा चुकवून भरगच्च मोळी वाहून आणतील. त्यांना फक्त आजचीच विवंचना ! मुलांना शाळेंत पाठविण्यापेक्षां घरकामांत अगर मोलमजुरीच्या कामांत लावून आर्थिक भार थोडाफार हलका करण्याकडे प्रवृत्ति. ज्याच्याजवळ ४००–५०० रुपये आहेत तो त्यांच्या दृष्टीनें 'मालदार'. त्यांच्या चार फुटी उंचीच्या झोपड्यांना दार नाहींच, चोरीस जाण्याची धास्तीच नाहीं. मात्र झोपडीच्या आंत स्वच्छता भरपूर. या झोपडीचा उपयोग

हिंवाळ्यापुरताच. एरवीं हे जंगलांत राहणें, स्वच्छंदानें फिरणें व जंगलांत शेतीचीं श्रमाचीं कामें करून डेरेदार आम्रवृक्षाच्या खालीं विश्रांति घेणें अधिक पसंत करतात. घर, शेती, पैसा यांच्या अभावीं भाऊबंदकीचीं भांडणें अर्थातच कमी. कारण वयांत येण्याच्या अगोदरच प्रत्येकानें पोटापुरतें मिळविणें अपरि-हार्य असतें. खानदेशी तडवींची खानदेशांतील संख्या ५ हजारांपर्यंत असावी. त्यांत तडवीपठाणांची गणना केल्यास १० हजारापर्यंत यांची संख्या होईल.

आख्यायिकेप्रमाणें यांच्या धर्मांतराचा काळ अगदीं अलीकडचा म्हणजे १००–१२५ वर्षांपूर्वींचा आहे. धर्मांतर न केलेल्या भिल्लांना हे काटुनी भिल्ल म्हणतात. शूर मनसाराम दादाचा खानदेशांत आजहि पोवाडा गाइला जातो. इंग्रजांशीं यानें मुकाबला केला होता असें म्हणतात. तथापि असा हा शूर वीर भिल्लांचा मात्र कर्दनकाळ ठरावा हा दैवदुर्विलास ! कारण काय तर त्याची रखेली एक भिल्लीण होती व भिल्लिणीची कड घेऊन कांहीं भिल्लांनीं मनसाराम दादास हात दाखविण्याचा प्रयत्न केला. दुसरेंहि कारण सांगितलें जातें: इंग्रज सेनापति औट्रम यानें विश्वासू भिल्लांची पलटण तयार केली. ही गोष्ट मनसाराम दादाला रुचली नाहीं. त्यामुळें फितुरी भिल्लांचा त्यानें फडशा पाडण्यास सुरुवात केली. त्याच्या धाकानें भिल्लांनीं मुसलमान धर्म स्वीकारला व पाचोरें पाळधी येथील धर्मांतर केलेल्या मराठे देशमुखांचा आसरा मिळविला.

कांहींच्या मतानें औरंगजेबानें दक्षिणेवर स्वारी केली, त्याच वेळीं या भिल्लांनीं धर्मांतर केलें. धर्मांतर जरी केलें तरी हिंदुधर्मांतील अनेक संस्कार-विधि आजहि करतांना आढळतात. हे नाममात्र मुसलमान आहेत. घरांतील लग्नासारख्या मंगल प्रसंगीं होणाऱ्या विधींवर हिंदुसंस्काराची दाट छाया आढळते. यांची भाषा अहिराणी मराठी मिश्रित अशी आहे. मधून मधून उर्दू शब्दांची पखरणाहि आढळते. गुढीपाडवा, आखाजी, सर्वपित्री, मोहरम, नागपंचमी, दिवाळी, नागदिवाळी, रमजान, बकरीईद, न्याज हे यांचे प्रमुख सण होत. जात मांसाहारी तरी जातींत गोमांस निषिद्ध मानलें जातें. बऱ्याच घरांत आजहि खंडेराव बहिरोबा देवांच्या मूर्ति व पूर्वजांचे टांक आढळतात. कांहीं घरांत ते व्यवस्थित रेशमी अगर हिरव्या फडक्यांत बांधलेले आढळतात. वरील सणांप्रमाणेंच या समाजांत पीरपूजेचें प्रस्थ फार. आखाजी, मोहरम,

दिवाळी हा त्यांतल्या त्यांत त्यांच्या अत्यंत आवडीचे सण. कारण या सणांत त्यांना स्वच्छंदानें नाचतां येतें, मिरवतां येतें. वसंतऋतूंतील हिरवीगार कोवळी वनश्री दाखविण्यासाठीं आखाजीला मुलीबाळींना घेऊन येतात व त्यांना झाडाला झोके बांधून देतात व झोके घेत असतांना गौराईचीं गाणींहि अभावितपणें म्हणतात.

आखाजीचा सण आला, मुऱ्हाळी आला ।। ध्रु०
किती दिस ऱ्हागी सांग सये, माहेराला.
पंचमीचा झोखा खाऊं, पोळ्याची मौज पाहूं,
गाडी जुपून येइन ग दसऱ्याला ।।१।। ध्रु०
आला दिवाळीचा सण, खोपडी[1] बाईस मोठा मान
करूं मंग बोळवण नाग दिवाळीला ।।२।। ध्रु०
सण आला वांगीसट सोयरा करे वटवट,
लाडु बांधुन खाऊंग उत्राणाला[2] ।।३।। ध्रु०
होळी बाईला निवद दावूं, पाडव्याच्या गुढीवर तांब्या ठेवूं,
जगजंबेची जत्रा पाहूं पुनवेला.
मंग जाऊं आपल्या सासऱ्याला, मुऱ्हाळी आला ।।४।।

वर्षांतील मुख्य मुख्य सणाला माहेरींच राहण्यांची ही माहेरवाशिणी इच्छा करते.

मृगनक्षत्राला यांच्याहि जीवनांत फार मान. नववधू गर्भवती राहावी अशी जशी म्हाताऱ्या सासू-सासऱ्यांची प्रबळ इच्छा असते, तशीच आकाशांतील रुपेरी मेघ जलभारयुक्त होऊन काळेक्षार व्हावें अशी या बापड्यांची इच्छा. ती इच्छा ते खालील गाण्यांत व्यक्त करतात.

आज उठऽल दल बादल रऽ !
पाऊस पडऽल मुलखावर
हवा सुटली फार, मिरुगाची लागल धार
वहु तान्हेली धरती माउली
मिरिगाचंऽ पानी पेली,
झाल्या पपया मानकरी, उडीद मुंग आले वरी

---

१ कार्तिकी एकादशी. २ उत्राण=संक्रांत; उत्तरायण.

मिरग धरस रे उन सावली
पतिवरता धरती माउली.

अशा या आनंदांत आषाढ वद्य अमावास्येस जंगलांतून शिकार आणतात व मनमुराद स्त्री-पुरुष समाचार घेतात.

नागपंचमीचेंहि असेंच महत्त्व आहे. या वेळींहि मुली निसर्गाच्या सान्निध्यांत खेळण्यास उत्सुक असतात. याच महिन्यांत जर मोहरम आला तर पुरुषाच्या उत्साहाला पारावार नसतो. ताबूत बसविल्यापासून तो उठे-पर्यंत सवारीचा जल्लोष असतो. कोणी वाघ बनून नाचतात, कोणी ताबु-तांना नवस करतात, तर कोणी 'उदाले रेवडया' वाहून नवसाची पूर्ति करतात.

धर्मानें मुसलमान पण राजूरच्या देवीला जाऊन मुलाचें जाऊळ उतरवितात. कांहीं पिरालाहि जाऊळ वाहतात. मूल वर्सा दोन वर्षांचें झाल्यानंतर हें जाऊळ काढलें जातें. विशेष विधि नसतो. गुळाचा नैवेद्य देवीस दाखवून जाऊळ उतरण्यांत येतें. ज्यांची बरी स्थिति असते असे कांहीं तडवी बकरा कापून आप्तेष्टांना जेवावयास बोलवितात. जाऊळ झाल्यानंतर ५–६ वर्षांचें मूल झाल्यानंतर खलिफाला बोलावून सुंता कर-ण्यांत येते.

या तडवींचा मुसलमानांशीं रोटीव्यवहार होतो, बेटीव्यवहार मात्र होत नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या आदिवासी जमातींना इतर मुसलमान लोक उपेक्षेनें वागवितात हें कारण असूं शकेल. किंवा स्वातंत्र्य-प्रिय आदिवासी आपल्या मूळ जमातींत वर्णसंकर होऊं नये अशी इच्छा बाळगीत असावेत.

तडवींचा लग्नविधि मुसलमान-पद्धतीनें होतो. मात्र तत्पूर्वीचें सर्व संस्कार हिंदु पद्धतीचे असूं शकतात. नवरदेवास हळद लावण्यांत येते. नवरानवरींच्या आईबापांना व करवल्यांनाहि हळद लावली जाते. ही हळद सुवासिनींनींच लावली पाहिजे असा जमातीचा कटाक्ष आहे.

लग्न झालेली बहीण अगर मुलगी ही पहिली सुवासिनी असते. लग्नाचा तिथिनिश्चय ठरविण्यासाठीं ब्राह्मणास बोलाविण्यांत येते. 'सगई' पक्की झाल्यावर आप्तेष्टांना दूधभात, गूळ यांचें जेवण देण्यांत येतें. पंचांना

साक्षी ठेवण्यांत येतें. नवऱ्या मुलास शेलापागोटें देण्यांत येतें व नवरीस फडकी दिली जाते. या विधीस चिरामुंजी (चीर व मुद्रिका) असें म्हटलें जातें. आंबा व जांभूळ यांचीं पानें हळदीच्या नाड्यांनीं माठावर बांधतात व तोरणहि लावलें जातें. कांहीं ठिकाणीं मुसळाला पांच प्रकारचीं पानें बांधून त्याची पूजा केली जाते. आंबा, जांभूळ यांचीं पानें आणून मांडव घालतात व आप्तेष्टांना जेवण देतात. हा कुलाचार इतर जमातींच्या अष्टवर्गासारखा किंवा देवदेवकासारखा आढळतो. मंगळसूत्र घालण्याची जरी चाल नाहीं, तरी सुवासिनीच्या गळयांत काळी पोत असतेच असते. ही नववधूच्या गळयांतील काळी पोत विवाहाची खूण समजली जाते. मशिदींत जाऊन काजी कलमा पढून घेऊन निका लावतो. यांच्यांतील स्त्रिया हळद लावीत असल्या तरी कुंकू लावीत नाहींत. मात्र हिरव्या बांगड्या, चांदीच्या गोटपाटल्या नववधूस घालण्याची पद्धत आढळते.

स्त्री बाळंतीण झाल्यावर पांचव्या दिवशीं सटीची पूजा करतात. रेती व खडे आणून त्यांवर बाळंतीण हळदीकुंकू वाहते. बारसें करतातच असें नाहीं. बाळंतिणीची 'वृद्धि' पाळण्याची पद्धत नाहीं. श्रमिकवर्ग असल्यानें शौच-अशौचाला फारसें महत्त्व देत नाहीं.

घटस्फोट फारकत सहसा घेऊं नये अशी समाजाची इच्छा असते. मात्र घटस्फोट निषिद्ध नाहीं. घटस्फोट घेण्याची पद्धतीहि सोपी असते. समाजांतील प्रमुख पंचांना बोलविण्यांत येतें. त्यांना घटस्फोट घेण्याचें कारण समजावून देतात. मूल होत नाहीं, बायको नीट वागत नाहीं, सासरीं न येतां दीर्घकाल माहेरीं राहण्याची इच्छा करते, बायकोचा दीर्घ आजार, पत्नीस मूल होत नाहीं इत्यादि कारणें सांगण्यांत येतात. पंच समंजसपणानें विचार करतात व घटस्फोटाच्या योग्य कारणाची खात्री पटल्यावर पंच घटस्फोटास परवानगी देतात. पंचांनीं अशी परवानगी दिल्यावर घटस्फोट घेऊं इच्छिणाऱ्या स्त्रीच्या गळयांतील पोत तोडण्यांत येते व बांगड्या फोडण्यांत येतात. घटस्फोट घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषाला त्याच्या या पत्नीस ओटी भरून पैसा द्यावा लागतो. लग्नखर्च भरून देणें हें सक्तीचें बंधन असतें. मात्र स्त्री ज्या वेळेस घटस्फोटासाठीं पंचायत भरवते अगर स्त्रीच्या, अनाचाराचा बभ्रा होऊन पंच ज्या वेळेस प्रश्न धसास लावण्यासाठीं जमतात, त्या वेळीं तिच्याकडे चूक असल्यास तिला नवऱ्यास पैसे द्यावे लागतात. लग्नांत व्याही

व विहिणींना मान अधिक. मामाची मुलगी करणें निषिद्ध समजलें जात नाहीं. मात्र मुसलमानाप्रमाणें मावशीची, काकाची मुलगी करीत नाहीं. लग्नांतील गाणीं हिंदी असतात. इतर वेळेस जीं गाणीं म्हटलीं जातात तीं मात्र मराठी असतात. पण लग्नांत म्हटलीं जाणारीं गाणीं ठराविक असतात व तींहि हिंदीच असतात. निका लावण्यास जात असतांना अक्षता (पिवळे जोंधळे) नवरदेवावर टाकण्यांत येतात.

न्याजच्या महिन्यांत गोड भात करण्यांत येतो. सर्वपित्री अमावास्थे-इतकेंच या महिन्यास महत्त्व असतें.

जातीला न रुचणारें असें आचरण करणाऱ्यास जातिबहिष्कृत करण्यांत येतें. मात्र त्या अगोदर पंचायत भरते. पंचापैकीं समंजस माणसास प्रमुख-त्वाचा मान मिळतो. अशा ज्ञातिबहिष्कृत माणसास ज्ञातींत घेणें असल्यास पंचास दंड भरावा लागतो, अगर पंचास शरण यावें लागतें.

या जातींतील स्त्रिया सकच्छ लुगडीं नेसतात. अंगांत चोळी असते. बाळ्यों, गोट, पाटल्या इत्यादि चांदीचे दागिने असतात. पिवळ्या तांबड्या गुंजांच्या माळाहि असतात. मात्र कुंकू लावण्याची पद्धत नाहीं.

स्त्री ऋतुस्नात झाल्यास विटाळ पाळतात. पहिल्यानें ऋतुस्नात झाल्यास विशेष असा संस्कार मात्र नसतो. बाळंतिणीचा विटाळहि पाळण्यांत येतो. सव्वा महिन्यानंतर बारवेची अगर नदीची पूजा केली जाते.

या समाजाचा जादूटोण्यावर विश्वास असतो. जमातींत रोगपरिहार करणारा भगत अगर बईद असतो. तो मंत्राच्या द्वारें नाडा-ताईत भारतो. हा भारलेला नाडा-ताईत परिधान केल्यानंतर रोग होत नाहीं अशी दृढ श्रद्धा असते. रोगपरिहारार्थ शनिवारीं, पौर्णिमेस अमावास्येला कोंबडीचीं अंडीं रोग्यावरून ओवाळून टाकण्याची पद्धत आहे. वैद्याच्या मतानें असाध्य रोग बरा व्हावा यासाठीं कोंबडी, बकराहि बळी देण्याची पद्धत आहे 'भंदे'[1] काढून तिव्हाटयावर चव्हाटयावर मध्यभागीं ठेवलें जातें.

मर्तिकाची पद्धत मुसलमान समाजाप्रमाणें आहे. पांच सहा वार पांढऱ्या कपड्यांत प्रेत गुंडाळतात व 'जनाजांत' ठेवतात व नंतर कबर-

---

१ दहीभात गुलालाचा रोग्यावरून ओवाळलेला घास.

स्थानांत पुरतात. मात्र पुरल्यानंतर हिंदुपद्धतीप्रमाणें तिसऱ्या दिवशीं प्रेताजवळ दुधाचीं बोळकीं ठेवलीं जातात. सुतक पाळीत नाहींत. मात्र नऊ दिवसांनीं अगर सव्वा महिन्यांनीं दिवस करतात. सर्वपित्री अमावास्येला मेलेल्या पितरांच्या आठवणीप्रीत्यर्थ अग्नींत घास टाकण्यांत येतो. हा घास गुळभाताचा असतो. सग्यासोयऱ्यांना बोलाविण्यांत येतें व त्यांना पितर म्हणून अक्षता लावण्यांत येतें.

जेजुरी, सप्तशृंगी अगर कुळदेवतेस जाणें धर्म समजतात. कार्तिकी व आषाढी एकादशीला उपवास करतात. मंगळवार, गुरुवार, शनिवार, सोमवार ह्यांपैकीं एखाद्या दिवशीं उपवास करतात, तितक्याच निष्ठेनें ते रमजानचे रोजेहि करतात. तुकारामाचे अभंग रात्रीच्या वेळेस मोठ्या आस्थेनें आळवतात. मुसलमानी धर्माचें ज्ञान मराठींत मुसलमानी धर्मावरील पुस्तक नसल्यानें विशेष नाहीं.

नव्या मनूची जाणीव त्यांच्यांत होऊं लागली आहे.तथापि समाजाची आर्थिक परिस्थिति फारच खालावलेली आहे. समाजांत मराठी ७ वी पास झालेल्या बोटावर मोजण्याइतक्याच व्यक्ति असतील.



## ३. भिल्ली वाङ्मय

संग्राहक : **प्रा. दा. गो. बोरसे,** अकोला

भिल्लांच्या लोकवाङ्मयाचे तीन भाग पडतात: (१) श्रमाचें काम झाल्यानंतर मनोरंजनासाठीं सांगितल्या जाणाऱ्या लोककथांचा भाग; (२) शिकार,बलिदान,लग्नोत्सव व शिमगा यांसारख्या सणाच्या प्रसंगीं व नृत्यप्रसंगीं फडाकडून म्हटल्या जाणाऱ्या रियाँ व पाई गीतांचा भाग;व (३)नागपंचमी, आखाजी सारख्या प्रसंगीं म्हटल्या जाणाऱ्या स्त्री-गीतांचा भाग. रियाँ-गीतांत कथा गोंवलेली असते व किनरीवर वाजवितांना प्रत्येक ओळीच्या शेवटीं रियाँजी रियाँजी असें त्यांच्यांतील ध्रुपद धरलें जातें. याशिवाय म्हणींचा व वाक्प्रचारांचा ठेवा हा देखील लोकवाङ्मयाचा अमोल ठेवाच समजावयास हवा.

काय करूं बहिन मन्या करमले वऽ
नहीं मले धांदूक नेसायलें वऽ
घर मना ताजी भाजी
फांग तोडी कयी भाजी
मना डोका उर्ली खाजी
काय करूं बहिन मन्या करमले वऽ १

नहीं मले धांदूक नेसायलें वऽ
तीन दगडेरना मांडा चुल्हा
लुगडामिचुक हुगडा कुल्हा
चालनू व माय मी मोलीले
काय करूं बहिन मन्या करमले वऽ २

दख ह्या लोकेस्न्या माड्या
त्यामा बठन्यात त्यास्न्या लाड्या
तीस्वर पडतस फुलझड्या
खडुखुडु झोपडी मले न्हावाले
काय करूं बहिन मन्हया करमले वऽ ३

या गीतांत एक भिल्ल स्त्री आपल्या दारिद्र्याची कर्मकहाणी आपल्या मैत्रिणीस सांगत आहे. ती दैवावर विश्वास ठेवते. अंगावर बांडेभुरकें लुगडें नाहीं, खाण्यासाठीं 'फांग' या सर्वांगास खाज आणणाऱ्या वनस्पतीची भाजी अशी दु:स्थिति ती मैत्रिणीस सांगते. तीन दगड मांडून चूल बनवलेली आहे. लुगडें नसल्यानें मांड्या नितंब उघडेच आहेत अन् त्यांत पुन: मोळी आणण्याचें कष्टाचें काम करावें लागत आहे. मात्र उंच हवेलींत श्रीमंत लोकांच्या बायका ऐषआराम करीत आहेत व त्यांचाच जग उदो उदो करीत आहेत व मला मात्र झोंपडींत थंडी सहन करून दिवस कंठावे लागत आहेत अशी प्रामाणिक तक्रार ती आपल्या मैत्रिणीजवळ करते.

शेजारणीनें या स्त्रीचा उपहास केल्याबरोबर शेजारणीची संभावना ही खालील शब्दांत करते—

शेजारीन बाई नको करु कुरुकुरु
उंदीर तुन्हा भाऊ माटी.पडे भुरुभुरु

आणि ज्या वेळेस त्यांची दिलजमाई होते त्या वेळेस शेजारणीचा खालील शब्दांत प्रशंसा करण्यास चुकत नाहीं.

शेजारीन बाई, तुन्हा शेजार सोनाना
माले राग उना तुन्हा उग्गीरपनना
शेजारीन बाई, नको करूं तासनास
दारीं गुलाबन ऽ झाड कया येतस बारा मास.

भिल्ल स्त्रियांना गौराई गीतांची मनापासून आवड व हेंच खरें त्याचें लोकवाङ्मय. जात्यावरील ओंव्यांत त्यांचें मन फार रमलेलें दिसत नाहीं. पण अक्षय्यतृतीयेच्या सणाच्या वेळीं त्यांच्या मुलीबाळी शंकरपार्वतीच्या गीतांच्या फेरी झाडतात. खालील गौराईच्या गीतावरून त्यासंबंधींची कल्पना येईल.

१

गिरना मोसमना मेय व माय
तठे काय सोनाना पियय व माय
त्यान्या काय चांदीन्या काडन्या व माय
त्याले काय रंगीत पायना व माय
त्याम्हान निजे संकर राज्या व माय
यानी काय सोनानी सुतयी व माय
झोका देये गौराई रंभा व माय
झोका देता तुटना हार व माय
मोती झायात दानोदान व माय
येची येचीसन भरन्यात गोनी व माय
गोनी जाऊ द्या वऱ्हल्या रानीं व माय.

गिरणा आणि मोसम नदीच्या संगमावर सोन्याचा पिंपळ आहे. त्याच्या फांदीला चांदीच्या दोऱ्या ( काढण्या ) बांधलेल्या आहेत. व रंगीत पाळणा ( झोका बंगई ) बांधलेल्या आहे. त्या बंगईवर शंकर राजा झोपलेला आहे व गौराई रंभा झोके देत आहे. झोका देतां देतां तिच्या गळ्यांतील मोत्यांचा हार तुटला व त्यामुळें जिकडे तिकडे मोती विखुरले गेले. आम्ही

ते मोती गोळा केले व पोतीं भरून ठेवलेलीं आहेत. वरच्या रानांत सुरक्षित जागीं हे मोती जाऊं द्या. असा वरील गीताचा आशय आहे.

२

पयल्हा सोमवार चाल घरीं व माय
संकर जवाई हुबा दारीं व माय
गडरीले लई ग्या मूय करी व माय
कमरी साडी पितांबरी व माय
अंगीं चोयी कोथमिरी व माय
कपायी कुंकू लाल चिरी व माय
डोयाले काजय झिरीमिरी व माय
गया गरसोय मोती भारी व माय
पयल्हा सोमवार घरीं व माय
संकर जवाई हुबा दारीं व माय

या गीतांत शंकरानें पार्वतीस मूळ करून नेल्याबद्दलची हकीगत आहे.

३

उन्हाया दिशीं झायी बायतीन गवराई
कस्सानी पत कयी गवराई
खारीक खोब्रानी पत कयी गवराई
खोब्र ऽ झाय ऽ थोड ऽ व गवराई
सम्रींत मायेरन ऽ पुढ ऽ व गवराई
हुब ऽ ग गाडीघोड ऽ गवराई
मायना जीव येडा व गवराई
पतना लयना पुडा व गवराई.

गौर बाळंतीण झाल्यानंतर गौरीच्या घरची दारिद्र्याची परिस्थिति माहिती असल्यानें पथ्याचे भूकलाडू गौराईच्यां आईनें पाठवून दिल्याचा उल्लेख सदर गीतांत आहे.

४

चिरी चिरी न्या खाणुट्या
चारी मन्या परंट्या
परं दादा र आटा व
शेला चोयी नी पटा व
शेला नई व माय कस्तुरी
चारी भाउस्नी आस्तुरी
यास्नऽ खेत सऽ डोंगरी
डोंगर लवतीन धडधडा
ईजा पडतीन खडखडा
ईज तुनऽ दूद वऽ
बाय पोऱ्हे तुन्हा पाज व
बाय पोऱ्हे तू आटिकडा
चांद सुऱ्या चटिकडा
चांद तुम्ह हाइ खयऽ रऽ
संकररायानऽ मयऽ रऽ
संकर रायानऽ किकर
सोनीयास्नऽ टीपरऽ
येक टिपरू हुबा कडा
आगासीना दखू गडा
आगास दादा मन्हेरी
बांगड्या गउरीले बिल्होरी
सुऱ्या दादा तू सोनेरी
गउरीले साडी चमकारी
सिपा तुनी सुई रऽ
वडे वडे गई रऽ
वडे व्हती गहूानि काडी
मनी गउरले फूल नि झडी.

गीताचा अर्थ स्पष्ट होत नाहीं, तथापि चंद्र, सूर्य आणि आकाश यांनीं गौराईला वस्त्रप्रावरणें व अहेर लेणीं दिलीं असा भावार्थ दिसतो.

५

चिची वऱ्हला चिचोबा चीच कशी डोलस
तिकडथिन उनी गवराई रंभा पदर कस्सा झयकुस
अस्सा पदर चांगला ते देवावऱ्हे घालवा
अस्सा देव चांगला ते परातीमा न्हाववा
अश्या पराती चांगल्या ते पिठीबिठी गायवा
अश्शा पिठ्ठी चांगल्या ते कनका बिनका मयवा
अश्शा कनका चांगल्या ते लोया बिया भरवा
अश्शा लोया चांगला ते खापर बिपर ठिववा
अस्स खापर चांगलंऽ ते पोया बिया लाटवा
अश्शा पोया चांगल्या ते घडया बिड्या करवा
अश्शा घडया चांगल्या ते वइलीमंदीं ठिववा

अश्शा वइली चांगल्या ते नंदी बिंदी सजवा
अशा नंदी चांगला ते गेजा घाटया लयवा
अशा गेजा चांगल्या ते नंदी बिंदी जुपवा
अशा नंदी चांगला ते गवराई मायेऱ्ही जाववा
अस्स मायेर चांगलऽ ते धिंगामस्ती करवा.

शृंखला गीताचे नमुने इकडील मुलींच्या गीतांत जसे आढळतात तसाच हा नमुना आहे.

चईत वइसाखन ऽ ऊन
खडक तापा झायात लाल
गडराईन्या पायले उनांत फोड
गउराइना जीव सकवार
नेया पितांबर नेसीसन
पिवयी काचोयी घालीसन
डोया काजयनी कोर
कपाये कुंकू लंबट चीर
गाडीले नंदी जुपना
गवराई चालनी म्हायेरा.

भिल्ल समाजांत गौराई गीतांची जितकी रेलचेल आढळते तितकी इतर देवतांचीं स्फुट गीतें आढळत नाहींत. नाहीं म्हणावयास वनवास भोगणाऱ्या सीतेची करुण कहाणी व कृष्णाच्या नंदयशोदाच्या घरांतील वास्तव्यासंबंधीचीं, विशेषत: खेळासंबंधीचीं गाणीं आढळतात. त्यांचें खालील गीत बागलाणींत आहे.

खुळ येळू अंबानि जाळू
क्रिस्न खेळे चेंडू फळी
तठेथिन चेंडू झुगारना
देवकीन्या माथा बठना
देऊबाई रडायले लागनी
नको नको लडू तूं देऊबाई
क्रिस्न तुन्हा मोठा नहीं
मोठा नही मी कशी म्हनू
रासी बिदी वना नहीं
रासी बिदी पवळेस्न्या
आमी सुना भवळेस्न्या
आमी गवळे धरीसन
निंबू टाकनात चिरीसन
तांदूय टाकनात भारीसन
सुना टाकन्यात मारीसन.

गोपीबरोबर रासक्रीडा करणाऱ्या कृष्णाची कागाळी देवकीकडे गेल्यानें देवकीस वाईट वाटलें. वृद्ध गवळयांनीं कृष्णाबरोबर रासक्रीडा खेळणाऱ्या सुनांना मारून टाकल्याचा उल्लेख यांत आहे.

वांझोटीविषयीं इतर समाजाप्रमाणेंच भिल्ल स्त्रीलाहि अत्यंत तिटकारा. पुत्रवती स्त्रीविषयीं या समाजांतहि आदराची भावना असते.

दिम्हायना वखत उना वांझोटीना फेरा.
लाडक्या लेकीबाई झाक पदराखाले हिरा
वांझोटी बाई लेक लेक करी झायी पापडी
देवनऽ देतऽ बाई मया तुन्ही येडी
वांझोटी बाईले नका हिनवूं आयाबाया
देवनऽ देनऽ सम्द भंग का हाऊ वतवाया
लेकरवाइना मंदीरमा राखराख
वांझोटी बाईन ऽ झाडीझुडी घर पाख.
वांझोटी बाईले वांझोटी म्हनू नहीं
सरगीना देव कोठऽवरसना कोटऽनहीं

यांत वांझोटीविषयींहि सहानुभूति दाखविण्यास सांगितलेलें आहे.

रियाँ गीताचा एक नमुना खालीं दिलेला आहे. त्यांत कथानक असतें व किनरीवर म्हणण्याची पद्धत असते. कानबाई गीताच्या धाटणीवर हीं गीतें सर्वसाधारणपणें म्हटलीं जातात.

हनुमंत भगत व्हता रामना जी रियाँ जी
पुत्रु व्हता अंजनीना जी रियाँ जी
सोध कया सीताना जी रियाँ जी
सीता स ऽ की रावनन्या बागमा जी रियाँ जी
लंका बायी टाकनी लंका कुद्धमा जी रियाँ जी १
रूप लिन्ह त्यान ऽ मच्छरन ऽ जी रियाँ जी
नगर धुंडत फिरे गनगन ऽ जी रियाँ जी
सोध लागेना सीताबाईना जी रियाँ जी
देव ग्यात पान्थावर
तठे बोले यक नार
सीता वनामझार
सीता स ऽ की रावनन्या बागमा जी रियाँ जी
बायी टाकनी लंका कुधमा जी रियाँ जी २

सोधत हनुमान अयोध्यामा उना जी
हाक मारे हो रामलक्ष्मना जी
जेवतां जेवतांच हात रामन ऽ धुतना जी
देव हनुमान बोले
त्याना सबुद राम झेले
राम निंघतात सवऽच युद्धाले
सीता स ऽ की रावनन्या बागमा जी रियाँ जी
बायी टाकनी लंका क्रुधमा जी रियाँ जी ३

रामरायाले राग उना जी
सीताकडेज जीव त्याना लागना जी
युद्धले चला हुकुम कया लक्ष्मना जी
राम बठना रथवरी
म्होरे चालनी सेना भारी
ग्यात समींदर तिरी
सीता स ऽ की रावनन्या नागमा जी रियाँ जी
बायी टाकनी लंका क्रुधमा जी रियाँ जी ४

रावन म्हास की समिंदर पल्याड् जी
वानर सेना त सम्दी अल्याडू जी
कशी व्हईन दूर हाइ आड ऽ जी
राम इचार करी भारी
सेतु बांधे सागर वऱ्ही
ग्यात चाली लंकावऱ्ही
सीता सऽकी रावनन्या बागमा जी रियाँ जी
बायी टाकनी लंका क्रुधमा जी रियाँ जी ५

रावन सीताले कांहीं देयेना जी
सेनासंगऽ युद्धाले निंघना जी जी
इंदरजित कुंभकरेन लिन्हा जी
बानवरी बान चाले
राम मारे रावनले

सुध कायऽ मंग सीतामाईले
सीता सऽकी रावनन्या बागमा जी रियाँ जी
बायी टाकनी लंका ऋधमा जी रियाँ जी. ६

या गीतांत थोडक्यांत पण समर्पक शब्दांत लंकादहनाची व रामरावण युद्धाची हकीकत सांगितलेली आहे.

येथवर फडांतील गीतांचा थोडक्यांत परामर्ष घेतला. त्यांच्या लोककथांचाहि परामर्ष घेणें अत्यावश्यक होतें. तथापि त्या प्रदीर्घ असल्यानें त्यांचा परामर्ष घेतां येत नाहीं. त्यांतील कांहीं दोन बायका व एक दादल्या यांच्या संबंधीं विनोदात्मक असतात; तर कांहीं व्यवहार दक्ष नसलेल्या अजागळासंबंधानें, तर कांहीं भुताखेतांच्याहि असतात; तर कांहीं स्थानिक देवतांचें महत्त्व दर्शविणाऱ्या असतात. या सर्वांतून त्यांची मनोवृत्ति समजून येते. या गोष्टींत ज्याप्रमाणें दोन तास पुरणाऱ्या गोष्टी असतात त्याप्रमाणें चुटकेहि असतात. रात्रीच्या वेळीं विशेषत: चांदण्या रात्रीं शिमग्यापासून तों आखाडीपर्यंत भिल्लांतील गोष्टी-वेल्हाळ भिलारींतील अंगणांत गोष्टी सांगत असतात व आबालवृद्ध व स्त्रिया मोठ्या आवडीनें ऐकतात. कांहीं वेळेस या गोष्टी देवादिकांच्याहि असतात. आणि त्यांत कालविपर्यास, स्थलविपर्यास जरी होत असला तरी कुणालाच त्याबद्दल फिकीर वाटत नाहीं. मनोरंजन व्हावें व साधल्यास देवाचें नांवहि कानीं पडावें हाच उद्देश गोष्टी सांगण्याच्या बुडाशीं असतो. ग्राम्यतेचाहि त्यांना फारसा विधिनिषेध नसतो. हें खालील चुटक्यावरून दिसून येईल.

१

येक व्हती म्हतारी. ती झाडत व्हती वानानी वसरी. तिले सापडनी बासरी.— ती गयी बजारमा. ती म्हने काय लेवू ? झिंगा लेवू का मासा लेवू ? मंग तिनी लिधा झिंगा. रांधु कसा छनमन. खाउ कसा गटमट. हागू कुठऽ कुंभारन्या चाकवर. आखु × × कोठऽ पुसू पाटीलन्या नाकवर.

२

येकदा येक गावमा जुवान भीलनऽ लगीन ठायेरनऽ. सेवया कुल्डया पापड सम्धा क्यात. त्याले हायद लागली. त्याना धल्ला ' हाइ व्हायनऽ ते व्हायनऽ आसऽ, सारखा बडबड करे ! इर्चीभनऽ धल्ला का रऽ लई वटका

करस खालीपिली. त्यांनीं सोबतीस्ले सांगितनऽ सम्द. मंग संम्धासनी इचार कया ह्या धल्ला लोकच जायेल सतस. खालीपिली आपुनले तरास देतस. बस्स सम्दास्ले घर ठिइसन परनाले जाववा. झायऽ भू! सम्दा जुवानेस्नी धल्लास्ले घर राखाले ठिवनऽ त्यामान येक जुवान जरा इचार करन्हार व्हता. याय शे बखत शे. येक अर्धा धल्ला मानूस जोयजेच. त्यांनीं येक पोतऽलयनऽ, आखु येका धल्लाले पोतामान: टाकनऽ आखु त्यालेबी संगऽ लिन्हऽसंगऽ जव्हय त्या सम्दा परनाले नवरीना गांव उनात. तव्हय सगासोयरेस्नी दखऽ की ह्या सम्दा उंडारेल जुवानच सतऽ ह्या मा येक जी शाना धल्ला मानूस नहीं. मंग त्यास्ले बल्हाय बिइठक टाकनी.

गड्यास्व ऽ तुमी वनात है बर ऽ कय ऽ पन आमनी नवरी जरा हठनी आजले. तिले थाटभर चांदन्या जोयजे. सम्दा भिलटा जुवान टगर मगर दखाले लागनात. चांदन्या तर आगासमा. त्या कशा काय बुवा देववा. दखा तुमले देता येही तरच लगीन व्हई; नहीं तर घर पलट जावा. सम्दा जुव्वन इचार करी करी थकनात. त्यामा येक जन म्हणे येखादा धल्ला संग ऽ व्हाता तर कांहीं तरी युगुत सोधी काढत. भील जुवानेस्मा जो इचारी मानूस व्हता तो बोली उठना गड्यास्व ऽ येक धल्ला स ऽ मन्या गाडीमा. मंग त्यानी पोतडी हुगडनी आखु धल्लाले भायेर काढन ऽ. धल्ला म्हने ' कायरे गड्यास्व ऽ आस ऽ खेटू ऽ मारल्यागत का बठनात तुमी. " जुवानेस्नी नवरीना हट सांगना. धल्ला बोलना—आरे त्यामा काय आवढ ऽ संकट सऽ सांगा नवरीना बापले आमी थाटभर चांदन्या देवाले तयार येतस पन समद्या चांदन्या माही जातींन आशी परात लई या बिगी बिगी. जुवानेसले भारी आनंद झाया. त्या ग्यात नवरीना बापकडे आखु धल्लानी जस ऽ सांगन ऽ तसा निरोप सांगना. नवरीना बाप म्हने. " व्हय ना व्हय कुर्ना तरी धल्ला मानूस सऽ नवरदेव संगऽ. मंग हजागाजानऽ लगीन व्हई गयऽ आखु जुवाननी नवरी परनी लयनी.

आशय-सर्व म्हाताऱ्यांना टाकून लग्नास आलेला तरुणांचा मेळावा पाहून नवरीच्या बापानें ताटभर चांदण्यांची अट घातली. गरज म्हणून एकानें लपवून आणलेल्या अनुभविक म्हाताऱ्यानें चांदण्या मावतील अशी परात घेऊन येण्यास नवरीच्या बापास सांगितलें.

कोणीतरी शाहणा वयोवृद्ध लग्नाबरोबर आहे हें नवरीच्या बापानें ताडलें व लग्नसमारंभ सुरळीत पार पडला.

म्हणी व वाक्प्रचार हे जगांत कसें वागावें यासंबंधानें मार्गदर्शन करणारे जणूं काय गुरुजनच. परिचयाच्या उपमा व सूत्रमयता व यमक यांमुळें म्हणींतील आशय मनांत लवकर ठसतो. भिल्लांच्या समाजांतहि म्हणी व वाक्प्रचार यांना कमतरता नाहीं. वानगीदाखल १०–१५ म्हणी देत आहें. त्यांतहि कांहीं वेळेस ग्राम्यता; पण या म्हणी देखील १०० टक्के चपखल व समर्पक असतात.

( १ ) भोयी भराडी काखमा गोराडी
( २ ) दुखायेल ढोर हाकायना घोर
( ३ ) XX ना बयऽ आमृत फय
( ४ ) साचनऽ सुचनऽ ठिवनऽ भिंती उरवर
हात चालनीं रिती
( ५ ) भूकले बाशी भात निजायले तुटेल खाट
( ६ ) भर्री आनी बोयकी, खीर लागे मयकी
( ७ ) येडी मती, चावडीवर चीत देती
( ८ ) सुगरन लयनी बल्हाई चुल्हा टाकना मल्हाई
( ९ ) सुगरन साठा, आयनी घाटा
(१०) बाई मी भोयी, सिवा माले चोयी
(११) भीलबुधी, कधीं नहीं सुधी
(१२) फोफो पाल्डी भाकर कोल्डी
(१३) मी ते सऽ भोयी मी खास पुरनपोयी
(१४) खाई पीई छिनाल तोंड धोंयी वढाय
(१५) बायकोले लाथा रांडले माथा
(१६) बायकोले शाडी रांडले रेसमी घडी

भिल्लांत लग्नाव्यतिरिक्त पतीचें नांव घेण्याची सार्वत्रिक पद्धत नाहीं. लग्नांत नांवांत चालीरीतीपेक्षां विनोदाचा भाग अधिक. इतर समाजांतील

नांवें घेण्याची चाल पाहूनच स्वयंस्फूर्तीनें कांहीं उखाणे स्त्री-पुरुषांनीं जुळविलेले आढळतात.

( १ ) काया दोरा कंखर, मोती वयनात भरभर, त्या मोती लस्करमा लस्करथिन आनऽ सोनऽ ते सोनऽ, सोनारना घर, सोनारनी घडी सरी ती सरी कजबीनन्या घरीं. कजबीननी लावनी कडी. राम म्हने ते धरनी आस्तुराचि बरी.

( २ ) गाडा चाले दनदन गाडाले लागना वट
म्हाईना हातमा पाटल्या गोट.

( ३ ) राम ठसकना जोडा घाले मचकना
हार पाडे चकमकना हुल्डा भुंजे वानीना
पहिला घास म्हाईना.

( ४ ) बाया घाल्ं बुगड्या घाल्ं दुखतस मन्हा
कान रामड्यानी रानी जसऽ नागीलनऽ पान.

( ५ ) शकडऽ चाले वाकडऽ तिकडऽ गाडा चाले नीट
गाडानी तुटनी धाव मनावर ठिवना म्हाईनऽ भाव.

कूटें घालण्याची पद्धत मात्र आहे. उदा.——

( १ ) जुवानीया हालम डोलम
म्हतारपनीं लावनऽ कुकू
बायपनना मइतर बोलला शाब्बास व काकू ( मिरची )

( २ ) आगड्डचा माऊ दगड्ड चाले दुडदुड्ड खाये कड्डकड्ड
( पाटावरवंटा )

( ३ ) आंधाले नरम, पांघरले गरम
जो नेही त्यानऽ फुटनऽ करम.

☆ ☆ ☆

## ४. सातपुड्यांतील आदिवासी—पावरा

संग्राहक : श्री. रा. पोतदार

पावरा, भिल्ल आणि हरिजन आदिवासीयांचें वस्तिस्थान महाराष्ट्रांतील अंदमान म्हणून प्रसिद्ध असलेला प्रदेश सातपुडा आहे.

पश्चिम खानदेशांतील धुळ्याच्या उत्तरेस १०० मैलांवर सातपुडा पर्वताच्या पांचव्या श्रेणींत 'धडगांव' नांवाचें एक लहानसें गांव आहे. धडगांवच्या आसपासच्या भागास अक्राणीमहाल हें नांव असून राज्यकार-भारासाठीं अक्राणी महाल, तळोदें तालुक्यापासून वेगळा करण्यांत आला आहे. अक्राणी महालाच्या सरकारी कचेऱ्या धडगांव येथें असून आदि-वासींच्या उन्नतीचें सर्वांगीण कार्यहि तेथूनच होत आहे.

स्वातंत्र्य-प्राप्तिपूर्वीचा काळ असा होता कीं, पश्चिम खानदेशांतील कोणत्याहि सरकारी नोकरास शिक्षा द्यावयाची असल्यास त्याची धडगांवांत येथें बदली करण्यांत येई. लोक थट्टेनें धडगांवला 'अंदमान' म्हणून संबोधीत असले तरी तेथील परिस्थिति जवळ जवळ अंदमानसारखी होती. सात-पुड्याच्या पायथ्यापासून धडगांवचा अठ्ठावीस मैलांचा प्रवास पायीं करावा लागे. मोठा ऑफिसर तेथें जावयाचा असल्यास तो घोड्यावरून प्रवास करी. सातपुड्याचें घनदाट अरण्य, हिंस्र पशूंच्या कर्कश गर्जना, डासांचे थवे, अवघड असे रस्ते इत्यादि कारणांमुळें दहा वर्षांपूर्वीचा काळ असा होता कीं, अक्राणी महाल व धडगांव येथें जाण्यास कोणी सहसा धजत नसे. म्हणूनच गेलीं कित्येक शतकें तेथें आदिवासींचें वास्तव्य असूनहि त्यांचा जगाशीं संबंध फारसा येऊं शकला नाहीं. सातपुड्यांतील सात रांगा, घनदाट अरण्याचा व नद्यानाल्यांचा आंतला प्रदेश हाच आपला देश; वाघ, अस्वलासारखीं जंगली पशूंची संगति व हीच आपली कर्मभूमि समजून तेथील आदिवासी राहात असत. यदाकदाचित् कोणी परका मनुष्य त्यांच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करूं लागल्यास ते लोक भीतीनें पळून जात.

या अक्राणी महालांत तीन प्रमुख जमातींची वस्ती आहे. त्या तीनहि आदिवासी जमाती वेगवेगळ्या वंशांच्या व वेगवेगळ्या भाषा बोल-णाऱ्या असल्या तरी त्या मात्र गेलीं कित्येक शतकें तेथें एकोप्यानें नांदत आहेत. जणुं कांहा त्यांचें जीवन एकमेकांशीं निसर्गानेंच बांधून दिलें आहे.

खानदेशांतील पावरी



आदिवासी स्त्री-पुरुषांची वेषभूषा

## पावरी आदिवासींच्या देवता









( १ ) घोड्यावर बसलेले राजा फाण्टा व गाण्डा ठाकूर.
( २ ) पांढर देव ( ३ ) हिंवर देव. ( ४ ) देवाचा मुखवटा.

ह्या तीन जाती म्हणजे ( १ ) पावरा, ( २ ) भिल्ल, आणि ( ३ ) हरिजन आदिवासी, या होत. कांहीं गांवांतून पावरांची वस्ती आहे, तर कांहीं गांवें भिल्लांचीं आहेत. हरिजन आदिवासी हे अल्पसंख्य असून ते पावरा किंवा भिल्लांच्या शेजारीं वस्ती करून राहतात.

पावरा ही जमात स्वतःला रजपुत वंशाची मानते. सुदृढ शरीरयष्टि रंगानें नीम-गोरे व त्यांची बोलभाषा, यांवरून हे लोक फार प्राचीन काळा-पासून राजपुतान्यांतून येथें येऊन स्थाईक झाले असावेत असें वाटतें. हे लोक स्वतःला भिल्ल व हरिजन आदिवासींपेक्षां श्रेष्ठ समजतात. पावरा व भिल्ल या दोन्ही जमाती शेती करूनच: उदरनिर्वाह करतात. हरिजन आदि-वासींची भाषा गुजराती असून ते कापड विणण्याचा धंदा करतात.

पावरे लोकांचा वेष भिल्ल व हरिजन आदिवासी यांच्याहून थोडा वेगळा आहे. कमरेला लंगोटी असली तरी डोक्याला फेटा बांधतात. बाहेर जातांना अंगांत शर्ट घालतात. शर्ट नसल्यास धोतराचा पट्टा अंगाभोंवतीं गुंडाळून त्याची गळ्याशी गांठ देतात. वेळेला ते धोतराचा लुंगीसारखा उप-योग करतात. कांहीं पावरे तर असे पहाण्यांत आले कीं, त्यांची अंगाभोंवतीं धोतर लपेटण्याची पद्धत व त्याचा शरीरावर पडणारा घोळ पाहून जुन्या गांधार शिल्परचनेंत जी रोमन किंवा ग्रीक पद्धतीची वेषभूषा आहे तिची आठवण होत असते. हे लोक ज्या अर्थीं अशी वैशिष्ट्यपूर्ण वेषभूषा करतात त्या अर्थीं त्या वेषभूषेची परंपरा संपूर्ण भारतीय असणें जरा असंभवनीय वाटतें. पावरा स्त्री नऊवारी लुगडें सकच्छ नेसते. स्त्रियांत डोक्यावरून पदर घेण्याची चाल आहे. डोक्यावर पदराचा कांठ आला म्हणजे तो कांठ त्या डोक्यावर उलटा करतात त्यामुळें लुगड्याचा जाड भाग होतो व त्या वजनानें पदर डोक्यावरून सहसा खालीं पडत नाहीं. कांहीं स्त्रिया लुगड्याचे भाग दोन करून ते नेसतात. कमरेपासून खालचा भाग त्या धोतरासारखा सकच्छ नेसतात. स्त्रिया हातांत बांगड्या व चांदीचें कडें घालतात. दंडावर चांदीची वेळी, गळ्यांत सरी, मोत्यांच्या माळा व रुपयांचे हार घालतात. रुपयांचे हार हा या आदिवासी स्त्रियांचा आवडता दागिना दिसतो. पंचम जॉर्ज, किंवा एडवर्ड बादशहाचे मुखवट्याचे चांदीचे रुपयांचे हार तयार करतात. कानांतील चांदीचे गोल, कर्णफूल व पायांतील पैंजण राजस्तानी घडणीचे

ते पसंत करतात. सोन्याचे दागिने घालण्याचा प्रघात नसून केवळ शुद्ध चांदीचा दागिना वापरणें हेंच उत्तम लक्षण गणलें जातें. कांहीं पुरुष कानांत चांदीच्या सांखळ्या घालतात. एकंदरींत पाहतां पावरा स्त्री-पुरुषांत दागिने घालण्याची मोठी आवड दिसून येते. भिल्ल लोक रंगानें काळे असून पावरा लोकांच्या मानानें जरा ठेंगू आहेत. भिल्ल लोकांची तुरळक तुरळक वस्ती डोंगरांच्या पायथ्याशीं व शहरी जीवनाकडे धांव घेणारे ते दिसून येतील. त्यांची बरीचशी वस्ती आतां शहरांच्या व तालुक्यांच्या गांवांजळ गेलेली दिसून येते. परंतु कशाही परिस्थितींत पावरा जमात आपआपल्या शेतांतलि घरांतच कायमचे वस्ती करून आहे. भिल्लांच्या स्त्रिया पावरा स्त्रियांच्या-प्रमाणेंच वेषभूषा करतात. अलीकडच्या काळांत ज्या पावरा स्त्रियांचा शहरी जीवनाशीं संबंध येऊं लागला आहे, व जे पावरा लोक तळोदें, शहादें व खेतीया अशा ठिकाणीं नेहमीं बाजाराच्या निमित्तानें जात येत असतात, त्यांच्या राहणीवर मात्र खूपच परिणाम झाल्याचें दिसून येतें. लुगड्यांच्या ऐवजीं पातळें, लाल किंवा काळ्या रंगाऐवजीं आकाशी, पोपटी रंगाचीं आकर्षक पातळें त्या आतां परिधान करूं लागल्या आहेत. पान खाणें, कपाळावर कुंकू लावणें, केशभूषा नीट करणें इत्यादि सुधारणा त्यांच्यांत हळूहळू होत आहेत· हरिजन स्त्रिया गुजर-पद्धतीनें वेषभूषा करतात.

भाषेच्या दृष्टीनें विचार केला तर पावरी व भिल्ल भाषा या एखाद्या नवख्या माणसास एकच वाटतील. परंतु त्या दोन्ही भाषा भिन्न भिन्न असून त्यांचे उच्चारहि वेगळे आहेत. एक गोष्ट मात्र खरी कीं, या दोनहि भाषांवर मराठी, गुजराती व हिंदी या तिन्ही भाषांचा आसर झालेला दिसून येतो. किंबहुना या तिन्ही भाषा एकत्र होऊनच थोडयाफार फरकानें त्यांची भाषा तयार झाली असावी. नमुन्यादाखल पावरी भाषेचे तीन नमुने पुढें देत आहें:—

| मराठी | पावरी |
| --- | --- |
| तुमचं नांव काय ? | तार नांव काय ? |
| तुम्ही कोठले ? | तूं काल्लो गांव वाल्लो ? |
| किती वाजले ? | कत्रा वाज्या ? |

पावरे लोकांत आडनांवें पण आहेत. पटले, खर्डे, पराडके व पावरा हीं आडनांवें बरींच आढळून आलीं. त्यांच्यांत अशी समजूत आहे कीं,

त्यांचे पूर्वज येथें उत्तरेकडून येऊन स्थाईक झाले आहेत.राणा प्रतापानें मेवाडचा त्याग केल्यानंतर त्याच्या बरोबर असलेले भिल्लांचें सैन्याहि आपल्या राजाप्रमाणेंच मेवाडचा त्याग करून सातपुडयाच्या आश्रयास आलें असावें. पावरा लोक हे अत्यंत स्वाभिमानी आहेत. निसर्गाच्या सान्निध्यांत ते राहात असल्यामुळें त्यांना दारूचें जबरदस्त व्यसन आहे. त्याचबरोबर ते गोड खातात. मद्य व मांसाचें प्राशन करतात. नंतर ढोल वाजूं लागतात. गाण्यांचे सूर निघून मग स्त्री-पुरुषांचा नाच सुरू होतो. रात्रभर नाचानें लोक बेहोष होतात.

'भंगोऱ्या' हा सणहि ते प्रत्येक गांवीं २–४ दिवसांचे अंतरानें साजरा करतात. सुंदर पोषाख करणें व दागिने घालणें यांत तरुणींची जणूं चढाओढ लागते. गुलाल उधळला जातो. ढोलांच्या व बांसरींच्या आवाजावर नाचगाणें सुरू होतें. दारूच्या सेवनानें ते आधींच भानावर नसतात. तरुण स्त्री-पुरुषांचे थवेच्या थवे उन्मत्त होऊन तारुण्याचा आनंद लुटतात. ह्याच वेळीं तरुण-तरुणींचीं लग्नें जुळतात. एखादा तरुण आपल्यास आवडेल अशी तरुणी हेरून तिला पळवून नेतो. तरुण तिला घरीं नेतो. प्रेम जमतें. त्यांच्या मागोमाग मुलीचा वडील तेथें येतो. गांवांतील पाटील व कारभारी यांसमवेत मुलीच्या वाटाघाटींचीं बोलणीं होतात. मुलाकडून मुलीच्या बापास रक्कम द्यावयाची असते. ह्या रकमेचा आंकडाहि ठरलेला असतो. पूर्वीं मुलीस ९९९ रुपये द्यावे लागत असत. नंतर हा आंकडा ५०९ वर आला. महागाईचे काळांत जीवनमान वाढल्यामुळें ५०९ रुपये देणें सुद्धां जड वाटूं लागलें. सध्यां ३२५ हा नवा आंकडा ठरविण्यांत आला आहे. मुलानें पैसे देण्याचें नक्की झाल्यावर मग पंच लग्नाच्या तयारीस लागतात. मुलानें किंवा त्याच्या बापानें पैसे देण्याचें नाकारल्यास मुलीचा बाप मुलीस घरीं घेऊन जातो. लग्नासाठीं मुहूर्ताची भानगड नसते. कोणत्या तरी बुधवारीं हळद लागते. नंतर गुरुवारीं लग्न लागतें. लग्नासाठीं मुलीकडचें वऱ्हाड मुलाकडे येतें. लग्नांत गोड मिष्टान्न, मांस व मद्य यांचा वापर होतो. त्याच्या जोडीस नाच-गाणें असतेंच.

कांहीं वेळां 'भंगोऱ्या'च्या सणांत दुसऱ्याच्या स्त्रीस पळविण्याचेहि गुन्हे होत असतात. अशा वेळीं त्या स्त्रीचा पति बलवान् असल्यास तो, त्या

पुरुषास गांठून त्याचा वध करण्यास मागें पुढें पाहात नाहीं. अगर स्त्रीचा पति कमी बलवान् असल्यास तो पंचापुढें 'झगडा' मांडतो. 'झगडा' म्हणजे फिर्याद ! पंच किंवा गांवकरी निर्णय देतात. त्या स्त्रीस परत नवऱ्याकडे जावयाचें नसल्यास तिच्या नव्या नवऱ्यानें लग्नाच्या पहिल्या नवऱ्याचा खर्च भरून द्यावयाचा असतो. खर्च भरून दिल्यावर ती स्त्री व तिचा नवा पति हे एकत्र राहूं लागतात. निसर्गाच्या सान्निध्यांत राहिल्यामुळें हे आदिवासी कांहींसे स्वैर वृत्तीनें वागतात. तरुण व तरुणी आपआपले जन्माचे साथीदार म्हणून खुल्या वातावरणांत एकमेकांची निवड करूं शकतात. सहवासोत्तर मुलाचें व मुलीचें सूत जमल्यास लग्नास कोणतीच आडकाठी नसते. यदाकदाचित् पैशाच्या देवघेवीमुळें किंवा त्यांच्या व्यय करण्याच्या कारणामुळें लग्नाचा करार फिसकटला तर मुलीचा बाप मुलीस परत नेतो. यामुळें एकाच मुलाचे व एकाच मुलीचे इतर मुली-मुलांशीं संबंध येऊं शकतात. अशा विचित्र पद्धतीमुळें नेहमीं झगडे होत असतात. जे लोक पंचांचा निर्णय न मानतां विवाहित राहूं शकतात त्यांना अपघाती मरणहि पत्करावें लागतें. एखाद्या स्त्रीनें परक्या पुरुषाशीं केवळ संभाषण केलें किंवा तिच्या नवऱ्याला एखाद्या पुरुषाबद्दल थोडासा संशयहि आला तर तो त्या वैराबद्दल त्या व्यक्तीचा निकाल लावून मोकळा होतो. पावरा आणि भिल्ल हे दोन्ही समाज एकोप्यानें एकत्र राहूनहि त्यांच्यांत मिश्र विवाह होत नाहींत.

जादूटोणा करणारे 'भगत' यांच्यांत आहेत. देवाला बोकडाचा बळी दिला म्हणजे रोगराईचें निवारण होत असतें, अशी ह्या आदिवासींची समजूत आहे. परंतु एखाद्या व्यक्तीला वश करणें किंवा त्याचा सूड उगवणें ते जादूटोण्यापेक्षां स्वतःच्या सामर्थ्यावर सहज करूं शकतात. ह्या आदिवासींत 'गवाल' नांवाचे लोक आहेत. हे लग्नप्रसंगीं किंवा एखाद्याच्या मृत्यूच्या वेळीं वाद्यें वाजवितात. हे गवाल वाद्यें वाजवून किंवा मजुरी करून आपली उपजीविका करतात. त्यांना इतर आदिवासी स्वतःपेक्षां कमी लेखतात. व्यक्तीच्या मृत्यूसमयीं ढोल वाजवितात. त्या विशिष्ट आवाजानें आजूबाजूचे लोक धांवून येतात. मृत्यूच्या वेळीं सर्व लोक जमतात.

सर्वसामान्य मनुष्यस्वभावानुसार यांच्यांतहि करमणुकीचे प्रकार आहेत. या आदिवासींत 'भाट' असतो. तो गाणीं म्हणून दाखवितो. नृत्य

करणें हा पावरे व भिल्ल यांचा आवडता छंद आहे. सामुदायिक स्त्रीपुरुषांचें नृत्य हा त्यांच्या जीवनाचा महत्त्वाचा भाग आहे. ढोलाच्या व शिंगाच्या ( शिंग हें तोंडानें वाजवितां येणारें वाद्य ) तालबद्ध आवाजावर त्यांचीं पावलें पडूं लागतांच नृत्याबरोबर गाण्याचीहि जोड असते. ' भंगोऱ्या ' च्या म्हणजे शिमग्याच्या वेळीं तोंडावर मुखवटे घालतात. शिवाय मोराच्या पिसाऱ्यांनीं व घुंगरूंच्या माळा घालून ते नृत्य करतात. एकदां नृत्य सुरू झालें म्हणजे सारे आसपासचे लोक जमतात. कामधंदा सोडतात व जीवनाचा आनंद ते लुटतात.

**सामाजिक जीवन**—सातपुड्यांतील हे आदिवासी ९९ टक्के निरक्षर आहेत, त्यामुळें त्यांना जगाचें तर राहोच परंतु आपल्या देशाचें किंवा तालुक्याचें सुद्धां नीट ज्ञान नाहीं. अक्राणीमहालांतील पांच पन्नास गांवें हेंच आपलें जग त्यांना वाटणें साहजिकच आहे. पूर्वापार चालत आलेले सामाजिक आचारविचार पाळणें व त्यांवर श्रद्धा ठेवणें ते धन्य मानतात. दहा-बारा झोपड्यांचें त्यांचें लहानसें गांव असतें. त्यांस ते पाडा म्हणतात. प्रत्येक पाड्याला एक पाटील असतो व त्याची नेमणूक सरकारी नियमानुसार असते. तसाच प्रत्येक पाड्याला एक कारभारी असतो. हा कारभारी लोकनियुक्त व गांवांतील प्रतिष्ठित असा नागरिक असतो. पाटील व कारभारी हे आल्यागेल्यांचें स्वागत करतात. ते वागतील त्याप्रमाणेंच गांवांतील आदिवासी वागत असतात. या लोकांत लोकशाहीचीं तत्त्वें इतकीं भिनलीं आहेत कीं, पाटील आणि कारभारी यांच्या पावलावर पाऊल ठेवणें ते पसंत करतात. त्यांत त्यांचा तोटा झाला तरी ते मागें पुढें पाहणार नाहींत.

ह्या आदिवासींच्या मुख्य ग्रामदेवता दोन होत : ( १ ) वाघदेव, (२) इंद्रदेव. यांचा मुख्य शत्रु जर कोण असेल तर तो म्हणजे वाघोबा. त्यांची शेळी, मेंढी, गाय, बैल इत्यादि पाळीव जनावरें व ते स्वत: यांना वाघोबाची सतत भीति असते. त्यासाठीं ते ह्या विघ्नेश्वराला फार पूज्य मानतात. विघ्नेश्वराला ते देव म्हणून समजतात, त्याची पूजा करतात व त्यास संतुष्ट ठेवतात. इतकेंहि करून वेळ आली म्हणजे ते त्यास ठारहि करतात. प्रत्येक पाड्यावर वाघोबाच्या नांवाचे दोन चार गोटे व त्यांवर शेंदूर लावले

आपणास दिसून येतील. ते गांवाच्या वेशीवर असल्यामुळें वाघोबांची स्वारी जरी जातीनें तेथें आली तरी तो गांवांत येऊं शकत नाहीं अशी त्यांची भाबडी कल्पना असते.

इंद्र अथवा इंदल देव ही त्यांची दुसरी आराध्यदेवता होय. इंद्र देवाचा पुजारी भगत असतो. एका विशिष्ट दिवशीं गांवकरी इंद्राची पूजा करतात. कळम्ब वृक्षाची फांदी जमिनींत रोंवून पूजा करतात. तेथें इंद्र देव येतो अशी त्यांची कल्पना आहे. इन्द्रापुढें ते कोंबडा किंवा बकऱ्याचा बळी देतात. मांसाहाराचें यथेच्छ जेवण व मदिरापान होतें. नंतर नाचगाण्याचा कार्यक्रम होतो. वाघदेवाची सुद्धां अशीच वर्षांतून एकदां पूजा होते. श्रावण महिन्यांत त्याची पूजा केल्याशिवाय ते नवें धान्य खात नाहींत. सर्व आदिवासी हे धर्मानें हिंदु आहेत. परंतु हिंदुधर्माबद्दल किंवा हिंदु देव-देवता किंवा पुराणाबद्दल त्यांना फारशी कल्पना नाहीं. त्यांना पौराणिक अशी एकच गोष्ट माहीत आहे. ती म्हणजे महाभारतांतील अश्वत्थामा ही व्यक्ति. पांडव-पुत्रांचें क्रूर हनन केल्यानंतर श्रीकृष्णाच्या शापानें कुष्ठपीडित झालेला अश्वत्थामा सातपुड्याच्या ‘ अस्तंब्याच्या ’ शिखरावर अधिष्ठित झालेला असून तो जिवंत असल्याची ह्या आदिवासींची कल्पना आहे. ‘ अस्तंब्याच्या ’ शिखरावर दिपवाळींत यात्रा भरते. सात चिरंजीवांपैकीं एक महान् चिरंजीव या आदिवासींच्या वांट्याला आला आहे.

ह्या आदिवासींच्या लोककथेंत ‘ राजा फान्टा ’ व ‘ गाण्डा ठाकूर ’ या दोन व्यक्तींचा उल्लेख वारंवार आढळून येतो. बारकाईनें तपास केला तेव्हां असें आढळून आलें कीं, पाण्डवांचा जो धनुर्धारी राजा अर्जुन यास ते ‘ राजा फाण्टा ’ म्हणतात. राजा पाण्डव याचा तो अपभ्रंश असा शब्द आहे. तसेंच श्रीकृष्ण म्हणजे ‘ गाण्डा ठाकूर ’ होय. गाण्डा म्हणजे वेडा अथवा खोडकर. गुजराती भाषेंत श्रीकृष्णास ठाकूरजी म्हणतात. तलाई मोख नांवाचें एक खेडें आहे. तेथें ‘ भूताकेश ’ नांवाचें एक झाड असून त्या झाडाला अर्जुन व श्रीकृष्ण यांनीं घोडे बांधल्याची ते आख्यायिका सांगतात. तसेंच देवडूके नांवाचें एक स्थान आहे. तेथें राम-सीतेचे अवशेष असल्याचें ते सांगतात. सातपुड्यांतील एका उंच शिखराला ‘ देवमोगरा ’ हें नांव आहे. तेथें कालिका मातेची मूर्ति आहे. ह्या मूर्तीपुढें बोकडाचे

बळी देतात. पूर्वीं ह्या कालिकामातेची मूर्ति सोन्याची होती. एकदां पुजाऱ्यानें देवीची आंगठी तोडली तेव्हांपासून ही देवी पितळी बनल्याचें सांगतात. तोरणमाळ येथें नागार्जुनाचें स्थान आहे. तेथें महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरत असते.

आदिवासी समाजांत हिंदु धर्मातील सण पाळण्याची प्रथा आहे. त्यांचे सर्वांत मोठे सण म्हणजे ' दिवाळी ' व 'भंगोऱ्या' हे होत. भंगोऱ्या म्हणजे ह्या आदिवासींची होळी किंवा शिमगा. या दोन्ही सणांचे वेळीं ठिकठिकाणीं यात्रा भरतात. यात्रेच्या वेळीं घरांतील मौल्यवान् पोषाख घालून फिरणें व नाचणें हें सर्वस्वीं रूढ आहे. ह्या आदिवासींची दिवाळी आपल्या दिपवाळीनंतर सुरू होते. आपली दिपवाळी फार तर तीन दिवस असते, तर यांची दिवाळी दोन महिने चालते. प्रत्येक गांवची दिवाळी वेगवेगळ्या दिवशीं साजरी करतात. गांवचे पाटील व कारभारी दिवस निश्चित करतात. तो दिवस इतर ठिकाणीं कळविला जातो. सायंकाळपासून आसपासचे लोक एकत्र जमूं लागतात. वाघोबाजवळ दिवे लावतात. बैलांची ओंवाळणी करतात.

' बोंडा ' नाच करणारे हे आदिवासीमध्यें कांहीं लोक आहेत. ह्या नाच करणाऱ्या लोकांजवळ राम, सीता, रावण, हनुमान, कृष्ण इत्यादि पंचवीस पौराणिक देवादिकांचे मुखवटे असतात. हे मुखवटे लाकडाचे कोरलेले असतात. हंगामाचे दिवस म्हणजे धान्य निघूं लागतें तेव्हां हे बोंडा नाच करणारे लोक घरांतून बाहेर पडतात. ढोल व शिंग हीं वाद्यें व मुखवटे घेऊन ते प्रवासाला निघतात. एखाद्या गांवांत नृत्य करावयाचें ठरविल्यास ते उंच टेकडीवर जाऊन ढोल जोरजोरानें वाजवितात. आसपासच्या दोनचार मैलांच्या टापूंतील सर्व आदिवासींना त्यांच्या आगमनाची वार्ता हां हां म्हणतां समजते. मुलें तर आनंदानें नाचूं लागतात. मग ते लोक तोंडावर मुखवटे चढवून व त्याप्रमाणें वस्त्रें घालून नाचूं लागतात. आजूबाजूचे शेंकडों लोक त्यांचा नाच पाहावयास जमतात. त्यांच्यांतील एक जण नृत्य करतो, दुसरा वाद्यें वाजवतो व एक जण त्या नृत्याची पार्श्वभूमि किंवा इतिहास जमलेल्या लोकांना सांगतो. नृत्य संपल्यावर जमलेले लोक आपल्या शक्तीनुसार त्यांना धान्य देतात. बोंडा नाच करणारे लोक केवळ नृत्य करूनच आपली उपजीविका करतात.

ह्या आदिवासींची उपजीविका शेतीवरच चालत असते. ज्वारी, बाजरी, मका, मोर व बर्टी हीं धान्यें ते तयार करतात. त्यांच्या शेतीचें मुख्य अवजार म्हणजे नांगर होय. हा नांगरहि लहान आकाराचा असतो. जें धान्य पिकतें तें कुटुंबाला वर्षभराहि पुरत नाहीं. हे निरक्षर असल्यामुळें बाहेरून आलेले व्यापारी व सावकार त्यांना लुबाडतात. धान्य व सामान उधार देऊन व व्याजावर व्याज चढवून ह्या आदिवासींना लुबाडण्याचा ते व्यवसाय करतात. त्यामुळें कष्ट करूनहि आदिवासी शेवटीं कफल्लक राहतो. सावकार व व्यापाऱ्यांचा तो एक प्रकारें गुलामच असतो. शहराकडे जाण्यासाठीं मार्ग नीट नसल्यामुळें त्यांनीं स्वतः पिकविलेला माल स्वस्तांत द्यावा लागतो व बाहेरून आलेला माल भरमसाट किंमतींत त्यांना विकत घ्यावा लागतो. कर्ज फिटलेंच नाहीं तर ते ताबडतोब स्वतःचे बैल, शेळी किंवा गाय विकून सावकाराचें देणें फेडून टाकतात. हे आदिवासी भोळसट असले तरी एकवचनी आहेत. दुसऱ्याची घेतलेली वस्तु ते कटाक्षानें परत केल्याशिवाय राहणार नाहींत. खून व चोरीच्या गुन्ह्यांत ते कोर्टांत किंवा पोलिसासमोर ताबडतोब गुन्हा कबूल करून मोकळे होतात. ह्या लोकांत तंबाकू ओढण्याचें फार प्रस्थ आहे. तंबाकू गुडगुडींतून ओढणें ते पसंत करतात. स्त्री व पुरुष दोघेहि धूम्रपान एकत्र करूं शकतात. तंबाकूच्या जबरदस्त व्यसनामुळें यांच्या शरीरावर परिणाम झाल्याचे दिसून येतात. परिश्रम व कष्ट करणाऱ्या वृत्तीवर त्याचा परिणाम होतो व ते साहजिकच आळशी बनतात. शेतीचा व्यवसाय म्हणजे एक जुगारच म्हणावें लागेल. पाऊस नीट व वेळेवर पडला तरच धान्य येईल. अवर्षण पडलें तर हे लोक व्यवसायासाठीं बाहेरच्या प्रदेशांत मुळींच जाणार नाहींत. तसेंच उपाशी, अर्धपोटी राहून आपली कालक्रमणा करतील. आपला समाज व आपले लोक सोडून ते कधींहि दुसरीकडे जावयाचे नाहींत. ते जगतील तर आपल्या आप्तासमवेत आणि मरतील तरी ते आपल्या आप्तासमवेतच ! आणि तेहि सातपुडयाच्या भूमीवर; मग तें मरण नैसर्गिक असो कीं मनुष्यप्रेरित असो.

भिल्ल लोक आतां मजुरी करूं लागले आहेत. परंतु पावरा सहसा मजुरी किंवा लोकांची नोकरी करीत नाहींत. काळाचें त्यास कसलेंहि भ

नाहीं. दिवस उगवला तरी त्यास त्याची मुळींच फिकीर नाहीं. 'आज वार कोणता किंवा महिना कोणता ? किंवा आपल्यावर राज्य कोणाचें आहे. हें त्यांना माहीत नाहीं. आपली झोपडी, डोंगर-उतारावरील शेती आणि पोटच्या मुलाप्रमाणें जोपासलेलीं गुरें यांच्या सान्निध्यांत हे आदिवासी काल-क्रमणा करीत असतात. आहे त्यांत समाधान मानून जीवनाचा जास्तींत जास्त आनंद लुटणें हें त्यांच्या संस्कृतीचें सार आहे.

## लोकगीतें व कथा

सातपुड्यांतील सर्व भिल्ल व पावरे हे जवळ जवळ निरक्षर आहेत. त्यांचीं लोकगीतें व लोककथा तशा पुष्कळच आहेत. त्यांबद्दल त्यांना महत्त्व वाटत नसल्यामुळें त्या संकलन होऊं शकल्या नाहींत. पावरे लोकांत ' मडवी ' नांवाचा भाट असतो, तो लोककथा व गाणीं म्हणून आदिवासींचें मनोरंजन करीत असतो. राजा फाण्टा म्हणजे पाण्डव राजे व गाण्डा ठाकूर म्हणजे श्रीकृष्ण, यांच्या बद्दलच्या पुष्कळच कथा ते गाऊन दाखवितात. अशा कथा एकत्रित केल्या तर या आदिवासींचा पुष्कळसा इतिहास उपलब्ध होऊं शकेल. पावरे लोक लग्न व नृत्य-प्रसंग यांत सामुदायिक रीतीनें गाणीं म्हणतात. स्त्रियांचीं लोकगीतें फारच भावनाप्रधान असतात. त्यांचे मंजुळ आवाज निसर्गांत, डोंगरांच्या दऱ्याखोऱ्यांत पसरतात तेव्हां त्यांचे प्रतिध्वनि ऐकत राहावेसे वाटतात. एका गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटतें तें हें कीं, आदि-वासी स्त्रिया जात्यावर दळतांना गाणीं म्हणत नाहींत. वास्तविक पाहतां आपल्याकडे सर्वसाधारणपणें प्रत्येक स्त्री जात्यावर दळतांना गाणीं म्हणत असते. त्या गाण्यानें श्रम नाहींसा होत असतो. आदिवासींच्या लहान मुलांसाठीं पाळणे नसतात. त्यामुळें त्यांना झोके देण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं व झोके देतांना आपल्याकडील स्त्रिया गाणें म्हणतात तशा तऱ्हेचीं गाणीं ह्या आदिवासी स्त्रिया म्हणत नाहींत. बोंडा नाच करणारे आदिवासी पौराणिक कथा लोकांना सांगतात व त्यांचें मनोरंजन करीत असतात. जादूटोण्याच्या व लहान मुलांच्या गोष्टी आहेत. पावरे व भिल्ल यांची भाषा वेगळी असल्यामुळें गाण्यांचे प्रकारहि यांच्यांत वेगवेगळे आहेत. हरिजन आदिवासींचीं गाणीं गुजराथी भाषेंत असतात.

## पावरी भाषेंतील लोकगीतें:—

(१) डुली ठाणी रे । कलगी घर लिंबली रे लोल ॥
बाय् गय रे । कल्या गागर लिंबली रे लोल ॥
बाय् गय रे । खुताऱ्या गर लिंबली रे लोल ॥
बाय् लाण्या रे । पायामें तुळा लिंबली रे लोल ॥
बाय् लाव्या रे । आयमें वाक्या लिंबली रे लोल ॥

मराठी अर्थ:—टोळंबीच्या एक झाडाखालीं एका म्हातारीचें घर होतें ! तिला एक भाऊ होता. तो तांब्या आणि घागर घ्यायला गेला. तेथून तो सोनाराकडे जाणार आहे. तो येतांना पायासाठीं वांक्या व हातासाठीं वेल्या हे दागिने आणणार आहे.

(२) इंदीवाष्य राजा कोय इंदी राजा ॥ कोय तेरी बोने कोई
पुरमां वांजण बालपण वाजी पुरमा वांजीण ॥ चाडी बोरी रोयलो
भोई राजा मालमत्ता ली गयलो भोई राजा ॥ खांबा टेका बांदीनें
पुरमां वांजणे चिर बोंदा मारोन मारे देनलो कोथ भोई राजा.
माल कुबली रोयली पुरमा वांजणें ॥ मालमत्ता ली गयलो भोई राजा
हात फेरा लुटाय गयलो वली विहाण ॥ विराणी निका बाते बाल बच्चे
रेतो ते नेय जातो.
कमरेन लुगड, सोडाली लेदलो ॥ नांगी भोंगी वाली काडली राणीले
ओली विहाणं बाल नेयनें बच्चो नेय आंखो माल लुटाय गयो ॥
इंदी राजा गोरी गयली पुरमा वांजण ॥
दादा, दादा कोरीन बुलाडतीली गोण मोठो विखो पडलो
बाबीवा बाबी ॥ मोटु विकोहे
नांगी भोंगी छे ॥ दादा कोयज
बाल नेयनें बच्चों नेय ॥ मेहे वाल काडली
च्चो इंदी राजा कोयतलो ॥ तो हों काहा गरमेंनें आखली काडीही
बाल नेयनें बच्चों नेय तियाली आखली काडी.

मराठी अर्थ:—इंद्र राजाची बहीण पुरमा हिला मूलबाळ कांहींच नव्हतं. एकदां भोजराज नांवाचा एक चोर जंगलांत आला व तेथें लपून राहिला. एके रात्रीं तो सर्व मालमत्ता घेऊन गेला. पुन्हां एकदां तो चोरी

करावयास आला तेव्हां त्यानें पुरमाला खांबाला बांधून चाबकानें पुष्कळ मार दिला. तेव्हां पुरमानें मालमत्ता वगैरे सर्व त्याला सांगून दिली. अशी चोरी त्यांच्या घरांत एकूण सात वेळां झाली. त्यामुळें पुरमेचीं तिच्या नवऱ्यानें ( ओली विहाण ) सर्व वस्त्रें हिसकून घेतलीं व घरांतून काढून दिलें. तिला मूलबाळ नव्हतें, म्हणून चोरी झाली असा गैरसमज ' ओली विहाण ' याचा झाला होता. ती आपल्या भावाकडे म्हणजे इंद्रराजाकडे गेली व दादा, दादा म्हणून हांक मारून रडूं लागली. रडतांना ती म्हणत होती—मला मोठा त्रास आहे. मला घरांतून हांकलून दिलें. माझे कपडे हिसकावून घेतले. मला मूल नसल्यानें नवऱ्यानें घरांतून काढून दिलें.

( ३ ) माल बोयडी चोडी गयलो ।। मालु राणो ।।
हुना रूपान गुणूक तारी ।। मालु राणानें ।।
मुबाड टुवी रोयलो ।। मालु राणी ।।
कर्ज मागणें गयलो ।। वणथर बामण ।।
जल हिंदीन पाण्यारी ।। ओरी मुरी ।।
ओणथर बामण देखल्यो ।। राणी देखी लेदली ।।
जुमणी बारे बोही रोयलो ।। वणथर बामण ।।
मांडा डुबरे, कसकलो तारो ।। वणथर बामण ।।
आथ नहूंनें तातो तऱ्यो ।। वणथर बामण ।।
डावा कानांत गुडी तारी ।। वणथर बामण ।।
आथ नळांन नळं तारो ।। वणथर बामण ।।
नुमनी वारे थुवां माय़ ।। गोही रोयलो वणथर बामण ।।
रणथ वाजाडी रोयलो ।। वणथर बामण ।।
ओरी मुरी काय चिडी बुलेहे ।। उडीने चाली चिढे हुंदणे ।।
हिकरान वेह दरीने ।। मुरी ओरी काले जुगे उडीन गयो ।।
ओयलो तेवीं जुमणी बारें ।। देखलेदो वणथ रोह ।।
तिना देखींन ।। नेड मुंड्या टुटो पड्या ।
आथे नखे फाके करीन जोड फोट ।। रोयली ओरी मुरी ।।

मराठी अर्थः—माळ नांवाच्या टेकडीवर माळू नांवाचा जंगलाचा राजा मोहूच्या झाडाचें रक्षण करण्यासाठीं चढला होता. त्याच्या जवळ

सोन्याची गोफण होती. तिच्यानें तो रक्षण करीत होता. मोहूचा कर्ज मागण्यासाठीं वणथर नांवाचा ब्राह्मण मालू राजाकडे गेला होता. नर्मदा नदींत ओर्रा व मुर्रा या नांवाच्या दोन राण्या पाणी भरण्याकरितां आल्या होत्या. त्याला त्या दोन राण्या आवडल्या म्हणून गुढग्याची टिंगरी बनवून तो वाजवूं लागला. तो आवाज राण्यांना गोड वाटूं लागला, म्हणून घारीचा वेष घेऊन त्याला पाहण्याकरितां शोध करूं लागल्या. तो एका साबराच्या दरींत सांपडला. त्यांनीं त्याला चोंचीनें व नखानें घायाळ केलें.

( ४ ) शिकारीचें गाणें—

करूं हूं शिकार आखा मिलीनी ।। बंदुक खांदापर लेजुरा ।।
डुंगुर चढूं हूं जुराखा ।। गुळी भरू परमाणे ।।
बारीमें हे वागेरा ।। तीनांहां देखाडूं चांदेरा ।।
हौसकरीन गुळी देजारा ।। आपूं ठगाया होटल्या मोयो ।।

मराठी अर्थः—आपण सर्व जण मिळून शिकार करूं या ! बंदूक खांद्यावर ठेवून जोर देऊन डोंगर चढूं या ! बंदुकींत गोळ्या बेताच्या घालूं. दरीमध्यें वाघ आहे. त्याला आपण ठार करूं या; नीट बसून, नेम धरून गोळी मारा; पण अरे—हें काय ? आपण फसलों, वाघाऐवजीं ससा मेला—

( ५ ) शेतकऱ्याचें गाणें—

गुफला आथें लिंदुरा ।। गरगर जोराखो फिरहूं रा ।।
दगडा देहूं उभा उभा ।। उडाडहूं चिडा फोड फोड रा ।।
हूरू हूरू वाहलू वाजेरा ।। कमाई खेतूम आल वेहेरा ।।
माळा पर आवूरां रो यूं रा ।। हेल्लो खाईन गीत गाऊं रा ।।

मराठी अर्थः—आपण हातांत गोफण घेऊन तिच्यांत खडे भरून गरगरां फिरवूं या आणि पांखरांना फडफडां उडवूं या ! सूं सूं असा आवाज करून वारा रानांतील पिकांस हलवीत आहे. माळावर बसून न्याहरी करूं व सर्व जण गाणें गाऊं या !

( ६ ) शोकगीत—

पावु डाया वाडू रोगेरा ।। पावू रोगे राखी रियोरा ।
पावु तारवायु साटको टाक्योरा ।। पावु भमेको वाली देदोरा ।।
पावु भमेकोवाली देदोरां ।। पावु नेये हाजों के एयोरा ।।

पावु दुदर्ली इयू रूमालीमें ॥ पावु मुरदो बांदी देदोंरा ॥
पावु पोटल्हही वराहि देदिरा ॥ पावु धुल्ये पोलिस आलारा ॥
पावु आथे बेड्या सोड्यारा ॥ बोंहीं खाजें पिजे रेजेवा ॥
बोंहीं आयतां चाल्यो जेल्हमें ॥

मराठी अर्थ—भाऊ, वाडवडिलांपासून भांडण आहे. भाऊ, तूं राग मानूं नको. परंतु भावानें ऐकलें नाहीं व तिच्या नवऱ्यावर तरवारीचा वार करून त्याचे तुकडे तुकडे केले. बहिणीनें मलमलच्या कपड्यामध्यें मुडदा बांधला व पोलीस पाटलाकडे वर्दी दिली. धुळ्याचे पोलीस आले व त्यांनीं भावाच्या हातांत बेड्या घातल्या. त्या वेळेला भाऊ बहिणीला म्हणतो कीं, तूं आतां मजा कर, मी आतां जेलमध्यें जात आहे. इत्यादि.

## एक गोष्ट : " म्हातारी आणि म्हातारा "

एक होता म्हातारा आणि एक होती म्हातारी. ते फार मेहनती होते. म्हातारा दररोज नियमानें शेतात जात असे. एकदां शेतांत तो जात असतांना त्यानें बायकोला सांगितलें कीं, शेतांत जेवण घेऊन ये. तो शेतांत न जातां घराच्या मागें लपून बसला. त्या म्हातारीनें एकंदर पांच भाकऱ्या केल्या आणि त्यांतल्या दोन भाकऱ्या खाऊन टाकल्या. हें सर्व म्हाताऱ्यानें लपून पाहिलें. नंतर तो घरांत आला. त्यानें म्हातारीस सांगितलें कीं, किती भाकऱ्या केल्या तें मी सांगतों. एकूण पांच भाकऱ्या तूं केल्या व त्यांतून दोन खाऊन तीन भाकऱ्या शिल्लक ठेवल्या आहेस. मग ती म्हातारी म्हणाली, " तुला सगळें समजतें तर हें तूं कुठें शिकला ? " मग तिनें सगळ्या लोकांस सांगितलें कीं, माझ्या नवऱ्याला भविष्य समजतें. ही गोष्ट सगळीकडे पसरली. तेथल्या राजाला ही गोष्ट कळली. त्या राजाच्या राणीची सोन्याची आंगठी हरवली होती. मग त्यासाठीं त्या म्हाताऱ्याला बोलावण्यासाठीं राजाचे शिपाई आले. तेव्हां म्हातारा घाबरला व तो म्हातारीस शिव्या द्यावयास लागला. शिपायांनीं सांगितलें कीं, राजानें तुम्हांस बोलावलें आहे. तेव्हां म्हातारा तयार झाला आणि तो शिपायांबरोबर राजवाड्यांत गेला. राजानें त्यास सांगितलें, " तूं राणीची हरवलेली आंगठी शोधून काढ. " म्हाताऱ्यानें सांगितलें कीं, "आतां अर्धा दिवस आहे. भविष्य पाहतां येत नाहीं. उद्यां सकाळीं सांगेन. " नंतर

सगळे लोक झोपले. तेथील इंद्राबाई नांवाची एक बाई होती. तिनें आंगठी चोरली होती. तिला चिंता लागली; तिला झोंप येईना. ती हळूच उठली, आणि त्या म्हाताऱ्याजवळ आली. तिनें सांगितलें, " मीं आंगठी लपविली आहे, पण माझें नांव सांगू नको; मीं ती आंगठी आंघोळीच्या पाटाखालीं लपवून ठेवली आहे. " नंतर ती परत गेली. सकाळीं म्हाताऱ्याचें भविष्य ऐकण्यासाठीं राजवाड्यांत सर्व लोक जमले. आठ वाजतां राजा राजवाड्यांत आला. तेव्हां म्हाताऱ्यानें सांगितलें कीं, राणीची आंगठी आंघोळीच्या पाटा-खालीं आहे. मग ती आंगठी सांपडली. राजानें म्हाताऱ्यास दोन हजार रुपये बक्षीस दिले, शिवाय एक घोडा दिला व एक बंदूकहि बक्षीस दिली.

☆ ☆ ☆

# ठाणें जिल्ह्यांतील आदिवासी

संग्राहक : **प्रा. दा. गो. बोरसे**

निवेदक :—**श्री. रघुनाथ शंकर साबळे**, एम्. एस्सी.

महाराष्ट्रांत सातपुडा आणि सह्याद्रि यांच्या कुशींतील सर्वच भागांत हीं निसर्गाचीं बाळें आढळतात. महाराष्ट्रांत मुख्य वस्ती भिल्लांची. त्याशिवाय वारली, कातकरी ऊर्फ कातोडी, ठाकूर, डांगी, कोळी, कोंकणी, मावची, तडवी, पाडवी, वसावा, पावरा इ. जमाती प्रमुख मानल्या जातात. कोंकणाचा विचार केल्यास आपणांस ठाणें-कुलाब्यांत वारली, कातोडी व ठाकुरांची वस्ती प्रमुखपणें आढळते. डांग जिल्हा संपूर्णपणें डांगी जमातीनें व्यापला आहे. नाशिक जिल्हयाच्या पश्चिम भागांत कोंकणे, मावचे यांची वस्ती आढळते. पश्चिम खानदेश तर आदिवासींचा बालेकिल्ला. त्यांतील कांहीं तालुके उदा० अक्कुबुवा व अक्राणीमहाल यांत जवळ जवळ सर्व भाग भिल्लांची वस्ती आहे. तर तळोदें, शहादें, शिरपूर, नवापूर, नंदुरबार, साक्री आदि तालुक्यांतील बराच भाग त्यांनीं व्यापला आहे. नगर जिल्ह्यांतील पश्चिम भागांतहि ठाकूर व महादेव कोळी यांची वस्ती आहे.

ठाणें जिल्ह्यांत वारली, ठाकूर, कातकरी, दुबळे, घोडीया, महादेव

# कोंकणचा आदिवासी समाज



नाच



देवतांचे बली



वाद्यें



महालक्ष्मी यात्रेचें दृश्य

# आदिवासी समाज



वाघदेवाची पूजा





आदिवासींच्या देवता

कोळी, छोद्रा, कोकणे, नायक इत्यादींची वस्ती आहे. जिल्हयाच्या एकूण वस्तीपैकीं जवळ जवळ २७ टक्के वस्ती आदिवासींची आहे. मुख्य भरणा वारली, ठाकूर व कातकऱ्यांचा. कातकऱ्यासारख्या जमातीचें आयुष्य वर्षा-पून आठ महिने जंगलतोड व विशेषत: कोळसा तयार करण्याचे कामीं जात असल्यानें, शेतीव्यवसायाशीं त्यांचा संबंध विशेष येत नाहीं. त्यांची वस्ती डोंगर-टेकड्यांचे माथ्यावर आढळते. बायकांमुलांसह आठ महिन्यांचा काळ वेगवेगळ्या ठिकाणीं काढावा लागत असल्यानें कायम वस्ती करण्याची जरूरी भासत नाहीं. जमेल तेथें नवीन झोपडी उभारावी नगर पूर्वीची झोपडी थोडीफार सुधारून पावसाळा काढावयाचा.

**धरती व कणसरी मातेची पूजा**—आदिवासी जमाती शेतीवरच आपला चरितार्थ चालवीत असल्यानें धरतीमातेची उपासना आणि पूजा यांनाहि त्यांनीं आपल्या जीवनांत कायमचें स्थान दिलेलें आहे.

निसर्गानें धरती-मातेला पहिली आंघोळ घातली कीं तिची पाठ फाडायला—नांगरट करायला—शेतकरी तयार होतो. शेतांत नांगर नेल्यावर तेथें नांगराचा फाळ प्रथम जमिनींत शिरेल त्या ठिकाणीं कुंकवाची एक चिमूट सोडायची. धरती मातेला कमींत कमी एवढी तरी पूजा पाहिजेच. ज्यांना शक्य असेल ते नारळहि फोडतात. यानंतर सर्व शेत नांगरून तयार करावयाचें.

नांगरट, चिखलणी वगैरे मशागत करून रोपणीकरितां तयार केलेल्या शेतांत रोपणी म्हणून भाताची पहिली चूड लावण्यापूर्वीं वर वर्णन केल्याप्रमाणेंच कुंकू लावून धरतीमातेची पूजा करतात.

सर्वांत मोठा आणि महत्त्वाचा समारंभ भाताची मोठ्या प्रमाणांत झोडणी ( मळणी ) सुरुवात झाल्यावर करण्यांत येतो. भात झोडणीकरितां खळें तयार करतात. जमीन स्वच्छ करून पाणी मारून बैलांचे पायांखालीं तुडवून व नंतर शेणकाल्यानें सारवून तयार करतात. अशा पद्धतीनें जमीन भात झोडणीस केल्यास भात मातीबरोबर मिसळून वाया जात नाहीं. पूजा-समारंभास सुरुवात करण्यापूर्वीं सर्व भात झोडून त्यांतील पळींज वेगळें काढतात. या कामाकरितां सुपांचा उपयोग करतात. अशा प्रकारें तयार केलेलें भात मळणीच्या खांबाभोंवतीं मध्यें कांहीं अंतर सोडून चारी बाजूंनीं

वर्तुळाकार पाळीसारखा ढीग करतात. या ढिगाचे आंतल्या व बाहेरच्या अशा दोन्ही बाजूंनीं राखेच्या ओळी ( रेषा ) आंखतात. दोन तीन नारळ फोडून या धान्याच्या राशीवर एरंडेल तेलाचा दिवा लावला जातो. या वेळीं पूजेकरितां कुंकवाबरोबरच इतर वस्तूंचीहि जरूरी भासते.त्यांत टिचकी बांगडी, माडा, चार पांच बांगड्या, गांठी, नाडा, ऊद, ऊंस, करंडा, फणी इत्यादींचा समावेश होतो. टिचकी बांगडी म्हणजे बेगडीच्या कागदासारख्या रुपेरी कागदापासून कर्णफुलाच्या आकाराचे कापलेले तुकडे जाड कागदावर अगर पुठ्ठयावर चिकटविलेले मिळतात. गांठी ही एक मण्यांची माळ असते. बांगड्या लहान लहान व या कामाकरितांच वापरण्याच्या दृष्टीनें बनविलेल्या असतात. नाडा हा तांबडा व पिवळ्या रंगाचे दोरे एकत्र करून दोरीसारखा जाड बनविलेला असतो. उदाला या भागांत लोभान या नांवानें ओळखलें जातें. करंडा फणी खेळांतील खेळण्यासारखे लहान आकाराचे असतात. करंड्यांत थोडेंसें कुंकू राहील अशी सोय असते.

पूजासमारंभ सायंकाळपासून सुरू होतो. सर्वांनाच हा समारंभ मोठ्या प्रमाणावर करतां येत नाहीं. मात्र वर सांगितल्याप्रमाणें पूजा बहु-संख्य लोक करतात. समारंभाचें मुख्य आकर्षण म्हणजे त्या रात्रीं घांगली-वर होणारा गाण्याचा कार्यक्रम. घांगली हे दोन सुकाविलेल्या भोपळ्यांना मध्यें एक वांबू व तारा लावून बनविलेलें तंतुवाद्य असतें. गांवांत अगर चार दोन गांवांत एखादाच मनुष्य घांगली वाजविण्याचें व त्याबरोबरच कणसरी ( धान्य ) मातेचें गुणगान प्रेक्षकांना ऐकविण्याचें काम करूं शकतो. पुरुष व बायका दोघांनाहि हा कार्यक्रम अतिशय आवडणारा असतो. आपल्या-कडे देशावर सत्यनारायणाची पूजा जशी सांगितली जाते व सत्यनाराय-णाच्या कृपेमुळें अगर कोपामुळें काय काय घडलें याच्या गोष्टी व कथा काव्यरूपानें ऐकविल्या जातात तसेंच. आदिवासी मुलखांत कणसरी म्हणजे धान्य उत्पादनाची कथा. तत्पूर्वीं पृथ्वी व स्वर्गांतील परिस्थिति, कणसरी मातेच्या रुसव्यामुळें मानवांना व प्रत्यक्ष देवलोकालाहि सहन करावे लाग-णारे कष्ट इत्यादि बाबी अतिशय खुमारदारपणें वर्णिल्या जातात. रात्रीं सुरू झालेला हा कार्यक्रम दिवस उगवेपर्यंतहि चालू राहतो. कार्यक्रम संपल्यावर नारळाचा प्रसाद वांटला जातो.

**आदिवासींचे सण:**—सणांची निवड करतांना त्या त्या सणांचे वेळीं तयार होणारा पदार्थ जेवणांत समाविष्ट केला जातो. अक्षरशत्रु असणाऱ्या या जमातींत बहुमोल असा नाच, गाणीं आणि गोष्टी यांचा ठेवा पिढ्यानुपिढ्या चालत आला आहे आणि तो टिकविण्यास सणांचे प्रसंगच हातभार लावतात. तरुण-तरुणी रात्रंदिवस त्याकरितां अविश्रान्त मेहनत करून आपल्या ताफ्याचे कार्यक्रम पहिल्या दर्जाचे व्हावेत याकरितां प्रयत्न करीत असतात.

हिंदु संस्कृतीचा परिणाम आदिवासी भागांतील जीवनावर सर्वच बाबतींत झाला आहे. मग सण तरी त्यांतून कसे सुटणार ? दिवाळी, शिमगा, संक्रांत, गौरी वगैरेसारखे सण जरी आपल्यासारखेच असले तरी ते साजरे करण्याची पद्धत वेगळी असते.

दिवाळी म्हणजे सर्व सणांचा राजा. गवत व भात-कापणीची मजुरी हातीं आलेली असते. शिवाय शेतींतलें भात व इतर धान्याहि हातीं येतेंच. दिवाळीचे दिवस म्हणजे नवीन कपड्याचा हमखास खरेदीचा हंगाम. दिवाळींत कोणतेंहि आणि कितीहि महत्त्वाचें काम असो, कोणीहि मजुरीनें कामास जाणार नाहीं. दिवाळीचे दिवसांत एक किंवा दोन दिवस गोड जेवण घ्यावयाचें. तांदळाच्या पिठांत थोडासा गूळ आणि तांबडा भोपळा मिसळून केलेल्या भाकरी हिरव्या पानांत उकडून घ्यायच्या. याच्या बरोबर उकडलेल्या चवळ्या, थोडें मीठ, मिरची आणि मिरपूड मिसळून उसळ तयार करावयाची. घरांतील वडील कर्त्या माणसानें ही उसळ आणि भाकऱ्या आपल्या हातानें घरांतील सर्वांना वांटायच्या. संक्रांतीच्या वेळीं तांदळाच्या पिठांत गूळ टाकून लाडू तयार करतात. शिवाय अंडीं, कोंबडी व जंगली जनावरें यांवरहि या वेळीं संक्रांत येते. शिमग्याच्या वेळींहि जंगलकामाचा पैसा हातीं आलेला असल्यानें व मजुरीकरितां बाहेर गांवीं गेलेली सर्व मंडळी घरीं परत येत असल्यानें सणास विशेष महत्त्व येतें. दिवाळीपासून सुरू झालेले नाच-गाण्यांचे ताफे किंवा फड या वेळी अगदीं बहरीला येतात. मुलांच्या नाचाचे ताफे गांवोगांवीं हिंडून आपलें कौशल्य जनतेच्या नजरेसमोर आणतात. शिमग्याच्या नाचांत इतर गांवीं जाणाऱ्या ताफ्यांत मुली भाग घेत नाहींत. या वेळीं नाचणारीं मुलें आपल्या तोंडावर निरनिराळे मुखवटे लावतात व चित्रविचित्र पोषाख करून व अंग आणि तोंड रंगवून कांहीं जण विदूषकहि बनतात.

आदिवासींचें वैशिष्टय असलेले सण म्हणजे नवें व कोंवळी खाणें आणि वाघबारस हे होत.

**नव्यांचा सण**—हा हळव्या जातीचीं भातें तयार झाल्याबरोबर करतात. ही जात अतिशय लवकर म्हणजे पेरल्यापासून दीड महिन्यांत तयार होत असल्यानें भात तयार झाल्याबरोबर तें कापून, मळून त्याचे पोहे बनवितात. घरांतील कर्त्या पुरुषानें हें नवें धान्य आपल्या हातानें सर्वांना वांटलें म्हणजे नवीन धान्य घरांत वापरण्यास मोकळीक मिळते. जो तो शेतकरी आपल्या सवडीप्रमाणें हा सण साजरा करतो. गूळ घातलेली भाकरी हेंहि या सणाचें मुख्य पक्वान्न होय.

**कोंवळीचा सण**—हा सण एक किंवा दोन दिवस न करतां कित्येक दिवस साजरा करतात. पावसाळ्याचे सुरुवातीस जंगलांत असंख्य प्रकारच्या कोंवळ्या वनस्पति उगवतात. घरांत अन्नाचा कणहि शिल्लक नसल्यानें या भाज्यांवरच सर्वांना आपली गुजराण करावी लागते. या भाज्या भरपूर प्रमाणांत मिळतात. त्यांत जरुरीपुरती मीठमिरची टाकायची. भाकरी असली तरी ठीक, नसली तरी बिघडत नाहीं. कोंवळी भाजी मिळेपर्यंत म्हणजे एखादा महिना तरी या सणानिमित्तानें सहज निघून जातो.

**वाघबारस**—म्हणजे गोपाळांचा किंवा गुराख्यांचा सण असतो. जनावरांचें वाघोबापासून रक्षण करायचें म्हणजे वाघदेवाला प्रसन्न केलें पाहिजे. त्याकरितां एखादी कोंबडी मारून सगळ्यांनीं मिळून खाल्ली कीं वाघदेव प्रसन्न होतो.

याशिवाय नागपंचमी, संकष्ट चतुर्थी, पितृबारस, अक्षय्य तृतीया असे इतर सण आहेतच. विशेषतः पितृबारस हा सण ठाणें जिल्ह्यांतील आदिवासींचा फार आवडता. भाद्रपद वद्य द्वादशीचे दिवशीं डहाणू तालुक्यांतील महालक्ष्मीची अतिशय मोठी यात्रा भरते. हें दैवत अतिशय जागृत म्हणून मानलें जातें. न चुकतां पांच-पंचवीस मैलांतील सर्व स्त्री-पुरुष तेथें जमतात. देवीसमोर रात्रंदिवस ही मंडळी आपलें नाचगाण्याचें कौशल्य दाखवितात. बाहेरील व्यापारी मीठ, मिरची, कांदे, कपडे वगैरे जिन्नस विक्रीस आणतात. रोखीनें अगर धान्याच्या बदलीं या जिनसा दिल्या जातात.

सणांचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे भरपूर ताडी किंवा दारू पिणें. आदिवासींना दारू पिण्याबद्दल एवढेंसें आकर्षण नाहीं पण ताडी मात्र बारशापासून वाराव्यापर्यन्त आणि दिवाळी अगर शिमगा कोणताहि सण असो त्या वेळीं पाहिजेच. दारूबंदीमुळें ताडी बंद झाली पण दारूचें प्रमाण मात्र फार वाढलें आहे.

आदिवासींना रंगीत आणि भडक कपडे यांचें व फुलांचाहि अतिशय वेड असतें. डोक्यावर फुलांचा भरगच्च गुच्छ असल्याशिवाय मुलींना नाच-गाणें तर काय पण जेवणाहि गोड लागत नाहीं. हीं फुलें कोणतीहि असलीं तरी चालतात. वासाचीं असलीं तर उत्तमच, नसल्यास रंगीबेरंगी बिन वासाचीं इतर फुलेंहि चालतात.

**विवाह-पद्धतिः**—मुलांमुलींचीं लग्नें दोघेंहि वयांत आल्याशिवाय होत नाहींत. लग्नसमयीं मुलीचें वय सतरा ते वीस आणि मुलाचें पंचविशीचें असतें. बालविवाहाची पद्धत शहरी वा नागरी जीवनाशीं संपर्क येणाऱ्या समाजांत कांहीं प्रमाणांत रूढ झाली होती. वरील कायद्यामुळें ती पद्धतहि आतां सहसा आढळत नाहीं. विवाहाचें वय जरी वर सांगितल्या-प्रमाणें असलें तरी सोयरीक जमवून ठेवण्याचें काम कांहीं ठिकाणीं अगो-दरहि केलें जातें. विवाहसमारंभाचा मुहूर्त नंतर सवडीनुसार ठरविला जातो.

आदिवासी जमातींत विवाहसमारंभ म्हणजे वरपक्षाच्या दृष्टीनें खर्चाची बाब. वर शिक्षित-अशिक्षित, गरीब-श्रीमंत अगर गुणवान् कसाहि असो, त्याला हुंडा मिळण्याचा प्रश्न उपस्थित होत नाहीं. उलट प्रत्येक वराकडून वधूचे बापास ' देज ' म्हणून कांहीं रक्कम किंवा धान्य देणें आवश्यक असतें. या देजेंत गाई, बैल, दागिने, कपडे इत्यादींपैकीं कांहींचाहि रोख रक्कम अगर धान्याबरोबर समावेश होतो. या खर्चाची जमवाजमव करण्याकरितां वरपक्षाला सावकार अगर जमीनदाराकडे कामहि करावें लागतें. कांहीं ठिकाणीं या बाबीनें पैसा जमा करणें शक्य नसतें. अशा ठिकाणीं आपल्या भावी सासऱ्याकडे दोन तीन वर्षे चाकरी करून त्याला ही रक्कम उभारावी लागते. याशिवाय इतर खर्च म्हणजे वधूकडील गांववाले व वधू-वरांच्या नातेवाइकांना जेवण व दारू किंवा ताडीची व्यवस्था करणें. या-बरोबरच मांडव, वाजंत्री, गांवचा पाटील इत्यादींना कांहींना कांहीं तरी

द्यावें लागतेंच. या खर्चाची व्यवस्था करायची तरी कुणी ? अविभक्त कुटुंब पद्धतीच्या अभावीं लग्नानंतर मुलगा आपला वेगळा संसार थाटतो. यामुळें लग्नाकरितां आवश्यक असणाऱ्या खर्चाची तरतूद मुलालाच करणें भाग पडतें. सावकाराकडून कर्ज काढायचें तर तारण म्हणजे दुसरें काय असणार ? या मुलानेंच सावकाराकडे कांहीं वर्ष मजुरीला राहिलें पाहिजे. तेव्हां देज व लग्नखर्चाची तरतूद मुलाला आपल्याच हिंमतीवर करावी लागत असल्यानें मुलगा कमाविता झाल्याशिवाय तो लग्न करूंच शकत नाहीं.

लग्न होऊन वधू घरांत येणें म्हणजे खऱ्या अर्थानें लक्ष्मी घरांत येणें मानतात. शेतमजुरी, जंगलांतून लाकडाच्या मोळ्या आणून विकणें, मध, करवंदें, जांभळें गोळा करणें, घरच्या शेतीकरितां राब करण्यास शेणपाला इ. गोळा करणें, गुरें चारणें अशीं एकना दोन कित्येक कामें मग तीं घरचीं अगर मजुरीचीं असोत, घरकाम सांभाळून ती करीत राहाते. प्रपंचास दोघांनीं हातभार लावायचा. अशा रीतीनें आर्थिक बाबींत ती आपला वांटा स्वतंत्रपणें उचलीत असल्यानें आदिवासी स्त्री प्रथमपासूनच आर्थिक दृष्टया स्वावलंबी आढळते. यामुळेंच लग्नाचा सर्व खर्च करण्यास वरपक्षास फारसें त्रासदायक वाटत नाहीं. आर्थिक दृष्टया स्वावलंबी असल्यानें साहजिकपणेंच समाजानें तिला आपला आयुष्याचा जोडीदार निवडण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य दिलें आहे.

आपला जोडीदार निवडण्याचें स्वातंत्र्य दोघांनाहि बहुसंख्य आदिवासी जमातींत, दिलेलें आढळतें. या स्वातंत्र्याचा कांहीं ठिकाणीं तरुणतरुणींनीं गैरफायदाहि घेतलेला आढळतो. बऱ्याचशा आदिवासी जमातींत मात्र तरुणतरुणींनीं लग्नसमारंभापूर्वीं एकमेकांच्या सहवासांत संसारी जोडप्याप्रमाणें सर्व प्रकारचे संबंध राखण्यास व एकमेकांची लग्नाचे जोडीदार म्हणून योग्यता आहे कीं नाहीं हें ठरविण्यास संपूर्ण मोकळीक आहे. अर्थातच या बाबतींत आपल्या देशांतील व इतर देशांतील आदिवासी जमातींत कांहीं संकेत मात्र पाळले जातात.

एखादी अविवाहित तरुणी गरोदर राहिल्यास त्या तरुणास तिच्या बरोबर लग्न करणें आणि तें सुद्धां तावडतोब भागच पडतें.

तरुणतरुणींचे संबंध अतिशय खेळीमेळीचे आणि मोकळेपणाचे

असतात. अर्थातच ही बाब त्या जमातींतील तरुण वर्गापुरतीच मर्यादित असते. इतर समाजांतील लोकांबरोबर संबंध आल्यास त्या ठिकाणीं आपणांस हें मोकळेपणाचें वातावरण आढळत नाहीं. लग्न जमविण्यांत नात्यागोत्याचीं बंधनेंहि कांहीं प्रमाणांत पाळलीं जातात. बहुसंख्य जमातींत लग्न ठरवितांना वधूवर आपल्याच जमातींतील असावेत यावर कटाक्ष असतो. बाहेरच्या जमाती किंवा समाज मग ते तुमच्या दृष्टीनें कितीहि पुढारलेले असोत, लग्न-बंधनानें त्यांच्याशीं संबंध घडवून आणणें आदिवासींना मान्य नाहीं.

समाजांतील वधूवरांची गांठ घालतांना कुळाचा विचार प्रामुख्यानें केला जातो. एकाच कुळांतील तरुणतरुणींचा संबंध नियमबाह्य कृत्य मानलें जातें. असें असूनहि कांहीं जमातींत काकापुतणी किंवा आतेभाऊ, मामेभाऊ, चुलतभाऊ, यांच्या संबंधांना प्रथम स्थान देण्यांत येतें. आपल्या संपत्तीची मालकी इतरत्र कोठें न जातां त्या त्या घराण्यांतच कायम राहावी, याकरितांच भिल्ल, वारली वगैरे जमातींत वडील भाऊ मेल्यास त्याच्या बायको-बरोबर लहान भावानें लग्न करण्यास अग्रहक्क समाजानें स्त्री-पुरुषांस दिला आहे. यामुळें संपत्ति अथवा इस्टेटीची धूळधाण होत नाहीं, पण त्याबरोबरच या विधवेस व तिच्या मुलांबाळांसाहि आपल्या कुटुंबांतच हक्कानें राहावयास मिळाल्यानें जगांत कोणी आपला साहाय्यकर्ता नाहीं असें मानावयास जागा राहात नाहीं. या बाबतींत वडील भावास मात्र लहान भावाच्या पत्नी-बरोबर लग्न लावतां येत नाहीं. कारण ही लहान भावजय त्यास आपल्या बापासमान मानते.

वडील मंडळीच्या मध्यस्थीनें लग्न जुळविणें हा सगळीकडे राजमार्ग समजला जातो. दोनचार मैलांच्या परिसरांतील जमातींतील मंडळी एकमेकांशीं चांगलीच परिचित असतात,तेव्हां पंधरा वीस मैलांच्या पलीकडे म्हणजेच लांब अंतरा-वरील गांवचे संबंध सहसा जोडले जात नाहींत. सोयरिकीबद्दल प्राथमिक बोलणीं होऊन संबंध ठरण्यासारखा असल्यास दोन्ही गांवची प्रमुख मंडळी व जव-ळचे नातेवाईक एकत्र बसून लग्नांतील देण्याघेण्याच्या बाबी किंवा अटी निश्चित करतात. या पद्धतींत वधूवर या दोघांची संमति तर या संबंधास असतेच पण सर्व वडील मंडळीचीहि संमति असल्यानें लग्नसंबंध जोडण्याचा हा प्रकार राजमान्य म्हणून सर्वत्र समजण्यांत येतो. या संबंधांत वरपक्षास सर्व खर्च करावा लागतो.

## घरजांवई किंवा घरोर

घरजांवई पद्धतीनें तरुणतरुणींचे विवाह करण्याची प्रथा दोन तऱ्हेनें रूढ झाली आहे. कांहीं जमातींत लग्नसमारंभाचा खर्च पुष्कळांना झेपण्या-ज्यासारखा नसतो. कांहीं समाजांतील व्यक्तींची सांपत्तिक स्थिति चांगली असते, परंतु घरांत कर्तासवरता मुलगा नसतो. मजुरीचा मनुष्य चांगलें काम करीत नाहीं. अशा वेळीं आपली जायदाद मुलगा नसल्यानें कुणातरी तिसऱ्या व्यक्तीकडे जाऊं नये अशी इच्छा असते. अगर आपला मुलगा फारच लहान असल्यानें तो मोठा होईपर्यंत व नंतरहि कुणीतरी विश्वासांतला मनुष्य असल्यास त्याला जवळ केल्यावर आपणांस समाधानानें देह ठेवतां येईल अशा विचारानेंहि कांहीं लोक घरजांवई शोधतात. आपल्या मुलीकरितां एखादा गरीब आणि होतकरू मुलाची तो निवड करतो. लग्नखर्चाची तरतूद करणें या मुलास शक्य नसल्यानें तोहि घरजांवई म्हणून राहण्यास तयार होतो. अशा मुलाची निवड केल्यावर त्या मुलास आपल्या सासुर-वाडीसच राहून घरांतील व शेतीचीं सर्व कामें करावीं लागतात. तेथें काम करतांना त्याला आपले भावी सासूसासरे, बायको व इतर नातेवाईकांची मर्जी सांभाळावी लागते. त्याचा स्वभाव चांगला आहे, कामहि तो प्रामाणिक-पणें करतो व आपणांस तो नंतरहि सोडून जाणार नाहीं, याबद्दल सासरच्या मंडळींची खात्री पटल्यास दोनचार महिन्यांनंतर त्याला आपल्या भावी पत्नीबरोबर पतीच्या नात्यानें वागण्याचा अधिकार सासूसासऱ्याकडून व वधूकडून मिळतो. कांहीं जमातींत या घरजांवयास पहिल्या दिवसापासूनच आपल्या मुलीबरोबर नवरेपणानें राहण्याचे अधिकार दिले जातात. या पद्ध-तींत नियोजित वर आपल्या आई-बापांपासून कायमचा दूर होत असल्यानें त्या वराच्या आईवडिलांस कांहीं आर्थिक भरपाई मिळणें आवश्यक मानलें जातें. ही भरपाई कांहीं धान्य अगर रोख रकमेच्या स्वरूपांत वधूचा बाप देतो. लग्नसमारंभ अगदीं साध्या पद्धतीनें वधूच्या वडलांच्या खर्चानें एक दोन वर्षा-नंतर सवडीनें केला जातो. मात्र त्यापूर्वीच या प्रेमसंबंधाची फलनिष्पत्ति झाल्यास लग्नसमारंभ ताबडतोब आटोपावा लागतो. कांहीं महिन्यांच्या संबंधा-नंतर विशेषतः मुलीला मुलगा पसंत न पडल्यास त्यानें केलेल्या कामाचा मोबदला देऊन त्याला आपल्या आईवडिलांकडे परत पाठवितात. कांहीं वेळां हे नियोजित वधूवर लग्नापूर्वी किंवा लग्न झाल्यावर वधूपित्यास सोडून

जातात. अशा वेळीं वृद्धपणीं त्याचे व कुटुंबियांचे हाल होतात. हें टाळण्या-करितां समाजानें घरजांवयावर कांहीं निर्बंध लादले आहेत. त्यानें शक्य तों आपल्या सासुसासऱ्यांस सोडून जाऊं नये. तो आपल्या बायकोस घेऊन त्यांना सोडून गेलाच तर त्यानें सासऱ्यास कांहीं आर्थिक भरपाई करणें त्याला भाग पडतें.

**'उधडी' बायको आणण्याची पद्धत**—पुष्कळ वेळां आर्थिक अडचणी तर भासतात व त्यामुळें लग्नाचा खर्च करणें तर शक्य होत नाहीं. शिवाय घरजांवई म्हणून गेल्यास आपल्या आईवडिलांना कायमचें सोडून जावें लागतें. याबरोबरच घरजांवई म्हणून गेल्यास बायकोचा वरचष्मा सतत राहाणार. याकरितां समाजानें अगदीं साधी सोपी व जवळजवळ बिनखर्चाची अशी खालील पद्धत रूढ केली आहे. असा तरुण, पंचासमक्ष मुलीच्या वडिलास दोन चार रुपयांची रोख रक्कम व दोन चार पायली धान्य देज म्हणून देतो. पांच दहा लोकांना या समारंभाचे साक्षी म्हणून जेवण व ताडी-दारूहि दिली जाते. यानंतर लग्नाकरितां कोणताहि खर्च न करतां व प्रत्यक्ष विवाह-समारंभ न करतांहि समाज त्या जोडप्यास नवरा बायकोच्या नात्यानें वैवाहिक जीवन जगण्यास परवानगी देतो. इतर विवाहित जोडप्या-प्रमाणेंच त्यांना समाजांत स्थान मिळतें. अशा पद्धतीनें आणलेली वधू 'उधडी' किंवा 'कोरडी' आणली म्हणून म्हटलें जातें. बहुधा समाजाचे व नातेवाईकांचे हात ओले न केल्यामुळें हें नांव पडलें असावें. अशा जोडप्यावर एकच बंधन समाजानें लादलें आहे. त्यांच्या मुलामुलींचीं लग्नें करण्यापूर्वी या जोडप्यानें आपला स्वतःचा लग्नसमारंभ उरकणें आवश्यक असतें. त्यामुळें आपल्या संसारास सुरुवात केल्यानंतर हें जोडपें थोडीफार शिल्लक टाकून आपल्या लग्नाकरितां बेगमी करते व शक्य तेवढें लवकर पण सवडीनें आपला लग्नसमारंभ उरकून घेतें.

या लग्नसमारंभांत पुष्कळ वेळां त्यांच्या मुलांस भाग घेण्यास संधि मिळते, कारण विवाहसमारंभाकारितां पैशाची बेगमी होईपर्यंत दहापंधरा वर्षांचा काळ सहज जातो. या जोडप्यापासून झालेलीं मुलें वयांत येण्या-पूर्वींच त्यांचा बाप मेल्यास मुलांच्या लग्नाची अडचण येत नाहीं. अशा वेळीं या मुलांची आई इतर विधवांसारखी गणली जाते. आई वारल्यास

मुलांचें लग्न करण्यापूर्वी बापास आपलें स्वतःचें लग्न रुईच्या झुडपाबरोबर शास्त्रोक्त पद्धतीनें लावावें लागतें. अशा रीतीनें त्याचें लग्न झाल्यानंतर त्याचीं मुलें लग्नाच्या बायकोपासून झालेल्या औरस संततीसारखीं गणलीं जातात. प्रथमवरास विधवा स्त्री 'कोरडी' किंवा 'उघडी' म्हणून आणतां येते. विधुरास मात्र 'कोरडी' किंवा 'उघडी' पद्धतीनें अविवाहित तरुणीबरोबर लग्न करतां येत नाहीं. समाजानें तो हक्क प्रथम वराकरितां राखून ठेवलेला दिसतो. बहुसंख्य ठिकाणीं वधूवर हे दोघेहि प्रथमवरच असतात.

**राक्षस विवाहः**—तरुणांनीं आपल्या वधूस पळवून नेऊन तिच्याबरोबर लग्न लावावयाची पद्धत पूर्वापार रूढ आहे. या पद्धतीनें लग्न झाल्यास त्या कुटुंबांना समाजांत जास्त मानमान्यता मिळते. पूर्वी पुष्कळदां आपल्या शत्रुपक्षांतील तरुणीच पळवून आणीत असत. सध्यां जमाना बदलला आहे. वधूवर आणि दोघांची वडील मंडळी यांच्या सल्ल्यानें विवाह ठरला असला तरी रूढी म्हणून ही पद्धत पाळली जाते. मुलीला कोणत्या वेळीं कोणत्या दिवशीं, कोठून व कसें पळवून न्यावयाचें हें सासरेबुवाच आपल्या जांवयास समजावून सांगतात. त्याप्रमाणें जांवईबुवांनीं त्या तरुणीस पळवून न्यावयाचें. त्या वेळीं इतर नातेवाईकांनीं व वधूनें सुद्धां थोडाफार विरोध करावयाचा. पण सर्व काम कसें तर 'अग अग म्हशी अन् मला कुठें नेशी' यासारखें. अशा रीतीनें एखाद्या तरुणीस पळवून नेलें म्हणजे त्यांच्या विवाहास जमातीनें परवानगी द्यावयाची असते. आपल्या समाजांतील राक्षस विवाहाप्रमाणेंच या विवाहाचें स्वरूप आहे.

**गांधर्व विवाह**—वधूवरांनीं एकमेकांची निवड केल्यावर कांहीं वेळां वडील मंडळींचा या लग्नास वेगवेगळ्या कारणामुळें विरोध असतो. विरोधाचीं कारणें खालीलपैकीं एक किंवा अनेक असूं शकतील; उदा. पिढ्यानुपिढ्या दोन घराण्यांत चालत आलेलें वैर, ठराविक गांवांचें पूर्वापार वैर, पूर्वीच्या कांहीं संबंधामुळें निर्माण झालेले गैरसमज, देजेच्या अटी न जमणें इ., अशा वेळीं दोघांनाहि मनापासून लग्न तर करायचें आहे तेव्हां कांहीं मार्ग तर काढलाच पाहिजे. तेव्हां हें जोडपें गांव सोडून कोठेंतरी लांबच्या गांवीं पळ काढतात. दोन तीन महिन्यांचा काळ बाहेरच एकत्र काढतात. परत गांवीं आल्यावर वडील मंडळीस आपला विरोध बाजूस

साहून त्यांच्या लग्नास संमति द्यावी लागतेच. त्यांना नवराबायको म्हणून राहण्यास समाज परवानगी देतो. लग्नसमारंभ सावकाशीनें व सवडीनें नंतर केव्हांहि केला किंवा अजिबात न केला तरी हरकत नाहीं.

जी तरुणी प्रियकराबरोबर बाहेरगांवीं पळून जाण्यास तयार होत नाहीं, अशा वेळीं हा तरुण संधि साधून दोनचार लोकांसमक्ष त्या मुलीच्या कपाळावर बळजबरीनें कुंकुमतिलक लावतो. अशा रीतीनें चार चौघांसमक्ष एखाद्या तरुणानें तरुणीच्या कपाळावर कुंकू लावणें हें त्यांचा विवाह ठरल्याचें द्योतक मानलें जातें. अशा रीतीनें कुंकू लावण्याचें काम झाल्याबरोबर तो तरुण जवळपासच्या गांवीं आपल्या नातेवाईकांकडे निघून जातो. वडील मंडळींनीं वाटाघाटी करून हें लग्न नक्की केल्याशिवाय तो घरीं परत येतच नाहीं. वडील मंडळींची इच्छा असो वा नसो त्यांनीं हें लग्न जुळविलेंच पाहिजे असें सामाजिक बंधन त्यांच्यावर येतें.

**घरघुशी नवरी**—या पद्धतींत मुलाऐवजीं मुलगी लग्न जमविण्यांत पुढाकार घेते. तरुणतरुणींचें सूत अगोदरच जमलेलें असतें. परंतु वडील मंडळींचा विरोध असल्यानें मुलगा तयार होत नाहीं, परंतु त्या तरुणीला तर त्याच्याशिवाय इतर कुणाबरोबरहि लग्न करावयाचें नसतें. धीट तरुणी अशा वेळीं संधि साधून त्या तरुणाच्या घरांत ठाण मांडते. त्या तरुणाच्या आईवडिलांनीं समजूत घालून अगर मारपीट करूनहि किंवा बळजबरीनें उचलून घराबाहेर घालविण्याचा प्रयत्न करूनहि ती घरांतून हालत नाहीं. या आरडाओरडयामुळें जवळपासची मंडळी त्या तरुणाच्या घराजवळ जमते व सगळया गांवभर ही बातमी समजते. त्या तरुणीच्या चिकाटीला फळ येतें. कारण, अशा रीतीनें एखाद्याच्या घरांत घुसणें व त्यानें प्रयत्न करूनहि तरुणीनें ती जागा न सोडणें याचा अर्थ समाज ताबडतोब उमगतो व त्या तरुणीचा विवाह त्या तरुणाबरोबरच ठरला असें मानलें जातें.

**पुनर्विवाह**—दुसऱ्यांदा तरुण अगर तरुणी या दोघांनाहि लग्नाच्या बंधनानें आयुष्य सजविण्यास म्हणजे पुनर्विवाह करण्यास मोकळीक आहे. परंतु पुनर्विवाह करतांनाहि कांहीं बाबींकडे विशेष लक्ष दिलें जातें. नवरा प्रथम वर असून वधूचा पहिला नवरा मेला असल्यास अगर तिनें त्यापासून घटस्फोट घेतला असल्यास होणाऱ्या विवाहास पुनर्विवाह ही संज्ञा दिली जाते.

पुनर्विवाह करतांना शक्य तो स्त्रीला त्याच कुटुंबांत अगर आप्तेष्टांत समाविष्ट करावें अशी सर्वांची इच्छा असतें. त्यामुळें नवरा मेल्यावर त्या विधवेनें नवऱ्याच्या लहान भावांपैकीं कुणा एकाबरोबर लग्न करावें अशी प्रथा आढळते. लहान भावांपैकीं कोणाबरोबर लग्न करावें किंवा दुसऱ्या कुणाबरोबर आपला विवाह जमवावा, याबाबतींत तिला पूर्ण स्वातंत्र्य असतें. लहान दिरांपैकीं ज्याच्याबरोबर तिला विवाह करावयाची इच्छा असेल त्याची पहिली बायको हयात असली तरी अडचण येत नाहीं. एखाद्या प्रथमवरार्चाच तिनें त्या तरुणाच्या संमतीनें निवड केल्यास त्याला प्रथम रुईच्या झाडाबरोबर लग्न करावें लागतें. या रुईच्या झाडाची हळदी-कुंकवानें पूजा करून फांद्यांना कापडाच्या पट्ट्या गुंडाळतात व त्या झुडपासच तरुणी समजून त्याबरोबर यथाविधि लग्नसोहळा पार पडतो. लग्नानंतर तें झुडूप कापतात व त्यामुळें ही नववधू मेली असें समजण्यांत येतें. याचाच अर्थ त्या तरुणाची पहिली बायको मरण पावली व तोसुद्धां बिजवर अथवा विधुर झाला. यामुळें या तरुण-तरुणींचा दर्जा लग्नाच्या दृष्टीनें सारखा झाला. रुईशीं लग्न केल्यामुळें ज्या विधवेबरोबर तो लग्न करणार असेल तिच्या नवऱ्याचीहि शांति-तृप्ति होऊन तो या नवीन जोडप्यास त्रास देत नाहीं.

**पाट लावणें**—वधूवर दोघेंहि घटस्फोटाचे असतील अगर दोघांचाहि पूर्वीचा जोडीदार मयत झाला असेल तर या नवीन होऊं घातलेल्या संबंधास ‘ पाट लावणें ’ असें संबोधलें जातें. स्त्री-पुरुष दोघेंहि श्रमजीवी आणि स्वतःच्या कमाईवर जगण्यास समर्थ असल्यानें किरकोळ कारणावरूनहि मतभेद झाल्यास त्याचें पर्यवसान घटस्फोटांत होतें. व्यक्तिस्वातंत्र्यावर सामाजिक बंधनें कमी असल्यानें प्रत्येकास संपूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य उपभोगतां येतें. मालकीची जमीन अगर इतर स्थावर मिळकती नसल्यानें बहुसंख्य लोकांना त्या आकर्षणावर आपलें पुढील आयुष्य जगतां येत नाहीं. संशयवृत्तीचा अभाव व उद्यांच्या जीवनाबद्दल जास्त फिकीर न करण्याची वृत्ति यांमुळें आयुष्याच्या अगदीं उत्तर भागांत देखील विवाह करण्यास सहसा कोणी माघार घेत नाहीं. बऱ्याच वेळां पुत्रसंततीकरितां हा मार्ग पत्करावा लागतो. मुलगा नसणारा मनुष्य स्वर्गांत जाऊं शकत नाहीं अशी भावना असल्यानें पुत्रप्राप्तीकरितां पुन्हां पुन्हां लग्नास तयार होणारे पुष्कळ आढळतात. पुन्हां लग्नास तयार होण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण आहे.

आदिवासी जमातींत अविभक्त कुटुंबपद्धतीचा अभाव असल्यानें लग्न झाल्याबरोबर जो तो आपलें नवीन घर तयार करून नवराबायकोचें नवीन राज्य सुरू करतो. यामुळें म्हातारपणीं जवळ बसून दिलासा देण्याकरितां मुलांचा अगर सुना-नातवांचा विशेष उपयोग होत नाहीं.

पाटाच्या बायकांना लग्नकार्य अगर देवधर्माचे विधी यांत सुवासिनींचें स्थान प्राप्त होत नाहीं. पाटाचें लग्न प्रथम लग्नासारखें पवित्रहि मानलें जात नाहीं. म्हणूनच कीं काय, पाटाच्या लग्नाचा मुहूर्त नेहमींच वद्य पक्षांत व रात्रीच्या वेळींच ठेवला जातो. या कार्याचा बोलबालाहि विशेष केला जात नाहीं. सुवासिनी तर या लग्नास हजर राहणें ही इष्ट गोष्ट मानीत नाहींत. वाजंत्री, रंग उडविणें, घराची सजावट, आप्तेष्टांना निमंत्रण इत्यादि बाबींना फांटा दिला जातो. पुरुषवर्ग पन्नास वर्षे वयापर्यंत व स्त्री चाळीस ते पंचेचाळीस वर्षे वयापर्यंत असली तरी नवीन लग्नबंधनांत पडण्यांत स्वतःस योग्य समजतात. पहिल्या नवऱ्यापासून झालेलीं मुलें मोठीं असल्यास तीं आपला संसार थाटण्यास व आपल्या पायावर उभीं राहण्यास समर्थ असल्यानें आईबरोबर तीं तिच्या नवीन नवऱ्याकडे जात नाहींत. मुलें लहान असल्यास त्यांना सांभाळण्याची जबाबदारी या नवीन पित्यावर येऊन पडते.

वर वर्णिलेल्या वेगवेगळया विवाह जमविण्याच्या पद्धतीच्या अभ्यासावरून प्रामुख्यानें कांहीं बाबी आपल्या लक्षांत येतील.प्रामाणिकपणा,व्यक्तिस्वातंत्र्य, स्त्री-स्वातंत्र्य यांना आदिवासी समाजांत आतिशय प्राधान्य दिलें जातें. स्त्री-पुरुषांना एकमेकांत मोकळेपणानें मिसळण्यास व बऱ्याच जमातींत विवाहपूर्व लैंगिक संबंध ठेवण्यांत पावित्र्याची हानि होते असें मानलें जात नाहीं. मात्र त्या पुरुषापासून गर्भधारणा झाल्यास त्या पुरुषास त्या विशिष्ट तरुणाबरोबर लग्न करण्याची जबाबदारी उचलावीच लागते. अशा वेळीं ही जबाबदारी टाळण्याचा प्रयत्न सहसा कोणताहि तरुण करीत नाहीं. यामुळेंच असे संबंध ठेवण्यास कोणत्याहि तरुणीस भीतिहि वाटत नाहीं अगर आपण कांहीं जगावेगळें कृत्य करतों असेंहि वाटत नाहीं.

एकदां विवाहसमारंभ पार पडल्यानंतर इतर कोणत्याहि स्त्री अगर पुरुषाबरोबर संबंध ठेवणें नीतिबाह्य मानलें जातें. एखाद्या पुरुषानें कोणा

विवाहित स्त्रीबरोबर अनैतिक संबंध ठेवल्याचें आढळल्यास तो त्या स्त्रीच्या पतीच्याच नव्हे तर इतर समाजाच्या दृष्टीनें गुन्हेगार मानला जातो. असा संबंध उघडकीस आल्यास त्या स्त्रीचा लग्नाचा नवरा त्या स्त्रीस तिच्या प्रियकराच्या स्वाधीन करून त्याच्याकडून आपला लग्नखर्च पुरेपूर वसूल करतो. यानंतर दुसऱ्या एखाद्या तरुणीशीं लग्न करण्यास त्याला मोकळीक मिळते. अशा रीतीनें संबंध ठेवणारा तरुण त्या विवाहित तरुणीबरोबर लग्न करावयास तयार नसल्यास समाज त्याला अतिशय कडक शासन करतो. विवाहानंतरचें आयुष्य पवित्र समजलें जातें. त्यामुळें अशा प्रकारचा संबंध समाज नीतिबाह्य मानतो. त्या स्त्रीशीं लग्न करावयास तयारी नसल्यास तिच्या नवऱ्यास नुकसानभरपाई म्हणून दंडाची कांहीं रक्कम व समाजास जेवण आणि ताडी देऊन व त्या स्त्रीच्या वाटेस पुन्हां कधींहि जाणार नाहीं असें आश्वासन देऊन, त्याला ही कटकट मिटवितां येते. हें न केल्यास त्याच्या घरादाराची राखरांगोळी करून त्याला ठार मारण्यापर्यंतहि समाजाची मजल जाऊं शकते.

जमातींतील पुरुषाव्यतिरिक्त इतर पुरुषांशीं अनैतिक संबंध ठेवणें अतिशय निंद्य समजलें जातें. अशा स्त्री-पुरुषास समाज अतिशय कठोर शिक्षा देतो.

द्विभार्या—प्रतिबंधक कायद्यामुळें एकापेक्षां जास्त बायका करण्यावर आतां बंधन घालण्यांत आलें आहे. तत्पूर्वी बहुसंख्य आदिवासी जमाती एकपत्नीव्रताची प्रथा ( ती पत्नी हयात असेपर्यंत किंवा घटस्फोट घेईपर्यंत ) रूढ होती.

## जादूटोणा

जादू शिकणें हें काम इतर शिक्षणासारखें साधें सरळ किंवा सोपें नाहीं. त्याकरितां अतिशय कष्ट करावे लागतात. मनाचा खंबीरपणा आवश्यक असतो. या शिक्षणाचे वर्ग पावसाळ्याच्या सुरुवातीस सुरू होऊन दिवाळीपर्यंत चालतात. कांहीं ठिकाणीं दरवर्षी आश्विन महिन्यांत साधारण तीन आठवड्यांचे शिक्षणवर्ग नियमितपणें चालतात. पावसाळाभर चालणाऱ्या शिक्षणक्रमास दोन किंवा तीनच शिष्य घेतले जातात, कारण त्या ठिकाणीं विद्यादानाकरितां एकच गुरु असतो. दोन तीन आठवड्यांच्या

शिक्षणक्रमास एकापेक्षां जास्त मांत्रिक येत असल्यानें शिष्यवर्गाची संख्याहि वीस पंचवीसपर्यंत जाऊं शकते. दरवर्षीच्या पावसाळीं अभ्यासक्रमास दोन तीन वर्षें घालवून व गुरुचरणांजवळ नंतर कांहीं काळ काढून ही विद्या आत्मसात् करतां येते. मंत्रतंत्राबरोबरच औषधी वनस्पति, त्यांचे गुणधर्म व इतर वैद्यक विषयांचें शिक्षणाहि या तज्ज्ञ मांत्रिक किंवा भगत-मंडळीकडून मिळतें. शिकण्याच्या काळांत व नंतरच्या आयुष्यांतहि मांत्रिकाला बरींच पथ्यें पाळावीं लागतात. अभ्यासक्रम चालू असतांना दारूताडीला स्पर्शहि करतां येत नाहीं. मांस, मच्छी, मटण खायचें नसतें. स्त्री-समागमासहि बंदी असते. शिक्षणक्रमाचा काळ पावसाळ्याचा. त्यामुळें या दिवसांत मुबलक मिळणारा व सर्वांना आवडणारा भाजीपाला, चवळी, मके, नारळ इ० वस्तु त्यांनीं आपल्या जेवणांत वर्ज्य कराव्या लागतात. जेवतांना बायकांचा किंवा त्यांच्या बांगड्यांचा आवाज कानावर पडायला नको. याकरितां प्रत्येकानें आपलें जेवण घरीं न घेतां शिक्षणक्रम चालू असेल अशा जागीं घेतात. शिक्षणाची जागा वस्तीपासून बाजूस जेथें कोणी सहसा येणार नाहीं, जवळपास पाण्याची सोय असणारी म्हणजेच नदी किंवा नाल्याच्या कांठीं निवडतात. शिक्षणक्रम फक्त रात्रीच्याच वेळीं चालत असल्यानें दिवसां घरकामास मनुष्य मोकळाच असतो.

विद्या शिकण्यास सुरुवात करण्यापूर्वी कोंबड्याचा बळी देण्याची पद्धत आढळते. हा कोंबडा प्रसाद म्हणून गुरुशिष्यांनीं सुरुवातीस खायचा असतो. वेगवेगळ्या प्रकारचे मंत्र गुरु आपल्या शिष्यांस येथें शिकवितो. मंत्र म्हणण्याची विशिष्ट पद्धत असते. त्या वेळीं ठराविक प्रकारचे अंगविक्षेप कसे करायचे, अंगांत वारें कसें घ्यायचें, करणी कशी करायची, मूठ कशी मारायची, मारलेली मूठ कशी परत करायची, वेगवेगळ्या रोगांचीं लक्षणें कोणतीं, त्यांवर उतारा पाडणारीं कोणतीं औषधें द्यावयाचीं, वेगवेगळ्या वनस्पतींचा उपयोग कसा करावयाचा इ. सर्वच बाबींचें शिक्षण येथें दिलें जातें. ज्याला अथपासून इतिपर्यंतचें समग्र शिक्षण घ्यावयाचें असेल, त्याला आपल्या आयुष्याचीं चार सहा वर्षें तरी याच कामाकरितां गुरु-सहवासांत काढावीं लागतात.

स्त्रियासुद्धां जादूविद्या शिकतात. परंतु बहुसंख्य ठिकाणीं असें आढळतें कीं, त्या आपल्या विद्येचा उपयोग सत्कर्मीं म्हणजे लोकांची

रोगराई व दुःख निवारण्यास न वापरतां, वाईट कामाकरितां वापरतात. त्यामुळें समाजाला त्यांच्यापासून फायदा न होतां तोटाच होतो.

पुरुष मांत्रिक सर्व लोकांच्या ओळखीचा असतो. तो आपल्या विद्येबाबत गुप्तता पाळीत नाहीं. स्त्री-मांत्रिकांना मात्र आपल्या विद्येबाबत कमालीची गुप्तता पाळावी लागते. याचें कारण स्त्रिया आपली विद्या सहसा चांगल्या कामाकरितां वापरीत नसल्याचा सर्वत्र अनुभव असतो. यामुळें स्त्री-मांत्रिक चेटकीण, भुताळी, हडळ, चुडेल इ. सारख्या भयंकर नांवानें ओळखली जाते. औषधोपचार करणारी स्त्री भगतीण या नांवानें ओळखली जाते. बहुसंख्य लोकांना तिला ही विद्या येते याबद्दल माहिती नसते.

एखादी स्त्री चेटकीण आहे हें उघडकीस आल्यास सर्व लोक तिच्यापासून चार पावलें दूर राहतात. तिच्याशीं लग्न करायला सहजासहजीं कोणी तयार होत नाहीं. अर्थातच ही बाब गुप्त असेपर्यन्त तिचें लग्न होण्यास कोणताहि अडथळा येत नाहीं. तिचें लग्न झाल्यावर तिला जादू—विद्या अवगत असल्याचें समजून आल्यास तिच्या मुलामुलींचीं लग्नें जमणें अवघड पडतें.

पुरुष मांत्रिकाप्रमाणें चेटकिणी सहसा एकटीच्या भरंवशावर काम करीत नाहीं. गांवांतल्या गांवांत अगर जवळपासच्या चार सहा गांवांमिळून एक संघटना असते. या संघटनेची गुप्तता प्रशंसनीय असते. आपली संघटना उजेडांत येऊं नये या दृष्टीनें उमेदवार निवडतांना अतिशय काळजी घेतली जाते.

भगत अथवा मांत्रिक गुरुदक्षिणा म्हणून सर्वसाधारणपणें एखादी दुसरी कोंबडी, कांहीं अंडीं व दारू किंवा ताडीवर समाधान मानतो. कोंबडीऐवजीं डुक्करहि चालूं शकतो. हडळी मात्र नरबळीशिवाय इतर हलकासलका बळी स्वीकारायला तयार नसतात. हडळींना आपली संघटना वाढविण्यांत भूषण वाटत असल्यानें नवीन उमेदवारांकडून घरांतील माणसांचा बळी न मागतां या उमेदवाराचा कोणी शत्रुपक्षीय असल्यास त्याचा बळी घेतला जातो. नवीन उमेदवारांस शिक्षण देण्याकरितां कांहीं ठिकाणीं स्मशानाची जागा पसंत करतात. नुकत्याच पुरलेल्या मुडद्याचें शिर कापून त्याद्वारें हें शिक्षण दिलें जातें.

गुरुखेरीज अतृप्त आत्मेहि जादुविद्या शिकवितात. या आत्म्याला प्रसन्न करण्यासाठीं कोंबडीचा बळी अगर त्यानें मागितलेल्या वस्तु देण्यांत येतात. गरोदर बाई मेल्यावर हडळ होऊन आपल्या जन्मास न आलेल्या मुलाच्या काळजीनें घरांतील लोकांना व शेजाऱ्यापाजाऱ्यांस उपद्रव देऊं नये म्हणून स्मशानांत नेण्यापूर्वी तिच्या बाळाकरितां लहान लहान खेळणीं व पाळणा तिचे तिरडीवर ठेवतात. शिवाय हातापायांच्या तळव्यास बिब्वा (भिलावा) भरून दहा वीस सुयाहि तेथें टोंचतात. यामुळें तिला पायानें वा हातानेंहि चालत येणें अशक्य करून टाकतात. कांहीं ठिकाणीं या बाईचें पोट फाडून आंतील मूल बाहेर काढतात व नंतरच तिला पुरतात अगर जाळतात. यामुळें तिचा आत्मा असंतुष्ट राहात नाहीं व इतरांना तिचा त्रास होत नाहीं.

करणी करण्याचें काम हडळीच जास्त करतात. मूल होत नसणाऱ्या बायकाहि आपणांस मूल व्हावें म्हणून अघोरी मार्गाचा उपयोग भूताळीतर्फे करतात. याकरितां इतरांच्या मुलाचा बळी देण्यास त्या मागें पुढें पाहात नाहींत.

एखाद्यास मारावयाचें असल्यास भुताळी आपल्या गुरूची पूजा करून अंधाऱ्या रात्रीं जवळच्या जगलांत जाते. तेथील ठराविक वारुळाभोंवतीं ती विवस्त्र होऊन सात फेऱ्या घालते. या वेळीं नग्नावस्थेंत असतांना ती कुणाचे नजरेस पडल्यास ती व्यक्ति आंधळी बनते. फेऱ्या मारतांना ती ठराविक मंत्रांचा जप करते. नंतर ती गांवांत परत येते. एक मंतरलेली गवताची काडी ज्याचा बळी घ्यावयाचा असेल त्याच्या नकळत तो झोंपला असतांना त्याच्या छातीवर थोडा वेळ ठेवते व ती काडी घेऊन ती तावडतोब परत फिरते. घरीं परत आल्यावर ती आपल्या मंत्राची सफलता पडताळून पाहते. एका भांडयांत दूध घेऊन त्यांत ती काडी बुडविते. दुधाचा रंग रक्तासारखा तांबडा लाल झाल्यास तिचा मंत्र सफळ झाला व तो मनुष्य तावडतोब मरणार याची तिला खात्री होते. मंत्र असफळ झाल्यास तो मनुष्य न मरतां उलट त्याचें दैव त्याला हात देतें व तो श्रीमंत बनतो. हडळीना नरमांस खूप आवडतें. साहजिकपणेंच कोणी मनुष्य मेल्यास स्मशानांतील त्याचें प्रेत काढून ती त्यांतील काळीज खाते व शिराचा उपयोग नवीन शिष्यांना मंत्रविद्येची दीक्षा देण्यास करते.

जादूटोणा करतांना कांहीं खाद्यपदार्थ मंत्रून व कांहीं वेळां ठराविक भुतांखेतांना जागवून मांत्रिक आपलें काम साधतो.

जादूटोणा जाणणाऱ्या मांत्रिकाला समाजांत एक विशिष्ट स्थान असतें. त्याच्या विद्येमुळें व वैद्यकी ज्ञानामुळें समाजाच्या उपयोगी पडण्याचे प्रसंग त्याला वारंवार येतात. आपल्या अनुभवामुळें तो अनेकांच्या व्याधी दूर करतो. गांवकऱ्यांवर वारंवार कांहीं संकटें यायला लागलीं, जंगली जनावरांचा त्रास वाढला, गांवांत रोगराई झाली, कांहीं सार्वजनिक कार्य हातीं घ्यावयाचें असलें तर अशा सर्व प्रसंगीं त्याचा विचार प्रथम घेतला जातो. मांत्रिक आपली विद्या शक्यतों वाईट कामाकरितां वापरणार नाहीं अशी गांवकऱ्यांची श्रद्धा असते. आपली विद्या फक्त लोकांचें दु:ख दूर करण्याकरितांच वापरीन अशी त्याला आपल्या गुरूजवळ विद्या शिकण्यास सुरुवात करण्याच्या वेळींच शपथ घ्यावी लागते. इतकेंच नव्हे तर आपल्या या कामाबद्दल आर्थिक मोबदला त्यानें स्वत: होऊन अगर अडवून घ्यायचा नसतो. असा मोबदला स्वीकारल्यास हळूहळू त्याचें मंत्रविद्येचें सामर्थ्य कमी होत जाऊन त्या विद्येचा प्रभाव पडेनासा होतो.

आपण केलेल्या कामाबद्दल व खर्च केलेल्या वेळेबद्दल वाटल्यास त्याला यजमानानें भरपूर खायला प्यायला द्यावें. कोंबडी बकरी त्याच्या करितां मारावी व यथेच्छ दारू किंवा ताडी या भगतास पाजावी. कोणी केव्हांहि बोलावण्यास येवो, मग ती रात्र असो वा दिवस असो. त्यानें हातचें काम तसेंच बाजूस सारून बोलावण्यास आलेल्या माणसाबरोबर निघावयाचें असतें. इतकेंच काय तर जेवत असतांना अशी बातमी घेऊन कुणी आल्यास त्यानें आपल्या हातांतला घास परत ताटांत टाकून निघणें जरूर असतें. तसें न झाल्यास त्याची विद्या कमकुवत बनते.

जागेवर बसूनहि मांत्रिक रोग्यांचें दु:ख दूर करूं शकतो. रोग्या-वरून उतरवून आणलेले तांदूळ, ताडाचें पान, सुपारी इत्यादींच्या साहाय्यानें तो चार मैलांवर बसूनहि रोगनिदान करूं शकतो. अर्थात् अशा बाबींवर आपण विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं. परंतु रोगाबद्दलच्या खाणाखुणा व रोग्याच्या घरच्या मंडळींकडून मिळालेल्या माहितीवरून या बाबींचा अंदाज करणें कांहींच कठीण नाहीं. बहुसंख्य ठिकाणीं या मांत्रिक वैद्यांनीं दिलेल्या

औषधी वनस्पतींची पाहणी केल्यावर या विषयांतील तज्ज्ञ मंडळीं-नाहि असें कबूल करावें लागतें कीं, आदिवासी भागांतील वैद्यकशास्त्र कांहीं बाबतींत अतिशयच प्रगत आहे.

अशा रीतीनें आदिवासी जीवनाचा एक महत्त्वाचा घटक असलेल्या मांत्रिकाबद्दल व त्याच्या जादू विद्येबद्दल आपणांस भीति वाटण्याचें कारण उरत नाहीं. उलट त्याच्या या शास्त्राची व तो वापरीत असलेल्या औषधी वनस्पतींची शास्त्रीय दृष्टया चिकित्सा करून त्यांतील चांगल्या व आपणांस उपयुक्त बाबी कोणत्या घेतां येतील याबद्दल आपणांपैकीं कांहींनीं पुढाकार घेऊन हे विषय अभ्यासल्यास केवढें तरी काम होईल.

☆ ☆ ☆

# सोनकोळी समाज

[ मुंबई आणि कोंकण यांतील सोनकोळी समाज मच्छीमारी व्यवसायाचा आहे. थळकर, गांवकर, ख्रिस्ती आणि नवहिंदु असे यांचे चार मुख्य वर्ग पडतात. थळकर आणि गांवकर यांच्यात रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार नाहीं. बाकीचे दोन वर्ग तर बाह्यच समजले जातात. बायका पुरुषांपेक्षां ज्यास्त कामसू व उद्योगी असतात. त्यांना घरचें व बाहेरचेंहि काम पडतें. कोळ्यांचें मुख्य खाणें म्हणजे मासे आणि भात. पान खाण्याची चटक फार. बायकाहि विड्या ओढतात.

स्त्रियांच्या पेहरावांत तीन वस्त्रें असतात. लुगुट, चोळी आणि फडकी. फडकी बाहेर जातांना खांद्यावरून घेतात. घरांत पुरुष कमरेभोंवतीं सुडका नेसतात व कांहीं वेळां गंजीफरास अंगांत घालतात. बाहेर जातांना पांचवारी धोतर व पैरण असते. डोक्याला लोकरीची वर गोंडा असलेली टोपी घालतात. समारंभाला जातांना टोपडा वापरतात.

सोनकोळी बायकांना दागिन्यांची हौस फार. पुरुष मात्र हल्लीं दागिने वापरीत नाहींत. लग्नापूर्वीं मुलीच्या कपाळावर तिलक गोंदून घेतात.

सोनकोळी लोक स्वच्छ राहतात. दिवसांतून दोनदां तरी चांगल्या पाण्यानें आंघोळ करतात. त्यांचीं भांडींकुंडींहि लखलखीत दिसतात. त्यांचें

नैतिक आचरणहि सामान्यतः चांगलें असतें. लग्नापूर्वी मुलांमुलींचें वांकडें पाऊल पडल्यास त्यांना लग्न करण्यास लावतात. पुरुषांचीं लग्नें वीस ते पंचवीस वयांत व बायकांचीं सोळा ते वीस वयांत होतात. लग्नांत वधूदक्षिणा ठरलेली असते.

खंडोबा आणि भवानी या मुख्य देवता. शिवाय, प्रत्येक गांवीं एक ग्रामदेवता असते. यांचे 'भगत' हे पुरोहित असतात, तरी कांहीं वेळां ब्राह्मण बोलावतात. साधारण हिंदु सणांखेरीज चैत सप्तमी ( चैताचा सण ) व माही पुनव हे दोन मोठे सण पाळतात. पहिला एकवीरा देवीचा तर दुसरा खंडोबाचा असतो. कोळ्यांना दारू एरवीं लागतेच पण लग्न-मृत्यु आदि संस्कारांतहि तीवांचून चालत नाहीं.

यांचें वाङ्मय म्हणजे बायकांचीं जुनीं गाणीं. यांत अंगाई गीतें, लग्नाचीं गीतें, देवादिकांचीं गीतें व शृंगारिक गीतें असतात. —संपादक ]

## सोनकोळी लोकगीतें

संग्राहक : **डॉ. सौ. विजया पुणेकर,** एम्. ए. पीएच्. डी.

### दर्यागीत : ( आंबवणी )

(१) हे ऽऽ पावलाय रे देव मल्हारी । पावलाय रे देव मल्हारी ॥ध्रु०॥
रे पाव माज्या देवा मना मल्हारी ॥ १ ॥
देवा तुजी निंगाली सवारी मल्हारी ॥ २ ॥
करे नयला देव चालLाय् मल्हारी ॥ ३ ॥
देवाचे गबल्यान् झोली हाय मल्हारी ॥ ४ ॥
देवाची उरतेय भंडार रे मल्हारी ॥ ५ ॥
देवा चिमटीन् मुशान् रे मल्हारी ॥ ६ ॥
देवा नदींवं डेवरीलं रे मल्हारी ॥ ७ ॥
देवा तुज्या झयल्यान् आंगोली मल्हारी ॥ ८ ॥
देवा रथावं चरविलाय रे मल्हारी ॥ ९ ॥
देव किल्ल्याला येतेय रे मल्हारी ॥ १० ॥
भावुचे वाऱ्याला देव ऐकलाय रे मल्हारी ॥ ११ ॥
भावुचे नवलाक मेंढर मल्हारी ॥ १२ ॥

देवा किल्ल्यांव चालला्य मल्हारी ॥ १३ ॥
देवा तुजे लाविती सांकोल मल्हारी ॥ १४ ॥
वरती किल्ल्यांव चरलाय मल्हारी ॥ १५ ॥
देवाची होतान् जागरान् मल्हारी ॥ १६ ॥
वाग्या–मुरल्या नाचतान् मल्हारी ॥ १७ ॥
देवाला दिलं रे आसन मल्हारी ॥ १८ ॥
देवाचा येलकोट बोला मल्हारी ॥ १९ ॥

बाबा खंडेरी डोंगोर भालावी
हे ऽ खंडेरी डोंगोर भालावी
देवाची दरी मुंडेरी भालावी
माज्या येलाल बांधवा भालावी
दादा कोल्याला पावलास रे भालावी
अरे जलावचे वैनी भालावी
माज्या तूं थलच्या लखम्या भालावी
माज्या तूं मेसको बैनी भालावी
माज्या घाटाच्या भिकरा भालावी
देवा तुजी काली निशानी भालावी
दादा बालाबा पावलास रे भालावी.

## शिमग्याचें गीत

होडीवाल्या दादा ( माज्या ) होलकरा
दमान सुटलंय चल घरा
दर्याच्या पान्याला आयलंय उदान
फिरव होडी आतं चल घरा
वेगी वेगी रोव्या भुज गो मन।
म्हावरं आयलंय किनाऱ्याला
घेऊनशी जांव चल् बाजाराला
दिरक्या हानून देस नाकवाला
अंजनी सारी घेऊन तुला
नेसून जांव चल् फिरायाला.

## होळी

होळीची ओटी भरतांना स्त्रिया पुढील गीत गातात: —

अगग कालवंडी कालवंडीचे खुर्शिला
नाय पांच खारखा मिलत होवली बायचे वटीला
पांच खारखांचा पाजल पल्ला होवली बायचे वटीला
अगग कालवंडी कालवंडीचे खुर्शिला
नाय पांच सोपाऱ्या मिलन होवली बायचे वटीला
पांच सोपाऱ्यांचा पाजल पल्ला होवली बायचे वटीला[१]

## सटीपूजन

मुलाच्या जन्मानंतर सहाव्या रात्रीं सटी पूजतात. त्या वेळीं गायिल्या जाणाऱ्या गीतांपैकीं खालील गीत आहे—

चला जाव धुये नागाचे जंतरे गो
नागांना वावू शेनाचा शेणपा गो
नागांना वावू शेवतनची फुलं गो
नागांना वावू चंये कोणी कवा[२] गो
नागांना वावू नागयेलीचीं पानं गो
नागांना वावू रोजीयाचीं[३] फुलं गो
नागांना वावू सुपोऱ्याचे शेरु गो
नागांना वावू खारखांचे शेरु गो
नागांना वावू बदाम्याचे शेरु गो
नागांना वावू भुनगुल्याचे[४] शेरु गो
नागांना वावू नारलाचे फल्ल गो
नागांला वावू शेंदराची पुरी गो
नागाखन् आंवतील खंडुदेवाचं गोतु गो
नागाखन् आंवतील बैरी देवाच गोतु गो
नागाखन् आंवतील भोवानीच गोतु गो

---

१ निरनिराळीं फळाफुलांचीं, उदाहरणार्थ, केळी, नारळ, बदाम, अक्रोड, भुणगुली रोजिया, वगैरे, नांवें घालून याच ओळी पुन्हां पुन्हां गातात. १ चौकोनी कणा. २ झेंडूचीं. ३ लाह्याचें.

नागाखन् आंवतील रामा देवाचं गोतु गो
नागाखन् आंवतील कृष्णा देवाच गोतु गो
नागाखन मांगू कन्या बाल पुतर गो
येके मासाचे पारुबाय नारी गुरवशी गो
तुजा एक यासू कोणु नं गो जाने गो
तुजा एक मासू ससरास नं गो जाने गो
तुजा एक मासू सासू न गो जाने गो
सुने जिऊला कनावरी धावे गो
माजा जिऊला रानीच्या आंब्यावरी धावे गो
सम्राट ससरे गेले आंबीयाच्या राइ गो
सोन्याची आंकरी त्याला रुपीयाच तेजु गो
आंकरी लाविली आंबिया डेंखाला गो
ओरिले आंबे, जमेने[१] पारिले गो
जमेनी आंथरिले कसेले रुमालु गो
ते आंबे भरिले दोयां दोयां हातीं गो
त्यांनीं मारील्या कसालिया गांठीं गो
तो रुमाल मारिला पाठिच्या करेसा गो
धावात धुपतू घरा चालून आला गो
उभा रेला दारीच्या येशी गो
हाकू मारिली पारु माजे सुने गो
पारुबाय उठीली घाबरी चाबरी गो
ती जेली चुलीच्या बारौडे गो
हातीं घेतलं हासनाचं कांड गो
तिनीं लाविले आसमानाला दिवे गो
तिनें उगरिले दारीचे दरवाजे गो
हान गो सुने माजे तांब्या भरु पानी गो
तिनें हानिल तांब्या भरू पानी गो
त्याने धोविले पइचे पाऊल गो
पाऊल धोवूनि घरावू खिरीला

---

१ जमिनीवर.

उबा रेला मद्च्या मंदीर खनी गो
हान गो सुने माजे सवरनाचं टाटू गो
ताटी सोरिल्या मिरंगिया गाटी गो
तें ताट नेलं कांचूबंदी ओवुऱ्या गो
कांचुबंदी ओवुऱ्या भोवुऱ्या पलंगीं गो
तिनें घासले बतीसुये दांतु गो
तिनें ओरिल्या आगोरिच्या जिबी गो
तिनें धोविले हातु नि पायु गो
हातु जोरु लागली सुरया देवा गो
मांडे घेतल सवरनाच ताटू गो
ते आंबे सोलिले दोया दोया हातीं गो
आंबे जो सोलिते मुखीं जे भकीतें गो
पोटीचा गरभु संतोसवानी झाला गो[१]
माजे दुखने कोला देवा सांगूं रे
शेजेचा भरतरु बारवडे निजला रे
ती जेली भरतरा जवलु गो
तिनें ठेविला शातिवरी हातु गो
तो उठिला घाबरा चाबरा गो
तो जेला आशिच्या जवलु गो
ती झयली घाबरी चाबरी गो
तो जेला बाबाच्या जवलु गो
तो झयला घाबरा चाबरा गो
ते जेले देवाच्या जवलु गो
हाकु मारिली बाला या हाताला गो
बालादास उठीला घाबरा चाबरा गो
त्यांनीं उगरिले दारीचे दरवाजे गो
त्यांनीं मांडिले चंदणाचे पाटु गो

---

१ आंब्याप्रमाणें इतर कोणत्याहि फळाचें नांव घालून पुन्हां पुन्हां या ओळी गातात व गाणें वाढवितात.

हातीं झितला रुपीयांचा गांठा गो
त्यांनीं लायिला देवाला आरजु गो
त्यांनीं दितला चिमटीभरु भंडारु गो
भंडारु घेऊनी घरा चाल्लन आयले गो
मग जेले सोईणमातेच्या घरा गो
हाकु मारिली सोईणमातेला गो
सोईणमाता उटीली घाबरी चाबरी गो
सोईणमाता हाणिली पालखित बसून गो
ती बोलावा बोलावा लागली गो
बाय काय तुज दुखते, काय तुज खुबते
माजी कंबरु दुखते, पोटु ये दुखते
नार कोणानु[१] डेनली[२] कोणानु रेवली[३]
बालु अक्षार कनान् बरम्या[४] घाल्लं रे
पायान् घाल्ल का रे
पायाच बाल आबाली हुईल रे
हातान् बरम्या घाल्लं का रे
हाताचं बाल आबाल हुईल रे
मंग बाल्ल आक्षार मस्तकान् बरम्या घाल्ल रे
सोईण मातेला दिल सुपली भरु सोन गो
धरतीला दिली सुपली भरु चांदी गो
सोन देऊन घरा पोचती केली गो.

## साखरपुडा

साखरपुड्यासाठीं नवरीच्या घरीं येतांना व परत जातांना वराकडील स्त्रिया गाणीं गातात :

चेऊली ये चेऊली ये नगरी फुलयेला चापा
जेठू येयान् घर मांदिल जल्मी जरी आल वास
डोंगराच्या करनीला पानी झुलुनीलु बाई
मोरु जेला पानी पिकं

---

१ कोपऱ्यांत. २ लवंडली. ३ बाळंत झाली. ४ ब्रह्मदेवा.

मोरान सोरियेला तारु
त्या देवा तावासंगें फुलांचे झेले
मोरानी उराण केलं बसलाय करंदीच्या जाले
डांगिन डुंगिन हालयिली तयं बाय फुलांचे झेले
फुलांचे झेले हानु माजं पारवती बाय जोगती
राजा दसरथाची कन्या
ती हाय मारीवरी उबी
तिची नंदार जोग्यावरी
आये मी जातन् जोग्यासंगें कामठू पायाला
नको जाव माजे लारके धुये
आरध राजे देन गो धुये तुला बठे खावाला
काय करुं आये आरध राजे
बारा वर्सं तप गो झोरीतंय जोरिकासाठीं
नको जाव माजे लारके धुये
सगल राजे देन गो धुये तुला बठे खावाला
काय करुं आये सगल राजे
बारा वर्सं तप गो कारितंय हलदीसाटी
नगराबायेरु बाबारे काई वाजतेंय
भलीयांचा पुन गे धुये तुला परणाला येत्येंय
काली गांठी निला चुरा बाय तुला घेऊनी येत्येंय
जलमाचा जोरा तुजा बाय भांदुनीं घेत्येंय
भलीयांचा पुत गो धुये तुला परणाला येत्येंय.

## तेलवान

चैत्र शु॥ सप्तमीस देवीस 'तेलवान' करतात. पांच सुवासि स्त्रिया नागवेलीचें पान देवीवर धरतात; पानाला मध्यें भोंक पाडून करंगळ त्यांत तेल सोडतात. त्या वेळीं खालील गाणें गातात—

सवरणाचं कांड नागायेली पानु चवगी धरा
नागायेली पानु चवगी धरा
सांगनं धारा तेलयांच्या घरा

चोखिया तेलांचे घाला ये घाने
घाला ये घाने
आदीं तेलु परे धरतरी मातेला
मंग तेलु परे तियें टालानां[१]
मंग तेलु परे चयें खणानां[२]
मंग तेलु परे आयचे लोंगराला[३]
मंग तेलु परे मेरु मंडलाला
मंग तेलु परे समु शिकाराला
मंग तेलु परे खंडु देवाला
मंग तेलु परे बैरी देवाला
मंग तेलु परे भोवाने मातेला
मंग तेलु परे देवसुबी बायानां[४]
मंग तेलु परे धरमा ईराला[५]
पारये घुमती शाणे ऐकती देवूराज
शाणी ऐकेलु भोवानी माता
शाण्या ऐकती देवसुबी बाया
शाणा ऐकेलु धरमा ईर
वांशीच्या गाणारणी चेऊलच्या वसणारणी गो बाय येती रंगातु.

## गौरीचें गीत

बाय कोनी तुला म्हायेरा हनिलं
नामदेव भावान हनिलं
तुज्या नं गो बाय साटीं
भाऊ तुजे कसटी[६]
बाये आतां भावाच्या म्हाएरी

---

१ तिन्ही लोक. २ चार दिशा. ३ डोंगर. ४ देवी, कांजण्या, गोवर वगैरे आजारांशीं संबंधित असलेल्या देवता. ५ अपघातांत (विशेषतः समुद्रींत) मृत पावलेल्या मनुष्याचा आत्मा त्या ठिकाणीं घुटमळत असतो अशी सोनकोळ्याची समजूत आहे. असा मनुष्य ‘ईर’ होऊन राहतो. धरमा हा कांहीं प्रसिद्ध ईरांपैकीं एक आहे.समुद्रांत संकट येऊं नये म्हणून ईरांना पूजतात. ६ कष्टी.

खेळुं बाय गो फुगरी खेळुं
फुगरी खेल बाय बरा
बायच्या मनान् भरला
बाये आतां भावाच्या म्हाएरी
कनाचा रुस मांडिला
भावांव रुस मांडिला
बापांव रुस मांडिला
ये बाय गो बापा—माएरी
तुज्या न गो बाय साटीं
बापू तुजे कसटी
तुला भांदियल गो कापरी[१] मंडपु
तुला आनिलयन् गो कंदील[२] लेनं
ए बाय गो भावा माएरी
भावाच म्हाल मिरवाला[३]
बापाच म्हाल मिरवाला
तुज्या न गो बाय साटी
कोने गो शरा[४] भाव गेले
मोबय शरा भाव गेले
बोरीबंदरा उतरले
आमि पुसतान् खताऱ्या[५] गल्या
खताऱ्या गल्या गो बाय कनाला
आमचे गरा बैन आली माएरा
तिला सारी या पायजे रे
आमचे गरा बैन आली मायेरा
तिला चोलीया पायजे रे
बाय सारिया विनातु गातिल्यान
बाय चोलीया विनातु गातिल्यान
भोल्या शंकर मादेवा

१ कापडी. २ खुर्ची. ३ शोभा आणण्यास. ४ शहरा. ५ कोष्टीच्या.

देवा दुनयाच्या पालनु रे वाल्या
देवा भाव मना वारावा रे आयले
रजा दे देवा माएरी जावाला
माएरी जासी काय गो भारजे खासी
देवा भाव माजे गरीब रे डुबले
देवा खाईन मी कुडयाची भाकरी
ये बाय गो भावा माएरी
आथ सोर बाय गो मनीचा यो रागु
घे बाय गो कापरी मान पानु
कापरी मांडव सोन्याचा.

## गौरी येतांना

बाय खेलत पिंग्याचा गो खेलु
ऊद जले उदाराती कापूर जले ज्योती
सतवांचे गवरा देवी अवरा उशीर कां केला
कां बाय गो एकुली आयली
संगें नाय हानिलं शंकरा देवाला
संगें नाय हानिलं म्हादेवा देवाला
गवरी कनची येत हुती
खंडुदेवानं समजी केली
बैरी देवानं समजी केली
तेवा आली भावा माओरी
भावाचं म्हाल मिरवाला
बापाचं म्हाल मिरवाला
फुगरी खेले बाय बरा
दुरुनी बाप गो बगिती
दुरुनी भाव गो बगिती
बाय खेलतेय गो कन्या काय धाकुटी
बाय आशीची काजळाची कोबी
बाय बापाची शेंदराची पुरी

खेळ बाय गो बापा माएरी
भोल्या शंकर मादेवा
देवा सोरा आथं मनीचा रे रागु
ये देवा मेवन्या माअेरी
मेवन्याचं माएर मिरवाला
देवा सोर आथं मनीचा रे रागु
समनी कर देवा नाचनारनी बायाची
ये देवा मेवन्या माअेरी
मिठीशीं मिठा मारावी
खेळ दाखवावा आपुले मेवन्यांना
आला गो शंकरु देवू
दिव्याच्या वळ्यान्[1] रायलाय
मन बगितेय गो गौरुबाय भारजेच
चित बगितेय गो गौरुबाय भारजेय
भोल्या शंकर मादेवा
शंकर कनचा येत हुता
शंकर बसला हुता हिमाल्या परवती
शंकर वाचीत हुता पोथ्या का पुस्तुक्या
धावा ऐकिला गौराये भारजेचा
देवा ये आथं मेवन्या रे माएरी
देवा आथं भावा रे माएरी
तुज्या न रे देवासाटी
नाचनारनी बाया कसटी
मेवने तुजे कसटी
देवा सोरा अथं हिमाल्या परवतु
देवा या अथं मेवन्याच्या माएरी
हाऊस पुरी करा नाचनारनी बायांची
आला गो शंकरु देवू
मिठीशीं मिठी मारिली

१ सावलींत.

## गौरी परत घरीं जातांना

दुपारच्या पारीं ऊठीली
दारच्या चिंच्या बैसली
कां बाय जो केस मेकुले[१]
केंडुक्या[२] फुलासाठीं
केंडुक फूल येल तवा मी माथं उकलीन
ठेव बाबा आपुल्या सारीया
ठेव बाबा आपुल्या चोलीया
ठेव बाबा आपुल्या बांगुड्या
ठेव बाबा आपुल्या कंठीया[३]
येईन बीजा भादव्याची
तंव पुसेन सारीया
तंव पुसेन चोलीया
तंव पुसेन बांगुड्या
तंव पुसेन कंठीया
मानपी बस माज्या आजा रे मुजी नात जाते सासुऱ्या रे
सासुऱ्या जावाला निंगालु आजा काय लेन देसील रे
केली नु शेवया पुरान नाती जेवायला पोख[४] गो
काय करूं शेवया पुरान आजा जातंय सासुऱ्या रे
बोलु लागेल सासुऱ्यांचा
बोलु लागेल सासवांचा
बोलु लागेल नंदांचा
बोलु लागेल दीरांचा
सांजु येला आजा जाली
कां बाय, गो लरतु जाते
सांजु येला आजा जाली
कंदी जाव आपुल्या सासुऱ्या
मनबाऱ्या शार सासुऱ्या

---

१ मोकळे. २ कमल. ३ याप्रमाणें सर्व दागिन्यांचीं नांवें घेतात. ४ थांब.

सोन्याची सुपली बाय मोत्याची कुलकुली
रागुची चंद्रा येग बाय निंगाली खेलाया
खेलत खेलत ग बाय मोत्यानी खुपला
गोविंदांनीं देखिली बाय तिचा पालवू धरिला
अरे अरे गोविंदा र सोर माजा पालवू
नाय सोडिसी पालवू ते वैतागु झेईन
वैतागु झेईन ते वल्यात जाईन
वल्यात जाईन मे तुलसी व्हईन
तु होसी तुलसी ते मे व्हईन पुजारी
वैतागु झेईन ते वनांत जाईन
वनांत जाईन मे नागीन व्हईन
तु होशी नागीन ते मे व्हईन गारुडी
लाग पोरी लाग गो पान्याची लाट
गौरु जाते सासुऱ्या गो तिला झाली सांज
लाग पोटीं लाग गो फुगऱ्यांशीं लाग
गौरु जाते सासुऱ्या गो तिला जाली सांज.

## देवीचें गीत

आईला रंगोल्या म्हाल भांदिला
गो रंगोल्या म्हाल भांदिला

[ द्वि.=कडवें दोनदां म्हणावयाचें ]

आय माजी म्हालाची मालकीन ( द्वि. )
आयला निजलें समींदर दिसे ( द्वि. )
आईचे सुमान उंगवला
सूर्या सुभान उंगवला
आइनी पग्शानां हांक दिली ( द्वि. )
साता रातीची एक रात केली ( द्वि. )
आइनी डोंगराला कामु लायिले ( द्वि. )
सारिते डोंगराव डोंगरु
गो डोंगरु

आइनी केसु वारयिलं गो
आइनी मस्तकी चरयिली गो
आय माजी कोंबरा अरवली गो
भीमान लातुस मारिली गो
भीमान कीरण पाटिलं गो
आई तुज्या जेजुरी नवत्या शेर्नी गो
आई तुज्या सतवाच्या[१] शेनी गो
आई तुज्या जेजुरी नवता चांपा ( द्वि. )
आई तुला खोपा कनाशी भरु ( द्वि. )
आई तुज्या सत्वाचा चापा ( द्वि. )
आई तुज्या डोंगुरी नवता पानी ( द्वि. )
आई तुला अंगोल कनाशीं करूं ( द्वि. )
आई तुज्या सत्वाचा पानी ( द्वि. )
आय तुज्या दाराशी सोपारी
आय तुजां भेट घेन दोपारीं
आय तुजे दाराशीं आवली
आय तुवर पर सावली
आय माजे कोनाला पावली ( द्वि. )
रामज्या भघताला पावली
गो रामज्या भगताला पावली ॥ ध्रु० ॥

## एकवीरा देवीचें गीत

अग माजे येकुयेरे बाई गो येकुयेरे बाई
तुजं मालु[२] वणामंदी गो बाई वणामंदी
माल बाय भांदिल पंडवाजं गो भांदिल
माला दोरवा[३] उपजला गो दोरवा उपजला
माय वसे दोरयाच्या मालानु गो दोरयाच्या मालानु
माल बाय टाकुनिये दिलं गो टाकुनिये दिलं
माला काणेरी बसविली गो काणेरी बसविली

---

१ सत्त्वाच्या. २ महाल. ३ दुर्वा.

नंदानं काणेरीला दिलं गो काणेरीला दिलं
आय माजी विचारान् परली गो विचारान् परली
पतर लिवाला लागली गो लिवाला लागली
पत्तर नेल उरणायावतीला गो उरणायावतीला
पांडव कचेरे बैसले गो कचेरे बैसले
पत्तर कनाचं आले गो कनाचं आले
पत्तर भोवाने मातेच गो भोवाने आयेच
पत्तर कशा कारणे आले गो कशा कारणे आले
पत्तर वाचावा लागले गो वाचावा लागले
पांचा पांडवाजू इचारु करीला गो त्यांजू इचारु करीला
आयला रातीनु माल भांदु गो माल भांदु
साता गो रातीची त्यांजु एकु रातु केली गो त्यांजु एकु रातु केली
डोंगर कऱ्यावरी करा डोंगर चरवू लागले गो डोंगर चरवू लागले
आय माजी इचारान् परली गो इचारान् परली
बोलावा लागली आय माजी पांची पांडवांना गो पांची पांडवांना
अरे माज्या भीमा रे बंधवा रे नकुला बंधवा
अरे माज्या धर्मा रे बंधवा रे अर्जुना बंधवा
अरे माज्या सहेदवा रे बंधवा रे सहदेवा बंधवा
येतील लानी तानी बालं रे लानी तानी बालं
येतील बालती सालती रे बालती सालती
कैसी डोंगरी चरती रे डोंगरी चरती
आठवरी[१] नारी धुरधुर धांवती रे धुरधुर धांवती
बालती सालती दादा लयालयान् चालती
कऱ्यावरी करा दादा कैशाला चरवीता रे कैशाला चरवीता
आय माजी रागावू भरली गो रागावू भरली
आय माजी कोंबुराई जाली गो कोंबुराई जाली
कोंबरा आरवला लागली गो आरवाला लागली
पांची न गो पांडव बोलाया लागले गो बोलाया लागले
येतु गो रातीचा कोंबरा कुटून आला गो कुटून आला

१ तरुणी.

भीमानं गो बंधु आईचा रागानु भरला गो रागानु भरला
मारिली कोंबऱ्याचे लातु गा कोंबऱ्याचे लातु
आय माजी कलथी पारिली गो कलथी पारिली
भीमा बंधवाला आयनी सरापु गो दिला
भीमा बंधवाला पारिल शेपाचें गो किर
आय माजी दयावंतु जाली गो दयावंतु जाली
कीरे टीपावाला लागली गो टीपावाला लागली
उबी हाय पांचा पायेऱ्यांव गो पांचा पायेऱ्यांव
वाट पाते कोंकनच्या पोंव्याचीं[1] गो कोंकनच्या पोंव्याचीं
कदीं येती कोंकनचीं बालं गो कोंकनचीं बालं
कोंकनच्या बालांची आयला काय गोरी लागली गो काय गोरी लागली
कोंकनचीं बालं आयच्या चरनाला लागतान् गो चरनाला लागतान्
कोंकनचे बालांची आयला हौस मोठी भारी गो हौस मोठी भारी
उबी हाय उंचा शिलीवरी गो उंचा शिलीवरी
आयची नंदार[2] बालावरी गो नंदार बालावरी
आय माजी खिरक्या मालान् बसे गो खिरक्या मालान् बसे
आय तुला निजले समुंदर दिसे गो निजले समुंदर दिसे
आय माजी खिरक्या मालान् बसे गो खिरक्या मालान् बसे
खिरक्या मालान् बसे गो चोरांच कालीज फाटे गो
चोरांच कालीज फाटे
आय तुजा गुलुल्या डोंगर लाढ गो गुलुल्या डोंगर लाढ
येती गुलुलाच्या नंदी[3] गो गुलुलाच्या नंदी
येती अबीराच्या नंदी गो अबीराच्या नंदी
आय तुज्या दारावरून जाती गो तुज्या दारावरून जाती
आय तुज्या दाराशी सुपारी गो तुज्या दाराशी सुपारी

---

१ सोनकोळी समाजांत ‘मंडळी’ या नांवाची एक धार्मिक संस्था आहे तिचा मुख्य जो भगत त्याच्या आधिपत्याखालीं दरवर्षी किंवा दोन, तीन वर्षांनीं मंडळींतील कुटुंबें जेजुरीला अगर कार्ल्याला जातात. अशा जथ्यास ‘पोंवा’ अशी संज्ञा आहे. २ नजर. ३ नदी.

आय तुजी भेट घेऊं दुपारीं गो भेट घेऊ दुपारीं
आय तुज्या दाराशीं आवुली[१] गो तुज्या दाराशीं आवुली
आय तुजेवर परे सावुली गो तुजेवर परे सावुली
आय तुझे दाराशीं सोनचांफा गो तुजे दाराशीं सोनचापा
चांपा कोनी गो लाविला गो कोनी गो लाविला
आय तुज्या माल्यानी लाविला गो तुज्या माल्यानी लाविला
शिंपन कोनी गो घातिल गो कोनी गो घातिल
आय तुज्या माल्यानी घातिल गो तुज्या माल्यानी घातिल
चांपी कोनी गो वोरिली गो कोनी गो वोरिली
चांपी माल्यानी वोरिली गो माल्यानी वोरिली
माळा कंवनाक ओयिल्या गो कंवनाक ओयिल्या
माळा सुयेवयनी[२] ओयिल्या गो सुयेवयनी ओयिल्या
माला रेसमांत ओयिल्या गो रेसमांत ओयिल्या
आयच्या शिरावंयच सोरिल्या गो शिरावंयच सोरिल्या
आयच सीर दिसे सोबितु गो सिर दिसे सोबितु
आय तुजा सकाराम सोनारु गो तुजा सकाराम सोनारु
घरविते बांगड्याचे जोरु गो बांगड्याचे जोरु
घरविते मुंगड्याचे जोरु गो मुंगड्याचे जोरु
आयच्या हाताला झाले घटु गो झाले घटु
मुंगड्या कानाला झाल्या खरुं गो कानाला झाल्या खरुं
आय माजी आदिमाया पारबती गो आदिमाया पारबती
तिची नंदार बालावरी गो नंदार बालावरी.

## लग्नांतील गाणीं

सोनकोळी समाजांत लग्नाच्या पहिले दिवशीं ‘ जाव्या ’चा समारंभ असतो. या वेळीं वधूला ( अगर वराला ) पहिली हळद लागते.

( १ ) रांगोळी घालतांना—

शिली घावे शिली घावे गवरे बाय शेण सारवा
गवरे बाय गवरे बाय शेण सारवा

---

१ आंवळ्याचें झाड. २ सुईवरून.

वाळूकण्या बाये वाळूकण्या बाये कणे भरावा
मालसे बाये मालसे बाये पाटु मांडावें
भोवाने बाये भोवाने बाये पाटी पासवरे
जनानोवरे जनानोवरे पाटी वसावं
यो पाटु घरविला चौरंगीं रंगविला
भल्ले सुतारा तूं चतुरा हो
चतुरु चौरासु रोवीलि दारु केली कवारं हो.

( २ ) नवरी पाटावर बसल्यावर——

पाटी बसा पाटी बसा घरींच्या खंडूदेवा
मंग पाटू द्यावा कां नोवऱ्या जनाबाईला
पाटी बसा पाटी बसा आयोध्येच्या श्रीरामा
मंग पाटू द्यावा कां नोवऱ्या जनाबाईला
पाटी बसा पाटी बसा घरींच्या भोवानमाते
मंग पाटू द्यावा का नोवऱ्या जनाबाईला
पाटी बसा पाटी बसा मोरया गणपती राया
मंग पाटू द्यावा का नोवऱ्या जनाबाईला
पाटी बसा पाटी बसा द्वारकेच्या श्रीकृष्णदेवा
मंग पाटू द्यावा का नोवऱ्या जनाबाईला
पाटी बसा पाटी बसा द्वारकेच्या श्रीकृष्णादेवा
मंग पाटू द्यावा का नोवऱ्या जनाबाईला.

( ३ ) किंवा,

जनाबाई पाटी बसा पाटी बसा
वोटीत घाटीत भुइपल्ली चवल
शेंवल सांठली नोवरे जनाबाईची
वोटीला राम वोटीला सीता वोटीला जनाबाई.

( ४ ) पोखवान करतांना——

पोखवा आल्या सुलेगनी
बत्रीसा दामाच पोखानु
बत्रीसा दामाची नोवरी जनाबाई

संबूच नंदानू गायनी गे गजमुखा
त्यासवें नारीकू विद्याधरु
विद्याधरिते विद्याधरिते
एक गेली अंगरा एक गेली डोंगरा
हनियाली हलदुली
हनियाली हलदुली उतरविते भानासु
त्यासवें नोवरी नारीकु जनाबायु
शेंदूर कुकु बाय जाउलीच
अस्तरी लाविते टिला
टिला गो लाविते मानकूबाई
जलमान् सावित्री होशी.

( ५ ) किंवा,[१]

शंभूचे नंदानूं गायमिं गे गजमुख त्यासंगें
नाकु का विद्याधरा त्यासंगें
विधाधरीत विद्याधरीत
एक गेली आगरा दुसरी गेली डोंगरा काय हलदीला
हाणयालीं हलदुली उतरली घळोसा परेसा
भाणसा काय इंति माथा सोनयाचा यो पाटा
रुपयाचा वरंवटा हलदुली घणवाटा सावले.

( ६ ) तेलवान करतांना—

तेलवना आलिये तवनाय झेलिये
अशापरिच काशिनाथ नाखवा गोतुहु जाशा
हरिका जनाबाई तेलवान.

लग्नांतील दुसरा महत्त्वाचा समारंभ म्हणजे चौक. रांगोळीचे बारा चौकोन काढून एकएका चौकोनावर वधूला ( अगर वराला ) बसवितात, गाणें म्हणतात व सुवासिनी तेलवान करून तिला हळद लावितात. शेवटच्या चौकावर मामा नवरीला मांडीवर घेतो व तिला अहेर देतो. हा

---

१ एकाच गाण्याचे हे दोन प्रकार आढळले. मात्र त्याचा शब्दशः अर्थ कुणीच सांगूं शकलें नाहीं.

समारंभ रात्रीं आठ नऊ वाजतां सुरू झाला कीं पहाटे तीन चार वाजतां संपतो.

(७) चौकावरील गाणीं :

पाटी बसा पाटी बसा घरींचें तूं देवा
मंग पाटु जनानोवरीला कि द्यावा.
पाटी बसा पाटी बसा खंडोबा देवा
मंग पाटु जनानोवरीला कि द्यावा
पाटी बसा पाटी बसा शंकर देवा
मंग पाटु जनानोवरीला कि द्यावा.

याप्रमाणें सर्व देवांचीं नांवें घेत याच ओळी पुन्हां पुन्हां गावयाच्यां.

या गे चौकामंदी हरी देवाचा ह्यो मान
हलदी रंगा ये हलदी रंगा ये
हलदी कनान् रंगा येशी
बालीचे पयान् रंगा येशी
हलदी रंगा ये हलदी रंगा ये
हलदी कनान् रंगा येशी
बालीचे कमरेन् रंगा ये
हलदी रंगा ये हलदी रंगा ये
हलदी कनान् रंगा येशी
बालीचे शातीन् रंगा ये.

याप्रमाणें सर्व अवयवांचीं नांवें घ्यावयाचीं; व नंतर

हलदी रंगा ये हलदी रंगा ये
हलदी डोक्यान् उतरुन जाशी
शिपा जलमला दरियाच्या पोटीं
मोत जलम्ल शिप्याच्या पोटीं
जनाबाय जलम्ली भोवानबायच्या पोटीं
शिपा जलम्ला दरियाच्या पोटीं
मोत जलम्ल शिप्याच्या पोटीं.
जनाबाय जलम्ली मानकू बायच्या पोटीं.

याप्रमाणें घरांतील सर्व वडील बायकांचीं नांवें घेऊन या ओळी पुन्हां पुन्हां म्हणावयाच्या. नंतर.

शितेचे दारी भरला सैंवार
भोवानबाय तुमची धू ( लेक ) सैंवारी जाते
शितेचे दारीं भरला सैंवार
मानकूबाय तुमची धू सैंवारी जाते.

वरीलप्रमाणें सर्व वडील मंडळींचीं नांवें घ्यावयाचीं.

( ८ ) चौकाचें दुसरें एक गाणें:—

पयला चखू संवारिला यो गे धरतरे मातेचा
पयला चखू संवारिला यो गे तियें टालाचा
पयला चखू संवारिला यो गे चयें खणांचा
पयला चखू संवारिला यो गे देवाधर्माचा
चौकोनी चारीऊ आरसे पोंवा रे कृष्णदेवा सारिसे
या गे आझेरी नारीं येऊन ढवल घालती हो
टाळ वाजती र खंडु देवा घरीं हाई सोहला
नवऱ्याच्या बापा खंडूदेवा माल घेऊं मंडपा उंबा हो
नवऱ्याच्या माये मालसा बाये सुखाचा सोला देखा ले.

मामा किंवा मामी मांडीवर घेतात त्या वेळीं,

बयाबायच कोल तासू रे मामा
चंदनाचे पाटा बस का रे मामा
मामानं पुताला मांडे झेतल
पदरीं बांधिल्या तांब्याच्या सळया
मुखी करविल्या गोराच्या लोल्या
कांतारी कांतारी झार वाटुली पान
ईश्वर जोरु येवे बाबारे कांकनु मोरू
कांकनाचे वले आखर झाले चुरे
तुजं मामान कांकन पारखिल
देस गो आयाचे हातीचं गो कांकनु
आपले नागले सोरून घ्या ये.

दुसरा दिवस म्हणजे लग्नाचा. त्या दिवशीं सकाळीं नवरीला चुडा भरतात व नवऱ्याचें ' मोव ' करतात.

(९) कांकणाचें गाणें—

हालविला पालुना हालविला डोलारा
तयें रुखमाईचा लागला डोलारा
रुखमाईच्या हातींच कांकन चोरुन नेल
कांकनाची ओली कांकनाची ओली
देइन गो तुला जनाबाई
तुझें घरचे देवानी काकान पारखिल.

शेवटच्या वाक्यांतील ' घरचे देवानी ' या ऐवजीं घरांतील वडील मंडळींचीं नांवें घेऊन पुन्हां पुन्हां हा चरण म्हणावयाचा.

(१०) नवरा मोव्यासाठीं बसतांना :

दारींचे वसरे गो आंथरिल्या मांदऱ्या
त्यावर मांडिले गो चंदनाचे पाटु
त्यावर मांडिल्या गो घुपुल्या घऱ्या
दांडी डोलवा गो भाई बोलवा
घाटावरुनी गो डेवले मेस्तरी
त्यांचे वस्तारे सोन्याच्या तारा
सोन्याच्या तारा गो रुप्याच्या धारा
मोतीराम नोवरा गो मोव्या बैसला
त्यांचे मंगारे गो आसी सा उभ्या
त्या घालती पुताला पालवू वारा
मोव करिते गो का रे घर भल्ला
भल्लयाचे कारेगर बोलावुन आना
खंडुदेवाचा पुत गो मोतीराम बाल मोव्या बैसला
रामादेवाचा पुत गो मोतीराम बाल मोव्या बैसला
कृष्णदेवाचा पुत गो मोतीराम बाल मोव्या बैसला.

संध्याकाळीं मंगलाष्टकें म्हणून ब्राह्मण लग्न लावितात व त्यापूर्वीं

वधूस व वरास आपआपल्या मंडपांत आंघोळ घालतात. स्त्रिया विहिरीवरून पाणी आणतात व वधूचा अगर वराचा भाऊ समुद्राचें पाणी आणतो.

(११) आंघोळीच्या वेळीं स्त्रिया गाणीं गातात—

आगासी गो झुपविले लाठु
पाताली गो खणियाल्या बावी[१]
ओरा ओरा गो भाव्याचे बावींचे पानी
थेंबी थेंबी गो कलस भरिले
पयलं पानी गो कावल्या उसटील
दुसर पानी गो सायल्या[२] डोंबिल
तिसरं पानी गो चीरिया[३] उसटील
चौतं पानी गो मोतीराम नोवऱ्याच्या माव्यांव.

(१२) आंघोळ करून नवऱ्यास कपडे घालतांना—

ओरेल्या डोंगरी देवा सागर फुलैला
आमा परी मोतीराम नोवरा देवा लान रे ठाकुरा
अंगीचे झगीये देवा हलु रे चरवावे
गलीच्या कंठीया देवा हलु रे चरवाव्या
माथीच्या पागुन्या देवा हलु रे चरवाव्या.

याप्रमाणें सर्व पेहरावाचीं नांवें घेऊन तीच ओळ पुन्हां पुन्हां गावयाची.

(१३) नवरा कपडे करून बाहेर निघतांना—

मुरता[४] नोवरा भाईर गो परला
सुमरान् करीतेय घरीचे या देवाचे
सुमरान् करीतेय खंडु गो देवाचे.

याप्रमाणें सर्व देवांचीं नांवें घेऊन गातात.

(१४) नवरा घोड्यावर बसून मिरवणुकीनें वधुगृहीं जाण्यासाठीं निघतो तेव्हां स्त्रिया म्हणतात—

सोरा सोरा खंडुदेवा काळं पागेच घोरं
जा कारे खंडुदेवा तूं वरासंगाते
लग्नाच्या येलेला देव यजमानी गेले

१ विहिरी. २ साळुंकी. ३ चिमणी. ४ मुहूर्ताला.

नोवरा निंगाला उबे गो दोपारीं
त्येला सिनगारु हाये गो जावल्यांचा
नोवरा चालला गो भरल्या गो बिदीला[1]
भरल्या बिदीला कोनी गो हाटकीला
भरल्या बिदीला रामादेवानी हाटकीला
नोवरा चालला गो भरल्या बिदीला
भरल्या बिदीला कोनी गो हाटकीला
भरल्या बिदीला शंकरा देवाची हाटकीला[2]
फोरा फोरा नारल फलु
आपला ईश्वरु चालता करा
भरल्या बिदीला गणपतीरायानी हाटकीला
फोरा नारल फलु
आपला ईश्वरु चालता करा.

(१५) मिरवणूक नवरीच्या मांडवाजवळ आली असतां——

अरेरे ईश्वरा पोख मांडवाच्या दारीं
तुजी भारजा मिऱ्या मोरीतेय पातलांच्या
तुजी भारजा शिनगार करीतेय जाऊल्याचा
तुजी भारजा शिनगार करीतेय बांगुऱ्याचा
तुजी भारजा शिनगार करीतेय मुंगऱ्याचा
तुजी भारजा शिनगार करीतेय कंठीयाचा
आगोगो केंडुके तुजे यो काटे सर्व अंगाला
यो ईश्वर येतयं धुये भरल्या वाटे
अरेरे येलाऱ्या येलाऱ्याच्या पुतरा अवरा[3] वे अवरा
उसिर कारे केला.

(१६) बाशिंगाचें गाणें——

सोनकोळी समाजांत एक पद्धत अशी आहे कीं, लग्नाला येतांना

१ गल्ली. २ वधूगृहीं जातांना गांवांतील निरनिराळ्या देवळांत जाऊन नंतर नवरा वधूगृहीं पोहोचतो. ३ इतका.

वराच्या कपाळावर दोन बाशिंगें बांधतात व ब्राह्मणानें लग्न लाविल्यानंतर त्यापैकीं एक काढून वधूच्या कपाळावर बांधतात.

अरवलीची करवली मोत्या मिरवली
उटा उटा सोनी बाशिंग घरवा
बाशिंग घरवा नवी रत्न जोरा
पयलं बाशिंग चांदासुर्या भांदिल
मंग बाशिंग चांदनीबायला भांदिल
अरवलीची करवली मोत्या मिरवली
उटा उटा सोनी बाशिंग घरवा.
दुसरं बाशिंग खंडुदेवा भांदिल
मंग बाशिंग सोरिल नि मालसाबायला भांदिल
अरवलीची करवली मोत्या मिरवली
उटा उटा सोनी बाशिंग घरवा.
तिसरं बाशिंग शंकराला भांदिल
शंकराच सोरिल, नोवरे पारबतीला भांदिल
अरवलीची करवली मोत्या मिरवली
उटा उटा सोनी बाशिंग घरवा.
चौतं बाशिंग रामादेवाला भांदिल
रामादेवाच सोरिल आणि शितेबायला भांदिल
अरवलीची करवली मोत्या मिरवली
उटा उटा सोनी बाशिंग धरवा.
पांचवं बाशिंग मोतीरामाला भांदिल
मोतीरामाच सोरिल नि नोवरे जनाबाईला भांदिल.

(१७) लग्न लागल्यानंतर रात्रीं सारा पारखण्याचा समारंभ असतो. या वेळीं दोन्ही पक्षांकडील पंच, पाटील व इतर प्रतिष्ठित मंडळींच्या समक्ष वराकडील मंडळींनीं ठरलेला देज दिला कीं नाहीं हें पाहण्यांत येतें व त्यांच्या समक्ष तो वधूच्या पित्यास दिला जातो. या वेळीं स्त्रिया म्हणतात--

ई रे ग वोपिल्यान् तुमी केऊका आले
सारी नेसा सारी नेसा तुमी गो धुवे

सरियाचे घरीवरी भोवान वरुमाय ठेवगो पायु
सारा गो सारियाला हजाम्या दारीं
तुमच मिळेल सगल गोतु
गोतादारी झुजवाले यसवंत झाले
येच काय झुजनारु काकुसु मामुसु
सुने गे जनाबायचे अक्खर होती चुरे
सासु गो भोवानबायचे ढालु होती चुरे.

( १८ ) साऱ्याचें दुसरें गीत :

डोंगरी इंद पयरीलं त्यांची मुलं गेलीं पाताली
मुलं गेली पातालाला भाया गेल्या इस्ताराला
बारावर्सी आलं इंद हरीगोविंदानी नेल
आगे रानचे नागायेली तूं ते नगरानचे फोफावली
नागायेली वाट कोनी कारीयाली नाय
येल खोटासी वारीली हातीं खुरील पान
बत्तीस पानाचा वरीला विरा
पयला विरा घरच्या देवा मंग जनानोवरीच्या गोता
पयला विरा बैरी देवा मंग जनानोवरीच्या गोता
पयला विरा भोवानमातेला मंग जनानोवरीच्या गोता
पयला विरा गणपती देवा मंग जनानोवरीच्या गोता
जनानोवरीच गोतु गो भारी आणाधानाच्या परी
आण–धान घेतलं धुरडीया
चित्राखण माज्या बायी गो बायी
ताठच्या बायी पानी झुलु निरवाया
फुऱ्यान झेतली जनानोवरी
पानी शारंगी सोरिल
शाचे ये गो तुरवाचे दारीं विरे घेऊनीया
आले झुझु आले यशवंतु जाले
कोन्या गे कवतीक झुझु आले राजे
येच काय झुझुनारु बाप काय आजु
येच काय झुझुनारु भाव काय बंदु

राने गो जनाबायचे अक्खर जाले चुरे
सारे साता हाजाने दावी
सारे नेसा माज्या जनाबाय धुये
तुज गो मिलेल सगल गोतु
गोतादारी या आगलव्या त्याच गे बागलव्या
ठेवा रतनु वरमाय पाऊं
योगे चंदानु सानी वरी वरीत्राला
तांब्या कवशी भरीयाला
बसकी बसू गेले देवू, देवू ये गे लोटवू
देवा चंदान गे वाटीयाला
बसकी बसू जेल जनानोवरीच सारु गोतु
गोता चंदानु गे वाटीयाला
बसकी बसल्या रे खंडुदेवा सरदारा
बसकी बसल्या रे बैरोदेवा सरदार
बसकी बसत्ये गो भोवानीमाते सरदरनी
बसकी बसत्या रे रामा देवा सरदारा
बसकी बसत्या रे गणपती राया सरदारा
बसकी बसत्या रे कृष्णदेवा सरदारा
तुमचे खंदींचे शेले पयीं लोलात
तुमचे शेल्याना चंदनाचा परिमालु
वर मोतीयांचा झनकारू
मोगे मारू बुंदा जाला मारू
वर पानीयांचा झनकारू.

(१९) रात्रीं मिरवणुकीनें सर्व देवळांत जाऊन वरात वरगृहीं जाते. दुसरे दिवशीं सकाळीं सूर्याला नमस्कार करण्यासाठीं नवरानवरी घराबाहेर येतात. स्त्रिया सूर्यदेवाला आळवून वधूसाठीं अखंड सौभाग्य मागतात.

डोंगरापयलेकडे चरते हरन
तिथे उंगवली सूर्याचीं किरनं
ये दोखं बोवेल पयां परती

जनाबाय मांगते देरे देवा
माज हात भरून चुरे
ती देवा मांगते माथं भरून फुल
ती देवा मांगते गला भरून गाठी
ती देवा मांगते नाखीचं मोतं
ती देवा मांगते कपाल भरून कुंकु

## कांचोलीचें गीत

मामोजी माजी कांचोली कोनी नेली
भलियांचे लेकी सुने माखं काय निमगिते
जा पुस अपुले सासूपाशीं
सासूबाई माजी कांचोली कोनी नेली
भलियांचे लेकी सुने मांखं काय निमगिते
जा पुस अपुले जावेपाशीं
कारबार करीते माजे जावबाई
माजी कांचोली कोनी नेली
भलियांचे लेकी जाव बाये माखं काई निमगिते
जा पुस अपुले दीरापाशीं
चेंडुफली खेलता माज्या दीरा
माजी कांचोली कोनी नेली
भलीयांचे लेकी भावजये
जा पुस अपुले नंदेपाशीं
सुपली कुलकुल खेलते माजे नंदे
माजी कांचोली कोनी नेली
भलियांचे लेकी भावजये
जा पुस अपुले धन्यापाशीं
रातीं पलंगावर बसलें माज्या सोवी
माजी कांचोली कोनी वेली
तुजी होती निकली मंगल सुताची
मी नवी वलिन तुला पारव्या सुताची.

## अंगाई गीत

ये गो ये गो डोखरी[१] शेनाला जाव, शेनाला जाव
शेनाच मिस्स[२] चिंचा खाव, चिंचा खाव
चिंचानं दांत आमले, दांत आमले
आमले ते खजूर खाव, खजूर खाव
खजरानी लुगडी गादली, गादली
गादली तें धोब्या देव, धोब्या देव
धोब्या मला कमल दे, कमल दे
ती कमल आबा[३] उरवू, आबा उरवू
आबा मला पानीपावस दे, पानीपावस दे
ते गो पानी शेता घाळं, शेता घाळं
शेता मला कनीस दे, कनीस दे
ते गो कनीस घट्टे घाळू, घट्टे घालू
घट्टे मला चांदूल दे, चांदूल दे
ते गो चांदूल जाते घालू, जाते घालू
जाते मला पीठ दे, पीठं दे
ते गो पीठ थाली झेऊं, थाली झेऊं
त्या गो पीठाच्या रोट्या वळं रोट्या वळं
त्या गो रोट्या शिक्या ठेइल्या, शिक्या ठेइल्या
आये माज्या रोटया कुनी नेल्या, कुनी नेल्या.
त्या गो रोटया कुत्र्या खाल्या, कुत्र्या खाल्या
आये मंग कुत्रा खंय हाय, कुत्रा खंय हाय
तो गो कुत्रा हिरे[५] दपाला[६] हिरे दपाला
आये मंग हिरे खंय हाय, हिरे खंय हाय
ती गो हीर सुपा ढांकली, सुपा ढांकली
आये मंग सूप खंय हाय, सूप खंय हाय
ते गो सूप आगी जळलं, आगी जळलं
आये मंग आग खंय हाय, आग खंय हाय

---

१ म्हातारी. २ निमित्त. ३ आभा ळांत. ४ उडवूं. ५ विहिरींत. ६ लपला

ती गो आग पान्या इझली, पान्या इझली
आये मंग पानी खंय हाय, पानी खंय हाय
ते गो पानी घोऱ्या पिदेलं, घोऱ्या पिदेलं
आये मंग घोरा खंय हाय, घोरा खंय हाय
तो गो घोरा हाय उंचे नीचे डोंगराव
त्याचे मंगारे काय, मंगारे काय
त्याचे मंगारे धाकली नंदुली, नंदुली
तिचे वटींत काय, वटींत काय
तिचे वटींत पांच डालुंगी, डालुंगी
आये पांच डालुंगी कोला गो कोला गो
ती पांच डालुंगी धाकले दीराला, दीराला
धाकला दीर फनसाचा ईर
मोटा दीर आंब्याचा टाला.

☆ ☆ ☆

# महादेव कोळी समाज

[सोनकोळ्यांप्रमाणेंच कोळ्यांमध्यें ही एक पोटजात आहे. यांचें मूळ स्थान बालाघाट असून, १४ व्या शतकांत ते कोंकणांत गेले असावेत. पापेरा नांवाचा त्यांचा एक नाईक एका सिद्धाच्या आज्ञेनें जव्हारास येऊन राहिला व तेथील वारली राजावर स्वामित्व मिळवून जव्हार संस्थानाचा मूळ पुरुष झाला, असें सांगतात. याप्रमाणें यांच्यांत राजघराणें निर्माण झाल्यानें हे आपणांस राजकोळी असेंहि म्हणवितात. महादेव व मल्हारी मार्तंड व देवी हीं यांचीं दैवतें होत. कोळ्यांच्या सर्व पोट-जातींत विधवा-विवाह आणि घटस्फोट रूढ आहे. यांच्या जातपंचायती व ग्रामपंचायती असतात. —संपादक]

## लग्नांतील गाणीं

संग्राहिका : **श्री. सौ. अनसूया लिमये,** एम्. ए.

लग्नांत वऱ्हाडी मंडळी एकत्र जमली किंवा बैलगाडींतून निघाल म्हणजे अशीं गाणीं म्हणतात.

( १ ) मालण माती कंबविली[१]
माळीण बाईनीं सरसी केली[२]
आंत काय पेरिलीं दवण्याचीं रोपं
लाडका जांवई दवण्यांतून गेला
दवणा खुडुनी पगडी खोचिल्या
पगडी खोचुनी मंडपीं गेला
मंडपीं जाऊनी लग्नं लाविलीं
लग्नं लागलीं पुढल्या दारा
विघ्न टळलीं मागल्या दारा.

( २ ) माझ्या दारचा छऱ्या आतां बाई महुरी आला[३]
गोलीयाचा बळीयाचा बाळ शहाणा लंकेवर गेला
त्या लंकेवर जाऊन बाळानें काय आणिलं
त्या लंकेवर जाऊन बाळानं सोनं आणिलं
त्या सोन्याच्या घडवा बाईला बाळ्या बुगड्या
दिव्याच्या ज्योतिबाईच्या कानीं चढील्या
बलीयाच्या लेका माजी र बुगडी सांडली
चतुराच्या लेकी माझ्या ग पागा[४] गुंतल्या

( ३ ) नदींत ग टाकला जाळा
सापडला ग मगरमासा
तोही मासा सापडला
सोनंशिमग्याच्या दिवशीं
अंत्या बाळ जलमिला
सोन शिमग्याच्या दिवशीं
रखमाबाई जलमिली

१ पाण्यानं कालवली. २ सारखी केली. ३ मोहराला आला. ४ कासरी.

जलमिली ग माही पुनवला
पाटलाचा पोर शहाणा
मनीं विचार करीत होता बाई बावडी बांधाया
त्याही बावडीला तोडी[१]
तोडी कोणी बाय पुरविल्या
या ग नवरीच्या बापानं
यांनीं तोडी वाय पुरविल्या.

( ४ ) वाजंत्री वाजंत्री काळ्या मृदुंग
तो नाद तो नाद आकाशीं गेला
आकाशीं आकाशीं मामांची घरा
मामाई[२] मामाई पेरिलीं भाता
तीं भातं तीं भातं ओपलीं पन्नासा
तिकून आणल्या तिकून दारूच्या बाटल्या
वराडी वराडी दारू नाय पेती
कलौऱ्या[३] कलौऱ्या धवल्या[४] नाय घालती
मिराशी मिराशी[५] वाजा नाहीं करती.

( ५ ) डोंगरी नितळ नितळ ग शाह्रा पडे.
धरमाजी[६] निघाला सवारीला शिकारीला
त्यांच्या आईनीं धरीला ग पदराला
नको जाऊं रे सवारीला का शिकारीला ॥ १ ॥
डोंगरी नितळ नितळ ग शाही पडे
धरमाजी निघाला सवारीला शिकारीला
त्यांच्या बापानीं धरीला ग पदराला
नको जाऊं रे सवारीला का शिकारीला ॥ २ ॥
डोंगरी नितळ नितळ ग शाही पडे
धरमाजी निघाला सवारीला शिकारीला
यांच्या बहिणींनीं धरीला ग पदराला
नको जाऊं रे सवारीला का शिकारीला ॥ ३ ॥

---

१ चिरा. २ मामांनीं. ३ करवल्या. ४ धवले—लग्नाचीं गाणीं. ५ महार. ६ नवरमुलगा.

डोंगरी नितळ नितळ ग शार्ही पडे
धरमाजी निघाला सवारीला शिकारीला
त्यांच्या बायकोनीं धरीला ग पदराला
नको जाऊं रे सवारीला का शिकारीला
धर्माजी माघारीं परतीला ॥ ४ ॥

( ६ ) तासे वाजे बेंडबाजे जनकराजाच्या माऽडीवऽरी
जनकराजा तुझी कन्या कन्या कोणाला देऊं केली
कन्या धर्माला देऊं केली धर्मा नवरा झाला मोठा
शांता नवरी लहान लहान
शांताची आई बोले तिला खेळायाला कांहीं देऊं
सुपली देतें खेळायाला मोतीं देतें बाई घोळायाला.

नवऱ्यामुलाचं लेणं—

(७) चाफीयाची कळी सुरत सांवळी का उगवत पिवळी का गोविंदाची
गोविंदाच्या घरीं हिरवी शिंगी वाज का नवऱ्याला लेणं चढ हळदीचं
चाफीयाची कळी सुरत सावळी का उगवत पिवळी का गोविंदाची
गोविंदाच्या घरीं हिरवी शिंगी वाज का नवऱ्याला लेणं चढ मुंडावळीचं
चाफीयाची कळी सुरत सावळी का उगवत पिवळी का गोविंदाची
गोविंदाच्या घरीं हिरवी शिंगी वाज का नवऱ्याला लेणं चढ कुंकवाचं.

( ८ ) चंदनाचा पाट मामानीं ताशीला
इथं बस रे भाच्या बाळा बाशिंग बांधूं
चंदनाचा पाट मामांनीं ताशीला
इथं बस रे भाच्या बाळा मुंडवळ बांधूं
चंदनाचा पाट मामांनीं ताशीला
इथं बस रे भाच्या बाळा काकण बांधूं
चंदनाचा पाट मामांनीं ताशीला
इथं बस रे भाच्या बाळा चंदन[1] बांधूं.

( ९ ) नवरदेव लग्नाला जातो त्या वेळीं म्हणावयाचें—
गांवाच्या खालतीं लाविल्या चिंचा का बोरी
वाजंत्री वाजे वेळोवेळीं

१ चंदनाची मुंडावळ पवित्र समजतात.

वाजंत्र्याच्या नादानी आले गांवदेव[१]
चारी कां विघ्न टाळोनी
त्यांही कां विघ्नावरी बाळ का देई पाई
बाळ का लग्नाला जाई.

(१०) तळ्यांतल्या ग कापूरवेळी तुह्या तोडील्या तारा
गांवदेवाला बोलावण करा लग्न लावायला चला
लग्न लावती सुदळ[२] होती बामण मंगळ बोलती
तळ्यांतल्या ग कापूरवेळी तुह्या तोडील्या तारा
मारवतीला बोलवण करा लग्न लावायला चला.
( त्याप्रमाणें सर्व देवांचीं नांवें घालणें )

## गौरीचा सण

सणाचे वेळीं स्त्रिया नृत्य करून म्हणतात—

( १ ) गांधीराजा जर्मन राजाची लढाई लागली
गांधी बोल माझ लोक लोक ग काळे लोडकु
जर्मन बोले माझे लोकु ग गोरे लोडकु
बिजलीच्या बत्त्या आणुनी सेना तपासली
बाराच्या मोटरीला ग सेना भरली
आतां पडल्या गांधीराजाच्या हाताला बेड्या
गांधी नेला गांधीच्या डोळ्याला चष्मा लाविली

( चाल बदलून—— ) गांधी राजानं संप केला
साड्या चोळ्या या बंद केल्या
साधीं पातळं चालु केलीं
जर्मन राजानं संप केला
चांदी सोनं हें बंद केलं
तांबं पितळ हें चालु केलं.

( २ ) ये बाय गोपाळपुरामधीं बावडी फुटते ग दह्याची
बावडी फुटते ग दह्याची मिठी पडली ग संताची

---

१ वेशीपासचे देव–खंडेराव, बहिरोबा, पांढरी, चव्हाटा. २ सावध.

ये वाय सगळे देव आले इट्ठल देऊ ते कुठें गेले ?
इट्ठलदेऊ ते कुठें गेले गेले नगरी ग धुंडाया.

( ३ ) गावला तुळशीचा माडा
लावला भागीवंताच्या दारीं
भागीवंताची लेक मोठी शहाणी
घाली तुळशीला ग पाणी
तुळसे कोण्या स्त्रीला पाया
त्याला हरिनामाचा साया
तुळशे कोण्या वाहीला गंध
त्याला हरिनामाचा छंद
तुळशे कोण्या वाहील कुंकु
त्याला जलमोजलमींचं सुखु
तुळशे कोण्या वाहिलं फूल
त्याला जलमोजलमीचं मूल.

## गणपति जन्माची कथा

महादेव गेलेत गेलेत वनवासाला महादेव
पार्वती एकली एकली ग घरासी पार्वती
पार्वती बैसली बैसली ग न्हायाला पार्वती
तिनं अंगीचा अंगीचा मळ काढीला अंगीचा मळ
त्याचा बनीवला बनीवला देवगणराजा
नेऊन ठेवीला ठेवीला भिंतीजवळीं
महादेव आलेत आलेत वनवासाहुनी
पार्वती बाळ ग बाळ ग हे कोणाचा
मीत बैसलें बैसलें रे न्हायाला
म्यां त अंगीचा अंगीचा मळ काढीला
त्याचा बनीवला बनीवला देवगणराजा
काढली कंबर कंबऱ्याची सुरी
ठेवली बाळच्या बाळच्या मानेवरी
धड ग काय धरणीला धरणीला पाडला

शिर काय शिर काय आकाशीं उडाला
शिर काय आकाशीं ग आकाशीं ग डुलतो
बाळ काय देवासी देवासी ग बोलतो
ढोल्याचा ढोल वाजे देशावरी वो देशावरी
ढोल्या मी देतें तुझ्या संग तुझ्या संग
नको रे येऊं माझ्या संग र माझ्या संग
घराची अस्तुरी राग भर रे राग भर रे.

☆ ☆ ☆

# कांहीं कथा

## १. राजकन्येची गोष्ट

एक राजा होता. त्याला सात मुली होत्या. त्या लग्नाला झाल्या. राजाची लग्नाची खटपट सुरू झाली. त्या सात मुली म्हणाल्या, " आम्ही एकच नवरा करणार. " राजाला चिंता पडली. एकदां त्या सात मुली अरण्यांत फिरायला गेल्या. एका झाडाखालीं गप्पा मारीत बसल्या. तिकडून दुसऱ्या नगरीच्या राजाचा मुलगा शिकारीला आला. मुलींना पाहून तो झाडाआड लपला व त्यांचे शब्द ऐकूं लागला. त्यांचे लग्नाचेच विचार चालू होते. पहिली म्हणाली, " मी लग्न करीन तर माझ्या लग्नांत एक पत्रावळ लावीन. त्यावर सगळीं माणसें जेवतील. " दुसरी म्हणाली, " मी लग्न करीन तर एक हंडा पाणी आणीन. त्यांत सर्व मंडळी पाणी पितील." तिसरी म्हणाली, " मी लग्न करीन तर एक सुपारी फोडीन. तीं सर्वजण खातील. " असें एकेकजणी म्हणूं लागल्या. सर्वांत धाकटी म्हणाली, " मी लग्न करीन तर माझा आणि माझ्या नवऱ्याचा एकदां विचार झाला कीं, मी १०० मुलगे एकागळ मुलगी देईन. "

राजपुत्रानें तें सर्व ऐकलें. त्यानें मनांत घेतलें, या साती मुलींशीं मी लग्न करीन. त्याला शिकार सुचेना. तो घरीं गेला. गादीवर लोळूं लागला. राजानं विचारलं, "तुला काय झालं ?" तो म्हणाला, "मला सात राजकन्यांशीं लगीन करायचं. " राजा चिंता करूं लागला. याला सात मुली कोण देणार ?

पण राजपुत्र म्हणाला, "त्याची काळजी नको. माझी चिठ्ठी घ्या आणि सांगतों तिकडे जा." राजा त्याची चिठ्ठी घेऊन मुलींच्या वडिलांकडे गेला. आदर-सत्कार झाला. पानतंबाखू झालं. राजा म्हणाला "कां येणं केलं ?" मुलाच्या वडलांनीं सांगितलं, "मुलाचं लग्न करायचं आहे. मुलगी पाहायला आलों." राजानं एकेका मुलीला बाहेर बोलावलं. सात मुली दाखवल्या व म्हणाला, "यांतली कोणती पाहिजे ?" हा राजा म्हणाला, "माझ्या मुलाला सातहि करून घ्यायच्या आहेत." राजाला नवल वाटलं. त्यानें दासीच्या हातीं आंत चिठ्ठी पाठवली. दासीनें ती सर्वांना दाखवली. सर्वांचा विचार झाला. मुलींनीं सांगितलें, "आम्ही सर्व तयार आहोंत." झालं. सगळी तयारी झाली. राजपुत्राचें लग्न सात राजकन्यांशीं लागलें.

राजपुत्रानें सात बायकांना घरीं आणलं. सात खोल्यांत सात जणींना ठेवलं. तो पहिलीच्या खोलींत गेला. त्यानं विचारलं, "त्या दिवशीं तूं म्हणालीस एका पत्रावळींत सर्व जेवतील त्याचं काय ?" मुलीला कांहीं सांगतां येईना. सहा मुलींना त्यानें त्यांच्या बोलण्याचा अर्थ विचारला. सहा मुलींना कांहीं सांगता आलं नाहीं. सातव्या मुलीच्या खोलींत गेला. ती म्हणाली, "मी बोलल्याप्रमाणें करीन." राजपुत्रानें सहा बायकांना लांब महाल बांधून त्यांत ठेवलं व सातव्या बायकोला घेऊन तो राहूं लागला. दिसमास गेले. बायकोला दिवस राहिले. नऊ मास नऊ दिवस पुरे झाले. इकडे या सहा बायका जळूं लागल्या. त्यांनीं सुईणीला सांगितलें, "तुला पन्नास रुपये देतात तर आम्ही शंभर रुपये देऊं. पण या राणीला एक होऊं दे, दोन होऊं दे, कुत्रें होऊं दे तूं तें मारून टाकायचं." तिनं कबूल केलं. राणीला कळा येऊं लागल्या. सुईण गेली व म्हणाली, "मी बाळंतपण करतें. पण बाळंतिणीचे डोळे बांधून करतें. तिनें तिचे डोळे बांधले. राणीला एकामागून एकसारखे शंभर मुलगे झाले व शेवटीं एक गोजिरवाणी मुलगी झाली. सुईणीनें तीं मुलें घेतलीं आणि लांब एका झाडाखालीं खड्डा खणला आणि त्यांत पुरून टाकलीं. ती मुलगी पण आंत घातली आणि वर वीट ठेवली आणि तिनें साऱ्यांना सांगितलें, "राणीला वीट झाली." राणीला वीट झाली. ही बातमी साऱ्या देशभर पसरली. राजपुत्र आला. त्याला राग आला. त्यानें दासींना सांगितलें कीं, "राणीला जिकडे लोक संडासाला जातात तिकडे टाकून द्या."

इकडे एक कुंभार रानांतून जात असतां ती वीट पाहून वीट उचलायला आला. ती वीट उचलली तर त्याला तीं मुलें आढळलीं. त्यानें तीं मुलें झोळींत घेतलीं. त्याला वाटलं आपल्याला मूल नाहीं हीं मुलं आपण संभाळावीं. त्यानं तीं संभाळलीं. मुलं हळूहळू मोठीं होऊं लागलीं. एकेक रांगूं लागलं. एकेक चालूं लागलं.

इकडे सहा राण्यांनीं शोध केला. मुलं नेऊन टाकलीं तीं खरीं मेलीं का? त्यांना पत्ता लागला कीं, कुंभाराच्या घरीं शंभर मुलं व एक मुलगी आहे. आपल्या महालांतल्या झरोक्यांत बसून त्या सारें पाहात होत्या. त्यांनीं नोकरांना सांगितलं कीं, " कुंभारकुंभारणींना सुळावर द्या. तुम्हांला हजार रुपये देऊं. " नोकरांनीं कुंभारकुंभारणींना फाशीं दिलं. मुलं रानांत एकटीं पडलीं. त्यांना उपास होऊं लागला. रानांतलीं कंदमुळं फळं खाऊन तीं राहूं लागलीं. तेवढ्यांत माळी रानांत लाकडं नेण्यास आला. त्यानं तीं मुलं पाहिलीं. त्याला नवल वाटलं. त्याला मूल नव्हतं. त्यानं आनंदानं तीं मुलं घरीं नेलीं. माळी-माळीण त्या मुलांचा सांभाळ करूं लागलीं. पुन्हां ती बातमी राण्यांच्या कानांवर गेली. त्यांनीं हुकूम सोडला नोकरांना," तुम्हांला हजार रुपये देऊं, त्या माळी-माळणीला सुळावर द्या. " नोकरांनीं माळ्यांना सुळावर दिलं. मुलं पुन्हां वाऱ्यावर पडलीं. भटकूं लागलीं. " खायला पोटाला द्या," अशी भिक्षा मागूं लागलीं. मुलगी शहाणी होती. ती भावांचा संभाळ करूं लागली. इकडे राण्यांनीं आपला जोशी बोलावला. त्याला विचारलं, " अशीं अशीं शंभर मुलं आणखी एक मुलगी कुठं आहेत तीं शोधा आणि त्या मुलांना मारा. तुला हजार रुपये देऊं." तो जोशी गेला. त्यानं मुलांचा शोध लावला. मुलं डोंगरावर राहात होतीं. भिक्षा मागून राहात होतीं. जोशानें एका हलवायाला ईख आणून दिलं. " एका लाडूचे शंभर रुपये देईन पण शंभर आणि एक लाडू ईख घालून तयार करा." म्हणून सांगितलें. हलवायानें लाडू केले ते जोशानें मुलांना भिक्षा म्हणून वाटले. मुलगी भावांना म्हणाली, " आपण आधीं आंघोळ करूं तळ्यावर, मग लाडू खाऊं." मुलं आंघोळीला गेलीं. त्यांनीं आंघोळ केली. मग दुसरं कांहीं खायला नव्हतं. लाडू खायच्या बेतांत ते होते. इतक्यांत तिकडून एक कुत्रं आलं. त्याला भूक लागली होती. मुलीला दया आली. ती भावांना म्हणाली, " तुमच्या वांट्याचा लाडू मी त्याला घालीत नाहीं. पण माझ्या वांटणीचा लाडू मी

त्याला घालतें." तिनें आपला लाडू त्याला घातला. कुत्र्यानें तो खाल्ला व लागलीच कुत्रं मेलं. बहिणीला संशय आला. बहिणीनें भावांना सांगितलं, "भावांनो, या लाडूंत ईख आहे. तुम्ही लाडू खाऊं नका. उपासानें कांहीं तुम्ही मरणार नाहीं." त्यांनीं लाडू टाकून दिले. पुन्हां डोंगरावर तीं गेलीं. बहीण रोज रात्रीं जागून पहारा करी. भाऊ झोपत व बहीण सारी रात्र जागून काढी. अशा स्थितींत दोन महिने गेले. तेवढ्यांत तो जोशी तीनदां येऊन गेला. तो विचारी, "कोण जागं आहे का?" बहीण म्हणे, "एक मैना जागी आहे, बाकी सारे झोपले आहेत." तो बिचारा परत जाई. पण शेवटीं दोन महिने जागरूक राहून ती मुलगी दमली. एक दिवस तिनें भावांना सांगितलें, "बाळांनो, आज मी झोपतें, तुम्ही जागे राहा." सगळ्यांत धाकट्या रांगत्या मुलाच्या पायाला व आपल्या पायाला तिनें एक दोरी बांधली. तीं मुलं बराच वेळ जागीं राहिलीं. पण अखेर कंटाळून झोपलीं. मुलीला तर काळाची झोप लागली होती. तो जोशी वर गेला. त्यानं विचारलं, "आज जागं कोण आहे?" मुलं झोपलीं होतीं. रांगतं मूल कांहीं बोलूं शकत नव्हतं. जोशी उमजला. तो वर आला. त्यानं आपला मंत्र जपला. व त्या मुलांना राघू करून उडवून लावलं. ती मुलगी जागी झाली. तिनं पाहिलं, आपले भाऊ नाहींत. एक लहान भाऊ तेवढा पायाला दोरी बांधलेला रांगतो आहे. मुलगी घाबरली. ती रडूं लागली. खूप वेळ रडली. डोळे मुठीसारखे सुजले.

इकडे एका दुसऱ्या नगरींतला राजा तिकडे शिकारीला आला. त्यानं ती मुलगी व तो बाळ पाहिला. राजानें त्या मुलाला मांडीवर घेतलं. मुलीला त्यानं विचारलं, "तूं कां रडतेस?" तिनं सारी हकीकत सांगितली. आपले भाऊ कुठं गेले ते शोधायला पाहिजे म्हणाली. राजाच्या तोंडांत लाळ फिरली. राजा म्हणाला, "तूं माझी बायको होशील तर मी तुझे भाऊ शोधून देईन." बहिणीन कबूल केलं. राजानं मुलीला व तिच्या भावाला घरीं नेलं. त्या मुलीशीं लग्न लावलं. नंतर त्यानं मुलांचा शोध लावायला जोशाला बोलावलं. जोशाला विचारलं, "या मुलीचे शंभर भाऊ होते त्यांतला एकच आहे. बाकी कुठं गेले?" जोशानं सांगितलं, "त्यांचे राघू झाले आहेत." राजाला नवल वाटलं. त्यानं ओळखलं. जोशी सांगतो त्यानंच हें काम केलं

असावं. त्यानं खडसून विचारलं, " खरं सांग, नाहींतर फांशीं देईन. " जोशानं कबूल केलं. राजा म्हणाला, " तुलाच ती विद्या माहीत आहे. तूं त्यांना परत मुलांचं रूप दे." जोशी डोंगरावर गेला. त्यानं राघूंना बोलावलं. मंत्र जपला. मुलं पुन्हां पाहिल्या रूपांत आलीं. त्यांना घेऊन जोशी राजाकडे गेला. राजाजवळ माणसं जमलीं. राजानं शेजारच्या नगरीच्या राजाला "लढाईला फलाण्या जागीं ये " म्हणून निरोप पाठवला. इकडे या मुलांचा बाप राजा त्याला हा निरोप मिळाला. त्याला वाटलं, आपली धड ना एक बायको घरीं, धड ना मुलं! कसं लढाईला जावं? त्यानं दासीला बोलावून सांगितलं, " सातव्या राणीला टाकलं होतं तिचं काय झालं पाहा. " त्याला वाटलं, या सहा राण्यांनीं काय केलं, सातव्या राणीला काय झालं, आपण कांहीं चौकशी केली नाहीं. दासीनें राणीचा तपास केला. राणी त्याच ठिकाणीं न जेवतां न खातां तशी जिवंत पडली होती. तिला राजाकडं आणलं. राजानं लढाईची तयारी केली. राणीला पण बरोबर घेतलं. राजा त्या जागीं गेला. तिकडून तो राजा आपल्याकडील शंभर मुलं घेऊन सामोरा आला. इकडे चमत्कार झाला. राणीच्या थानांतून दुधाच्या धारा उडून त्या त्या मुलांच्या तोंडांत पडूं लागल्या. सर्वांना नवल वाटलें. राजानं दुसऱ्या राजाला हीं मुलं कोण विचारलं. राजानं सारी हकीकत सांगितली. राजानं तपास लावला. सहा राण्यांचं सारं कपट उघडकीला आलं. सहा राण्यांचे नाक कान कापून राजानें त्यांना हाकून लावलं. लढाई मिटली. या राणीला व मुलांना घेऊन राजा नगरीला गेला. राजा सुखानं राज्य करूं लागला. त्याचं राज्य सुखाचें झालें तसें तें तुम्ही पण करा.

## २. नागराजाची गोष्ट

फार फार वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. एका गांवांत एक मोळीविक्या होता. घरची अत्यंत गरिबी. रोज बिचारा रानांत जाऊन दिवसभर कष्ट करून लाकडें जमवी व ती मोळी विकण्यास नेई. पण रोज कितीहि कष्ट करून मोळी जमविली तरी त्याला ४ पैशांवर जास्त पैसे कधीहि मिळत नसत. त्यामुळें घरची गरिबी, मुलांबाळांचें दैन्य, हा त्या मोळीविक्यापुढचा एक न सुटलेला प्रश्न होता.

एक दिवस काय झालं. मोळीविक्या रोजच्याप्रमाणें कुऱ्हाड घेऊन

रानांत लाकडें गोळा करण्यासाठीं गेला. लाकडें गोळा करतां करतां दमल्यामुळें तो कुऱ्हाड झाडाखालीं ठेवून तिथंच झोंपला. मोळीविक्याला गाढ झोंप लागली. वर सूर्यनारायण प्रखर तेजानें तळपत होता. त्याचे प्रखर किरण मोळीविक्याच्या तोंडावर पडत होते. हें पाहून झाडाखालीं भुयारांत राहणारा नागराज बाहेर आला व फडा मोळीविक्याच्या तोंडावर धरून तो तिथं उभा राहिला. झोंप पूर्ण झाल्यावर मोळीविक्या जागा झाला. उठून बसल्यावर पाहतो तों आपल्या शेजारीं एक मोठा नाग फडा करून उभा आहे. तें दृश्य पाहून मोळीविक्या घाबरला. यानें कदाचित् आपल्याला दंश केला असता तर आपण मेलों असतों असा विचार मनांत येऊन मोळीविक्या लगबगीनें उठला व लाकडें गोळा करून त्यानें शेकोटी तयार केली. तें पाहून नागराजानें तूं शेकोटी कशासाठीं तयार केलीस, असा मोळीविक्यास प्रश्न केला. तेव्हां तूं मला ठार मारलं असतंस किंवा मारशील म्हणून मी तुला शेकोटींत टाकून ठार मारणार आहें, असें मोळीविक्यानें त्याला उत्तर दिलें. तेव्हां नागराजानें मोळीविक्याला सांगितलें कीं, मी तुला दंश करून मुळींच ठार मारणार नाहीं. तूं माझ्याबद्दल तुझ्या मनांत मुळींच भीति बाळगूं नको. उलट माझी अशी इच्छा आहे कीं, तूं मला तुझ्या घरीं न्यावेंस म्हणजे तुझा उत्कर्ष होईल. नागराजाचें हें सांगणें ऐकून मोळीविक्याची भीति कमी झाली व तो नागराजाला घेऊन घरीं आला. घरीं आल्यावर त्यानें नागराजासाठीं एक पिंजरा तयार केला व त्यांत त्याला व्यवस्थित ठेवून दिलें.

पुढें काय झालं ? नागराजाला घरीं आणल्यानंतर दुसऱ्या दिवसापासून मोळीविक्या मोळीसाठीं पुन्हां रानांत जाऊं लागला. नि आश्चर्याची गोष्ट म्हणजे मोळी विकून पूर्वी त्याला रोज जे ४ पैसेच मिळत असत त्याऐवजीं आतां त्याला रोज एकेक पैसा जादा मिळूं लागला. पण आपल्याला जादा मिळणारे पैसे ही केवळ नागराजाचीच कृपा आहे या गोष्टीची मोळीविक्याला पूर्ण जाणीव होती. म्हणून आपली पूर्वीची परिस्थिति न विसरतां मोळीविक्या ४ पैशांतच आपला निर्वाह करून उरलेल्या जादा पैशांचें नागराजाला दूध घालूं लागला, पण पुढें पुढें जास्त मिळूं लागलेले पैसे सांठवून मोळीविक्यानें एक गाय विकत घेतली. गाय विकत घेतल्यावर रोज तिचें दूध काढून तें मोळीविक्या नागराजाला घालूं लागला.

एक दिवस काय झालं ? मोळीविक्याला देवळांत कथा ऐकावयाला जायचं होतं. म्हणून तो घाईघाईनें नागराजाला दूध न घालतांच कथा ऐकावयाला देवळांत गेला व कथा ऐकून रानांत मोळी जमविण्यासाठीं गेला. इकडे मोळीविक्याच्या बायकोनें काय केलं ? आपल्या नवऱ्यानें आज नागराजाला दूध घातलें नाहीं ही गोष्ट तिच्या लक्षांत येतांच तिनें गाईचें दूध काढलं व चुलीवर तापत ठेवलं आणि तापलेलं दूध थंड करतांच तिनें तें घाईघाईनें नागराजासाठीं त्याच्या पिंजऱ्यांत ओतलं. अर्थात् दूध फार गरम असल्यामुळें नागराजानें जोराचा फूत्कार केला व तो पिंजऱ्यांत मरून पडला. संध्याकाळीं रानांतून मोळीविक्या घरीं आला व बायकोला तूं आज नागराजाला दूध घातलेंस का, म्हणून विचारूं लागला. तेव्हां तिनें एकंदर घडलेली हकीकत नवऱ्याला सांगितली. ती ऐकून मोळीविक्या फार रागावला बायकोवर. ती गोष्ट ऐकून त्याला फार दुःख झालं. तो पिंजऱ्यांत नागराजाला पाहण्यासाठीं गेला नी काय आश्चर्य ! पिंजऱ्यांत नागराजाऐवजीं त्याला नवरत्नांचा हार पाहण्यास मिळाला. त्याला नागराजाच्या मृत्यूचें नी त्याचं नवरत्नांच्या हारांत रूपांतर झालं तें पाहून फार दु:ख नी आश्चर्य वाटलं; पण झाल्या गोष्टीला इलाज नव्हता कांहीं ! मोळीविक्याची गरिबी ही जगजाहीर गोष्ट होती. तेव्हां त्यानें आपल्या बायकोला सूचना देऊन ठेवली कीं, तुला हार घालायचा असला तर घरांतच घाल. हार घालून कुठें बाहेर जाऊं नको. पण नवऱ्यानें जरी अशी सूचना देऊन ठेवली असली तरी स्त्रीस्वभावधर्मानुसार नवऱ्याची सूचना धाब्यावर बसवून मोळी-विक्याची बायको एक दिवस नवरत्नांचा हार घालून प्रधानाच्या बायको-कडे गोष्टी बोलत बसण्यासाठीं गेली. बराच वेळ दोघींच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. प्रधान घरीं यायची वेळ झाली; तशी मोळी-विक्याची बायको गडबडीनें निघाली. गडबडीनें उठतां उठतां मोळी-विक्याच्या बायकोचा पदर ढळला व तिच्या गळ्यांतील नवरत्नांचा हार प्रधानाच्या बायकोच्या दृष्टीस पडला. प्रधानाची बायको तो नवरत्नांचा हार मोळीविक्याच्या बायकोच्या गळ्यांत पाहून आश्चर्यानें अगदीं थक्कच झाली. तिच्या मनांत विचार आला, मी एवढी प्रधानाची बायको असून माझ्या गळ्यांत ४ रत्नांचा सुद्धां हार नाहीं, नी या गरीब मोळीविक्याच्या बायकोच्या गळ्यांत मात्र नवरत्नांचा हार ! मोळीविक्याची बायको आपल्या

घरीं निघून गेल्यावर प्रधानाची बायको रडत बसली. तितक्यांत प्रधान घरीं आला. आपल्या बायकोला रडतांना पाहून त्यानें तिला, तुला कुणीं बोटानें दापिलें काय किंवा डोळ्यानें दापिलें काय, अशी चौकशी केली. तिनें रडत रडत सारी घडलेली हकीकत नवऱ्याला सांगितली, कीं मी एवढी तुमच्या-सारख्या प्रधानाची बायको असून माझ्या गळ्यांत चाररत्नांचा सुद्धां हार असूं नये, नी त्या गरीब मोळीविक्याच्या बायकोच्या गळ्यांत मात्र तेवढा नवरत्नांचा हार असावा, ही गोष्ट तुम्हांला किती लाजिरवाणी आहे, असें सांगितलें. बायकोकडून ती गोष्ट ऐकल्याबरोबर साहजिकच प्रधानालाहि आपल्या बायकोला आपण एवढे प्रधान असूनहि नवरत्नांचा हार असूं नये नी अत्यंत गरीब अशा मोळीविक्याच्या बायकोला मात्र नवरत्नांचा हार असावा, या गोष्टीचा खूप राग आला. त्यानें लगेच मोळीविक्याला बोलावणें पाठविलें नी बायकोची समजूत घातली. प्रधानाचें बोलावणें आलेलें पाहून मोळीविक्या फार घाबरला नी घाईघाईनें प्रधानाच्या नोकराबरोबर निघून आला. मोळीविक्या आलेला पाहून प्रधानानें त्याला बसायला सांगितलें. नी नवरत्नांच्या हाराची माहिती विचारली. मोळीविक्यानें नागराजाची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकल्यावर प्रधानानें खूपसें द्रव्य देऊन तो नव-रत्नांचा हार मोळीविक्याकडून आपल्यासाठीं विकत घेतला. प्रधानाच्या बायकोनें तो लगेच आपल्या गळ्यांत घातला. प्रधानानें आपल्या बायकोला सूचना देऊन ठेवली, हार घालून कुठं बाहेर जाऊं नको. पण तिनंहि स्त्रीस्वभावानुसार मोळीविक्याच्या बायकोसारखंच केलं. एक दिवस ती हार घालून राजाच्या बायकोकडे बसायला गेली. दोघींच्या इकडच्या तिकडच्या खूप गप्पा झाल्या. राजाची घरीं यायची वेळ झाली तशी प्रधानाची बायको आपल्या घरीं जायला निघाली. घाईघाईनें उठतां उठतां तिचा पदर ढळला, नी त्याबरोबर प्रधानाच्या बायकोच्या गळ्यांतील नवरत्नांचा हार राजाच्या बायकोच्या दृष्टीस पडला. तिला नवलं वाटलं. मी एवढी राजाची बायको असून माझ्या गळ्यांत ४ रत्नांचाहि हार असूं नये नी प्रधानाच्या बायकोच्या गळ्यांत मात्र नवरत्नांचा हार असावा! तिला या गोष्टीचं खूप वाईट वाटलं. ती रडत बसली. थोड्या वेळानें राजा आला. राणीला रडतांना पाहून त्याला खूप नवल वाटलं. तुला कुणीं बोटानें दापिलें काय किंवा डोळ्यानें दापिलें काय, असें राजानें राणीला विचारलें. राणीनें सर्व हकीकत

सांगितली व मी एवढी राजाची राणी असून माझ्या गळ्यांत ४ रत्नांचाहि हार असूं नये नी प्रधानाच्या बायकोच्या गळ्यांत मात्र ९ रत्नांचा हार असावा ही गोष्ट तुम्हांला किती लाजिरवाणी आहे असें सांगितलें. राजालाहि या गोष्टीचा खूप राग आला. त्यानें लगेच प्रधानाला बोलावणें पाठविलें. प्रधान घाईघाईनें राजाच्या भेटीसाठीं आला. राजानें नवरत्नांच्या हाराविषयीं चौकशी केली. प्रधानानें सारी हकीकत सांगितली. राजानें लगेच मोळी-विक्याला बोलावणें पाठविलें. मोळीविक्यानें सारी हकीकत सांगितली. राजानें प्रधानाला व मोळीविक्याला खूपसें द्रव्य देऊन तो नवरत्नांचा हार घेतला.

राजा–राणीला मूलबाळ नव्हतं. राणीला तो हार पाहून खूप आनंद झाला. तिनें तो गळ्यांत घातला. दुसरे दिवशीं आंघोळीला जातांना राणीनें तो नवरत्नांचा हार पलंगावर ठेवला व ती आंघोळीसाठीं निघून गेली. इकडे पलंगावर ठेवलेल्या नवरत्नांच्या हाराचं एक लहान मूल होऊन पलंगावर रडूं लागलं. लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकून साऱ्या दासी धांवत राणीच्या महालांत आल्या. पाहतात तों पलंगांवर एक सुंदर मूल रडत आहे. त्यांनीं लगेच ती बातमी राजाराणीला सांगितली. व राजाला राणीला खूप आनंद झाला. राजाला मुलगा झाला म्हणून गांवांत दवंडी पिटण्यांत आली व साऱ्या गांवाला साखर वांटण्यांत आली. दिवसामासानें तो मुलगा मोठा होऊं लागला. तो मोठा झाल्यावर राजानें त्याला निरनिराळ्या विद्या शिकविल्या. हळूहळू राजपुत्र तारुण्यांत आला. राजा ज्या कलावंतिणीकडे जात असे. तिच्याच मुलीकडे राजपुत्रहि जाऊं लागला. इकडे राजानें दुसऱ्या राजाच्या मुलीशीं राजपुत्राचें लग्न ठरविलें. राजपुत्राचें लग्न झालेलें पाहून कलावंतिणीच्या मुलीला खूप दुःख झालें. एकदां राजपुत्राची बायको आंघो-ळीला नदीवर जात असतां कलावंतिणीच्या मुलीनें तिला आपल्याकडे बोला-वून घेतलें. दोघींच्या इकडच्या तिकडच्या खूप गप्पा झाल्या. राजपुत्राची बायको जायला निघाली तसं कलावंतिणीच्या मुलीनें तिला नवऱ्याचें नांव घ्यायला सांगितलें. पण राजपुत्राच्या बायकोला नवऱ्याचें नांव माहीत नव्हतें. तिनें मला नांव माहीत नाहीं म्हणून सांगितलें. तेव्हां कलावंतिणीची मुलगी हंसायला लागली. राजपुत्राच्या बायकोला खूप वाईट वाटलें. मी उद्यां नांव विचारून घेईन व तुझ्याकडे येईन असें तिनें कलावंतिणीला सांगितलें व ती

घरीं आली. घरीं आल्यावर तिनें रात्रीं नवऱ्याला तुमचं नांव काय म्हणून विचारलं. राजपुत्रानें मी नांव सांगणार नाहीं. मीं नांव सांगितलं तर मी राजपुत्र राहणार नाहीं व मग तुला वाईट वाटेल, तेव्हां माझं नांव विचारूं नको म्हणून सांगितलं. पण राजपुत्राची बायको ऐकेना. ती हट्टच धरून बसली. तेव्हां राजपुत्राचा नाइलाज झाला, व त्याला आपलं नांव नागराज आहे हें सांगावं लागलं. पण त्यानें नांव सांगतांच लगेच राजपुत्राचं पुन्हां नागराजांत रूपांतर झालं व तो सरपटत खोलीबाहेर निघून गेला.

इकडे नागराजा गेला त्या वेळीं त्याची बायको गरोदर होती. नऊ महिने भरतांच ती बाळंत झाली व तिला मुलगा झाला. आपला राजपुत्र पुन्हां नागराज होऊन निघून गेला याला आपली सूनच कारण आहे ही गोष्ट माहीत झाल्यापासून राजा-राणी तिचा राग करीत. पण नातू झाल्या-नंतर त्यांचा राग कमी झाला. पण आपण नांव विचारल्यामुळें आपला नवरा पुन्हां नागराज झाला व निघून गेला याचं राजपुत्राच्या बायकोला अत्यंत दुःख झालं. ती नेहमीं दुःखी, कष्टी असे. तेव्हां राजानं सुनेला तूं अशी दुःखी कष्टी राहूं नको म्हणून सांगितलं. ती म्हणाली कीं, माझं दुःख नाहींसं व्हावं असं जर तुम्हांला वाटत असेल तर तुम्ही एक अन्नछत्र सुरू करा व कुणाहि येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूला जेवण घालावं. राजानं सुनेच्या म्हणण्याप्रमाणें अन्नछत्र सुरू केलं.

राजपुत्राचं पुन्हां नागराजांत रूपांतर झाल्यावर तो सरपटत लांब अरण्यांत गेला व एका आंब्याच्या झाडाखालीं मोठं वारूळ होतं त्यांत राहूं लागला. त्या रानांत पुष्कळ वाघ-सिंह वगैरे हिंस्र प्राणी होते. रोज संध्या-काळीं दिवस मावळतांना एक काळी कपिला गाय त्या रानांत यायची व नागराजाच्या वारुळांत जाऊन त्याला दूध द्यायची. एके दिवशीं खूप लांबचा एक वाटसरू राजाच्या सुनेनें सुरू केलेल्या अन्नछत्राची माहिती ऐकून तिकडे जाण्यासाठीं निघाला. पण वाटेंतच या रानांत त्याला संध्याकाळ झाली. पुढें दाट जंगल असल्यामुळें इथंच वस्ती करावी व सकाळीं पुढं जावं असा विचार केला, व तिथंच त्या आंब्याच्या झाडाखालीं बसला. इतक्यांत नेहमींप्रमाणं ती काळी कपिला गाय नागराजाला दूध देण्यासाठीं तिथं आली. तिनें त्या वाटसरूला पाहिल्यावर, या रानांत वाघ–सिंह असल्यामुळें तूं इथं रात्रीं राहूं नको, असें सांगितलं. तेव्हां वाटसरू म्हणाला, तूं जाशील

तिकडे मी तुझ्या शेपटीला धरून येतों. त्याप्रमाणें कपिलेच्या शेपटीला धरून तो नागराजाच्या वारुळांत गेला. वारुळांत गेल्यावर कापिलेनें त्याला रोजच्याप्रमाणें दूध दिलें. दूध पिऊन झाल्यावर नागराजानें तिथं असलेल्या समईला विचारलें—समई, समई, माझें बाळ काय करतें ? समई म्हणाली—बाळ रांगतंय. पुन्हां विचारलें—माझी बायको काय करते ? समई म्हणाली, तुझी बायको सगळ्या लोकांना अन्नछत्र घालते आहे. एवढं झाल्यावर कपिला गाय पुन्हां वर आली तेव्हां तिच्या शेपटीला धरून वाटसरूहि वर आला, व पुढें अन्नछत्राकडे चालूं लागला.

वाटसरू अन्नछत्रांत पोहोंचला. हातपाय धुऊन तो जेवायला बसला. जेवण झाल्यावर राजपुत्राच्या बायकोनें त्याला, तुम्ही विशेष काय पाहिलं वाटेंतून येतांना, म्हणून विचारलं. तेव्हां वाटसरूनें रानांत आंब्याच्या झाडाखालीं वारुळांत घडलेली सारी हकीकत सांगितली. ती ऐकून राजपुत्राची बायको समजली कीं, नागराज म्हणजे आपला पतीच होय. नंतर ती सासुसासऱ्याला सांगून मुलाला बरोबर घेऊन त्या वाटसरूबरोबर रानांत जायला निघाली. रानांत त्या आंब्याच्या झाडाखालीं आल्यावर तिनें वाटसरूला जायला सांगितलें व आपण मुलाला घेऊन झाडाखालीं बसली. इकडे संध्याकाळ झाल्यावर काळी कपिला गाय नेहमींप्रमाणें रानांत गेली. पाहाते तों झाडाखालीं एक बाई मुलाला घेऊन बसली आहे. कपिलेनें सांगितलं कीं, बाई, या रानांत वाघ-सिंह पुष्कळ आहेत तरी तूं रात्रीं इथं राहूं नको. राजपुत्राच्या बायकोनें म्हटलं कीं, मग मी तुझ्या शेपटीला धरून तूं जाशील तिथं येतें. त्याप्रमाणें मुलाला घेऊन राजपुत्राची बायको कपिलेच्या शेपटीला धरून झाडाखालीं वारुळांत गेली. नेहमींप्रमाणें कपिलेनें तिथं गेल्यावर नागराजाला दूध पाजलं. तेवढ्यांत तिथं असलेल्या पलंगावर राजपुत्राच्या बायकोनें आपल्या मुलाला हळूच ठेवून दिलं. नागराजानें मग समईला विचारलं—समई, माझी बायको काय करते ? समई कांहीं बोलली नाहीं. नागराजानें पुन्हां विचारलें—माझा मुलगा काय करतो ? समई कांहीं बोलली नाहीं. त्याबरोबर नागराज चिडला व पाहूं लागला तों पलंगावर आपला मुलगा. त्याला आश्चर्य वाटलं व तूं घात केलास असं तो बायकोला खूप रागावला. पण तुम्ही आल्याशिवाय मी इथून जाणार नाहीं. असं तिनं सांगि-

तल्यावर नागराजाचा नाइलाज झाला. शेवटीं, तूं मोठ्या नागराजाची परवानगी काढ; त्यानें परवानगी दिली तर मी परत राजपुत्र होऊन तुमच्या बरोबर येईन, असं त्यानं सांगितलं. त्याप्रमाणें मोठ्या नागराजाच्या पायां पडून राजपुत्राच्या बायकोनें परवानगी विचारली. तिची दया येऊन त्यानें राजपुत्राला नेण्याची परवानगी दिली. मग राजपुत्र, त्याची बायको व मुलगा यांसह पुन्हां आपल्या राज्यांत आला व सुखानें राज्य करूं लागला. तसं तुम्ही पण सुखानें राज्य करा.



संग्राहक : डॉ. **लक्ष्मण नारायण चापेकर,** बदलापूर.

## १. कोल्हा आणि माळकरी वाघ

एक होता कोल्हा. त्याची बायको गर्भार राहिली. ते दोघे असेच कसेतरी दिवस काढावयाचे. त्यांना घरदार नव्हतें. तेव्हां कोल्ह्याची बायको कोल्ह्यास म्हणते, " आतां मी बाळंतीण होणार. आपल्याला घर पाहा ". कोल्ह्यानें एक गुहा पाहिली. तेव्हां त्याची बायको म्हणते, येथें वाघाची भीति. येथें नको. कोल्हा म्हणाला, "तूं कांहीं काळजी करूं नको. वाघ आला तर पोराला म्हणावं, थांब रे बाळा तुला ताथ्या[1] वाघाचेंच मांस देते." मग कांहीं दिवसांनीं कोल्ही प्रसूत झाल्यावर एके दिवशीं गुहेपाशीं वाघ आला व आंत कांहीं खायला मिळेल म्हणून डोकावून पाहूं लागला. तें पाहून कोल्ही म्हणूं लागली. ' थांब रे बाळा, तुला ताथ्या वाघाचें मांस देतें. ' हें ऐकून वाघानें घाबरून धूम ठोकली. लांब गेल्यावर आपले पाठीं कोणी नाही ना म्हणून तो पाहूं लागला. तों त्यास दिवेलावी[2] मावशी भेटली. तिनें वाघाजवळ, तो कां पळतो म्हणून विचारपूस केली. वाघानें तिला कारण सांगितल्यावर ती हसूं लागली—अरे वेडया, कोल्हा कसा तुला खाईल ? तूंच कोल्ह्याला मारून टाकशील.चल आपण फिरून जाऊन पाहूं. मग वाघानें तिला आपल्या पाठीवर घेतलें.नाहीं तर मावशी चालणार हळू व

---

१. ताज्या मारलेल्या. २. कोल्ह्याएवढें वाघासारखे पट्टे असलेलें एक निरुपद्रवी जनावर; कोंबडें खातें.

वाघ चालणार भराभरा; आणि मावशीनें आपल्याला फसवूं नये म्हणून तिची शेपटी आपल्या शेपटीला बांधून टाकली. असे दोघे गुहेपाशीं आले. त्याला पाहतांच कोल्ही म्हणते, थांब रे बाळा, रडूं नको; तुला ताध्या वाघाचें मांस देतें. तें बघ तिकडे दिवेलावी मावशीनें तुझ्यासाठीं वाघ आणलाय. वाघानें तें ऐकतांच फिरून धूम ठोकली. त्याला दिवेलावी मावशीचा फार राग आला, कीं हिनें आपल्याला फसविलें. पळतां पळतां दिवेलावी मावशी आपटून आपटून मेली. कारण तिची शेपटी वाघाच्या शेपटींत अडकली होती. मग तिची शेपटी झुडपाला अडकून तुटली तेव्हां वाघ मोकळा झाला. चालतां चालतां तो एका पारध्याच्या खोड्यांत सांपडला. मग पारध्यानें त्याला पकडून पिंजऱ्यांत ठेवलें व पिंजऱ्याचा दरवाजा चांगला लावून घेतला. थोड्या वेळानें तिकडून एक चांगला माणूस जात होता. त्यास पाहून वाघ म्हणतो 'दादा, मला तहान लागलीय, जरा मला मोकळा कर, मी पाणी पिऊन येतों. मग मला फिरून बंद करून तूं जा.' त्या माणसास वाघाची दया येऊन त्यानें पिंजऱ्याचें दार उघडलें व तो व वाघ शेजारच्या झऱ्यावर गेले. तेथें वाघ पाणी प्याला. पाणी प्याल्यावर त्यानें त्या माणसास म्हटलें, 'आतां मी पाणी पिऊन तृप्त झालों. पण आतां मला भूक लागली; तर मी आतां तुला खातों.' तो माणूस म्हणाला, 'मीं तुला पिंजऱ्यांतून सोडविलें आणि आतां तूंच मला खातो म्हणतोस. हा काय न्याय जाहला काय ?' मग ते दोघे आपला न्याय तोडण्यासाठीं बैलाकडे गेले. बैल म्हणाला, 'बाबा माणूस फार वाईट. माझा धनीच पाहा. त्यानें मजकडून आजपर्यंत काम करून घेतलें. मी काम करीं तेव्हां तो मला चांगलें खाऊं घाली. आतां मी काम करीनासा झालों तर तो आतां मला म्हातारपणीं मोकळें सोडून देतों. माझ्या खाण्यापिण्याची मुळींच चवकशी करीत नाहीं. माणसासारखा कृतघ्न कोणी नाहीं. वाघ करतोय तेंच बरोबर.' बैलाचा न्याय माणसास पटेना म्हणून ते पुढें आणिक कोणाकडून तरी न्याय तोडून घेऊं म्हणून पुढें चालूं लागले. तों त्यांना तो गुहेंतला कोल्हा भेटला. त्याला दोघांनीं आपला न्याय तोडण्यास सांगितलें. कोल्ह्यानें दोघांचें म्हणणें नीट ऐकून घेतलें व म्हटलें कीं, 'मीं तुमची गोष्ट ऐकली, पण माझ्या ध्यानांत येईना कीं, पिंजऱ्यांतून या माणसानें वाघाला कसें सोडवलें व तें मला प्रत्यक्ष दाखविलें तरच कांहीं उमज पडेल. तरी माझ्या ध्यानांत कांहीं येत नाहीं.'

मग सर्वजण पिंजरा होता तेथें परतले व कोल्ह्याच्या आग्रहावरून वाघानें आपण पिंजऱ्यांत कसे होतों व दार कसें बंद होतें हें आपण पिंजऱ्यांत जाऊन व त्या माणसास दार बंद करावयाला सांगून कोल्ह्यास दाखविलें, लगेच कोल्हा त्या माणसास सांगतो, 'अरे पळ,आतां पाहतोस काय ? वाघाला राहूं दे पिंजऱ्यांत.' मग वाघ राहिला पिंजऱ्यांत आणि तो माणूस व कोल्हा गेले निघून. कांहीं वेळानें तिकडून एक साधु जात होता. तो पंढरपूरला जात होता. त्यालाहि वाघानें मागच्यासारखीच विनंती केली व मीहि यात्रेला येतों म्हणूं लागला. साधूला दया आली व त्यानें त्याला सोडविलें. नंतर पाणी पिऊन जाहल्यावर, भूक लागली, तुला खातों, म्हणूं लागला. तें ऐकून साधूनें पाण्यांत उडी घेतली व तो पोहून पलीकडच्या तीराला भिऊन पळून गेला. वाघहि त्याच्या पाठीं पाण्यांत उतरला, पण पाण्यांत चिखल फार.तो पलीकडे पोंहोंचेतो तों चिखलानें पक्का माखला व चिखलाचे थर अंगावर जाहल्यानें तो काळानिळा व लठ्ठ दिसूं लागला. चिखलानें त्याला कंड सुटूं लागली म्हणून तो राखेंत लोळला; त्यामुळें तो लठ्ठ व राख फासलेल्या गोसाव्यासारखा दिसूं लागला. इकडे साधु तर निघून गेला. मग त्या पांढऱ्या वाघानें पताका घेतली व माळ उंबराची घातली. आणि निघाला पंढरपूरला. वाटेंत कोल्हा भेटला. त्याला वाघ म्हणाला, 'अरे ये, माझें दर्शन घे. मी पंढरपूर करून आलों.' तेव्हां कोल्ह्यानें त्याच्या पायांवर डोई ठेवली. तों झटकन वाघानें त्याची मानच आपल्या तोंडांत पकडली. कोल्ह्यानें लगेच धूर्तपणानें वाघाला ओरडून सांगितलें, 'अरे बघ तरी, तुझी पताका पडली ती तरी बघ.' वाघ खरेंच समजून वरतीं पाहूं लागला, व त्याची पकड ढिली होतांच कोल्हा पळून गेला व वाघोबांना हात हालवीतच पुढें जावें लागले. एकूण काय––जनावरांत कोल्हा,पक्ष्यांत कावळा, आणि माणसांत न्हावी चतुर.

## २. बिघाडू आणि सुधारू

दोघे मित्र होते. एकाचें नांव बिघाडू व दुसऱ्याचें नांव सुधारू. बिघाडू सर्व कामें बिघडवीत असे व सुधारू सर्व कामें सुधारून घेत असे. एकदां दोघां मित्रांनीं राजाचीं खवडाळी[1] करावयाची ठरविली. बिघाडू

१. कुचेष्टा.

म्हणाला, ' मी बिघडवून ठेवीन पण तूं सुधारलें नाहींस तर ? तर मी मधल्यामधेंच फांशी जाईन. '

सुधारूनें त्याला धीर दिला व आपल्यावर विश्वासून खुशाल खवं-डाळी कर, म्हणून जोर दिला. इकडे राजा राणीच्या हातचें अन्न खात नसे. त्याला राजवाड्याबाहेरून पंचपक्वान्नाचें ताट येई. एके दुपारीं राजाचें ताट घेऊन शिपाई राजवाड्याकडे जात होते. राजवाड्याच्या बाहेरच्या पारा-वर ही मित्रांची दुक्कल बसली होती. तेवढ्यांत बिघाडूनें काय केलें कीं, राजाच्या ताटांत माती टाकून दिली. लगेच शिपायांनीं त्या दोघांना पक-डलें व राजासमोर उभे केलें. राजानें, राग अनावर जाहल्यामुळें दोघांना फाशीं देण्याची तयारी चालविली व त्या दोघांना, हें असें कां केलेंत, असें विचारलें, तेव्हां सुधारू पुढें जाइला. तो म्हणाला, 'महाराज, आम्ही पारावर बसलों होतों. खालून हे शिपाई आपलें ताट घेऊन जात होते. तों झाडाच्या फांदीवर एक घार तोंडांत साप घेऊन खात बसली होती. तिच्या तोंडांतून सापाचा तुकडा आपल्या ताटांत नेमका पडला. विष पडल्यामुळें आपण हें अन्न खातां तर परिणाम वाईट जाहला असता, हें जाणून, आपण हें अन्न खाऊं नये म्हणून आम्ही त्यांत माती टाकली. ' हें उत्तर ऐकून राजा खूष जाहला व त्यानें तें अन्न फेकून देऊन दुसरें अन्न आणण्यास सांगितलें व बिघाडू-सुधारूंना इनाम देऊन निरोप दिला.

## ३. शास्त्र्याच्या गर्वहरणाची गोष्ट

एक शास्त्री होता. तो म्हणाला, माझ्याहून सृष्टीमध्यें कोणी शास्त्री मोठा आहे काय ? म्हणून तो पाहायला चालला होता. त्याला वाटेंत एक अडबंग भेटला. अडबंग म्हणे, ' कुठें चाललास ?' शास्त्री म्हणाला, ' माझ्याहून कोणी मोठा शास्त्री आहे का तें पाहण्या-करितां चाललों. ' आतां दोघे रस्त्यानें चालले तेव्हां डाव्या हाताला निळा तास पक्षी आडवा गेला, तेव्हां शास्त्री म्हणतो, ' दादा, आपल्याला शकुन[१] झाला.' तेव्हां अडबंग म्हणतो, 'दादा, हा शकुन नाहीं. गेला डाव्या हाताला पण आंबट. ' शास्त्री म्हणतो, ' मी निघालोंय माझ्या-हून वरचढ शास्त्री कोणी आहे का पाहायला आणि हा अडबंग तर वर

१ नाट, वाईट चिन्ह, अपशकुन.

जाहला. मला म्हणतो आंबट.' पुढें चालतां चालतां त्यांना तहान लागली, तेव्हां ते बारवेवर पाण्याला गेले. तितक्यांत एक बाई गांवांतून मातीची घागर घेऊन पाण्याला आली व ती बारवेच्या पायऱ्या उतरून आंत गेली. घागर पाण्यानें भरली व ती वर येत होती तों निम्या वाटेंत तिची घागरच विरून गेली. तेव्हां शास्त्री म्हणतो, 'दादा, या बाईला शकुन जाहला.' तेव्हां अडबंग बोलला कीं, 'नाहीं. तिचा नवरा बारा वर्षें झालीं मुलूखगिरीवर गेला आहे. तो आज संध्याकाळीं तिला घोड्यावर स्वार होऊन भेटणार आहे.' बाईनें यांचे शब्द ऐकले व ती म्हणते, 'एक म्हणतो शकुन जहाला, दुसरा म्हणतो नवरा आज भेटणार आहे. तर आज हे मुशाफीर जाऊन द्यायचे नाहींत. घरीं घेऊन जायचें खरें खोटें पाहायला.' बाईनें त्यांना घरीं नेलें व शिधा दिला. तों स्वयंपाक करतां करतां संध्याकाळची वेळ जाहली तर त्या टाईमांत तिचा नवरा घोड्यावर स्वार होऊन घरीं आला. तो घरांत गेल्यावर बायकोला विचारूं लागला कीं, हे कोण आहेत ? तिनें सांगितलें, हे मुशाफीर आहेत व (पुढें सर्व हकीकत सांगितली) मग आतां तुम्ही भेटलांत. खरेंखोटें पाहण्यासाठीं मीं या मुशाफिरांना आणलें. त्यांना शिधा दिला पण कोरड्यास कांहीं नाहीं. मग नवऱ्यानें सांगितलें, दह्याचा गाडगा दे. तिनें दह्याचा गाडगा दिला व मग दोघेजण जेवावयास बसले व दहीं वासनांत ओतून घेतलें तेव्हां अडबंग काय म्हणतो, 'दादा, तास गेला तेव्हां मीं काय म्हटलें कीं तास गेला पण आंबट. हें पाहा आंबट आपल्या ताटांत. दुसरें मीं काय म्हटलें कीं, बाईला नवरा भेटेल. तो पाहा आलाय नवरा.' तेव्हां शास्त्र्याचा अभिमान खालीं जाहला व तो परत गेला व अडबंग आपल्या सासुरवाडीं चालूं लागला.

## ४. सर्वांत मोठा कोण ?

एका गांवांत एक कोळी राहात होता. तो रोज संध्याकाळीं घरीं आल्यावर आपल्या बायकोच्या नथेंतून तीर मारीत असे व म्हणे, माझ्या वरतीं आहे का कोणी ? त्याची बायको फार घाबरायची. तिला वाटायचें कीं, काय माझा डोळा फुटतो कीं काय होतें ? करतां करतां ती फार वाळून गेली. तेव्हां तिनें सर्व हकीकत शेजारणीस सांगितली. तेव्हां तिची शेजारीण तिला म्हणाली कीं, तूं तुझ्या नवऱ्याला सांग कीं, पृथ्वीवर पुष्कळच

आहेत तुझ्यावर. तेव्हां तिनें त्या संध्याकाळीं नवऱ्यास तसें सांगितलें. मग नवरा आपल्यावर पृथ्वीवर कोण आहे तें पाहण्यास निघाला. प्रथम तो बाहेर पडल्यावर त्याला एक मोळक्या भेटला. तर तो त्याच्या बरोबर त्याच्या घरीं गेला. मग मोळीविक्यानें मोळी खालीं टाकली ती याला उचलतांसुद्धां येईना. मग तो म्हणाला, आहे खरा हा माझ्या वरतीं. मग ते दोघे आपल्या वरतीं आणखी कोण आहे, काय तें पाहावयास निघाले. जातां जातां ते एका सुताराच्या घरीं गेले. तितक्यांत तो सुतार बाहेर गेला होता तो घरीं आला व त्यानें ताडाची भली मोठी फळी खांद्यावरून आणली होती ती खालीं टाकली. ती फळी हे दोघेजण उचलायला गेले तर त्यांना दोघांनाहि ती उचलेना. ते म्हणूं लागले, आहे खरा हा आमच्या वरतीं. मग ते तिघेजण आपल्यावर कोण आहे तें पाहण्यासाठीं निघाले. फिरतां फिरतां त्यांना एक माणूस कमरेला दोर बांधून दहापंधरा गाड्या सामानानें भरलेल्या ओढतांना दिसला. हे पाहूं लागले तर या तिघांना पुढची गाडी पण हालेना. ते म्हणाले, आहे खरा बुवा हा आमच्या वरतीं. मग ते चौघे जण आपल्याहि वरतीं कोण आहे तें पाहण्यासाठीं निघाले. फिरतां फिरतां ते एका दरींत गेले. तेथें एक बाई भाकऱ्या भाजीत बसली होती, ती त्यांना दिसली. तिला त्यांनीं विचारलें, तुझा नवरा कुठाय ? तर ती म्हणे औतावर गेलाय तो, असें म्हणून तिनें दाखविलें. तों तिचा नवरा शेतांत औतावर दिसला. तो औत चालवीत होता. औताला वाघ जुंपले होते व हातांत सापाचा चाबूक घेतला होता. नांगर लोखंडाचा होता आणि खडकावर औत चालवीत होता. तें पाहून हे सर्वजण फार घाबरले. तितक्यांत त्या बाईनें आपल्या तळहातावर या चौघांना उचलून घेतलें. डोकीवर भाकरी बांधलेली घेतली आणि औतकऱ्याकडे चालूं लागली. इकडे या चौघांना कशाचा पत्ताच नाहीं. मग तेथेंच त्या चौघांपैकीं दोघांची कुस्ती जुंपली. शेवटीं त्या बाईनें चौघांस आपल्या हातावरच औतकऱ्याकडे नेलें. ते मनांत म्हणूं लागले, हा आपल्यावर आहे. असें मनांत म्हणतात न म्हणतात तों एक घार आली व तिनें त्या सर्वांनाच उचलून घेतलें आपल्या चोचींत आणि ती एका महालाच्या गच्चींत वर जाऊन बसली. तिला वाटे, झाडावर बसलें तर झाड मोडेल. मग ती चोचीनें या सगळ्यांना खायला लागली. त्या तिच्या हिसकाहिसकीनें सर्व महाल हालूं लागला. खालीं कलावंतीण आपल्या महालांत बसली

होती. ती म्हणते काय हादरत आहे. मग तिनें आपल्या दासींना सांगितलें कीं, खांब हादरतोय तर माझ्या केसांचा डेंगा दे. मग तिच्या केसांचा डेंगा दिल्यावर हादरणें थांबलें. मग आतां सर्वांत मोठा कोण ?

## ५. अन्नपूर्णेची गोष्ट

दोघे भाऊ होते. त्यांची आई लहानपणींच वारली होती. वडील भाऊ पाटील होता. त्याचें लग्न झालें होतें. धाकटा बारीकला होता. तो वहिनीला आईप्रमाणें मानी. तिच्या अंगाखांद्यावर खेळे—होतां होतां धाकटा भाऊ मोठा झाला. तेव्हां त्याची वहिनी त्याला म्हणाली, आतां तूं मोठा झालास. आतां तूं माझ्या अंगाखांद्यावर खेळत जाऊं नकोस. तें बरें नाहीं. हें ऐकून त्याला फार वाईट वाटलें. त्याला वाटे, आपली आई असती तर अशी बोलती का ? मग अतिशय दुःखीकष्टी होऊन तो घर सोडून बाहेर जावयाला निघाला. तेव्हां त्याची वहिनी म्हणते, जाशील तर जा, पण माझ्यासारखी अन्नपूर्णा घेऊन ये. तेव्हां तो निघाला. खूपखूप जंगलांत गेला, तेथें त्याला एक शंकराची पिंड पाल्यापाचोळ्यांनीं भरभरून गेलेली दिसली. त्यानें पालापाचोळा काढून टाकला. पण पाणी घालणार कसें ? त्याच्याजवळ नव्हतें भांडें; मग त्यानें पंचा पिळून पंचानें पिंडी स्वच्छ करून, रोज त्या पंचानेंच पिळून तो पिंडीवर पाणी वाहूं लागला. होतां होतां शंकर त्याला प्रसन्न झाला व म्हणूं लागला, तुला काय पाहिजे ? तर हा म्हणे, मला अन्नपूर्णा पाहिजे. शंकर म्हणाला कीं, पुढें ऋषीचा आश्रम आहे त्या ठिकाणीं जा तूं. तो ऋषि तुला कांहीं तरी उपाय करील. मग तो जातां जातां सारीं वनं पालथीं घालीत पुढें गेला. तेव्हां त्याला आश्रम दिसला. तो ऋषि सहा महिने झोपत असे व सहा महिने जागा असे. हा तेथें गेला तेंव्हां ऋषि झोपलेला होता. यानें ऋषीच्या जागे होण्यापर्यंत न थांबायचें तर काय करायचें ? मग त्यानें ऋषींच्या आश्रमाच्या बागेंत सर्वत्र पालापाचोळा झाला होता, झाडें वाळून गेलीं होतीं, तो पालापाचोळा काढून टाकून जागा साफ केली. झाडांना रोज पाणी घातलें तशी बाग स्वच्छ आणि झाडें टवटवीत दिसूं लागलीं. ऋषि उठला तेव्हां पाहतो ती बाग सुंदर, व्यवस्था ठेवलेली. त्याला आश्चर्य वाटलें. इकडे ऋषीला पाहतांच हा घाबरून गेला आणि एका झुडपाआड लपला. पण ऋषीनें त्याला पाहिलेंच. मग ऋषि म्हणाला, अरे

बाळा, भिऊं नकोस. मी कांहीं मारीत नाहीं तुला. तर हा पुढें होऊन ऋषींच्या पायां पडला व सर्व हकीकत त्यानें ऋषींना सांगितली. ऋषि म्हणाले, अरे अन्नपूर्णा म्हणजे देवांगना. ती तुला कशी मिळणार ? मग याचा हट्ट पाहून ऋषीनें त्याला सात खडे मंत्रून दिले व सांगितलें कीं, पाहा अन्नपूर्णा आणि परी मोरावर बसून अंग धुवायला नदीवर येतात ते वेळीं तूं नदीवर जा व मोरापुढें हे खडे टाक; मग या खड्यांच्या लाह्या होतील व मोर लाह्या-पाठीमागें लागला कीं, तूं त्या परींचीं वस्त्रें घेऊन पळत इकडे ये. पण सांभाळ, मागें वळून पाहूं नकोस. मग त्यानें ते खडे घेतले आणि तो नदीवर गेला. तर तिकडे परी आल्या होत्या व आपलीं वस्त्रें मोराजवळ देऊन त्या अंग धुवायला नदींत उतरल्या होत्या. त्यानें मोरापुढें खडे टाकतांच त्या खड्यांच्या लाह्या झाल्या व मोर त्यांपाठीं जाऊं लागला तशी त्या पोऱ्यानें तीं वस्त्रें घेतलीं व तो पळूं लागला. परींनीं आपलीं वस्त्रें हा पोरगा पळवीत आहे असें पाहून त्या त्याच्या पाठीं लागल्या व म्हणूं लागल्या कीं, आम्ही सगळ्या तुला वरतों पण आमचीं वस्त्रें दे. त्यानें हें ऐकून झटकन मागें वळून पाहिलें तों याचा पाषाण होऊन पडला. इकडे ऋषीनें मंत्रसामर्थ्यानें हें जाणलें व मंत्र म्हणून त्याला फिरून माणूस केलें. व मागें न वळून पाहण्याकरितां बजावून फिरून मंतरलेले खडे दिले. या खेपेला मात्र हा पोरगा वस्त्रें घेऊन जो निघाला तो थेट ऋषीकडेच आला. तोंपर्यंत त्यानें मागें कसें तें वळून पाहिलें नाहीं अजिबात. मग त्या परी म्हणाल्या, आमचीं वस्त्रें द्या. आपण काय सांगाल तें देतों. परींना माहीत कीं, आपल्यामध्यें अन्नपूर्णा आहे तिलाच हे मागतील म्हणून त्यांनीं तिला कुत्री बनविली होती व आपल्याबरोबर घेतलें होतें कीं, हे कुत्रा मागणार नाहींत. पण ऋषींनीं त्या पोराला कुत्रीच मागून घ्यायला सांगितलें. पोरगा प्रथम कचरला, पण जेवल्यावर जेव्हां त्यानें कुत्रीला ताट उचलतांना पाहिलें तेव्हां त्याला पटलें कीं, ही खरी कुत्री नाहीं. मग त्यानें मिळालेली कुत्री बरोबर घेतली व तिला परत माणूस बनविण्याचा मंत्र पण ऋषीकडून घेतला व तो घराकडे निघाला. त्यानें विचार केला आत्तांच कशाला हिला माणूस बनवा ? घर जवळ आलें कीं, पाहतां येईल. मग आपल्या गांवाजवळच्या विहिरीवर हा आला तेव्हां त्यानें तिला माणूस बनविलें व तिला तेथेंच बसवून हा घरीं पालखी आणायला गेला, कीं आतां हिला

आजवीत गाजवीत घरीं घेऊन जाऊं. इकडे काय झालें कीं, एका चांभाराच्या मुलीनें अन्नपूर्णाचे दागदागिने बघितले आणि म्हटलें कीं, जरा मला ते दागिने द घालून पाहायला. अन्नपूर्णानें दागिने दिले ते चांभाराच्या मुलीनें घातले, आणि अन्नपूर्णा विहिरीजवळ उभी होती तिला विहिरींत ढकलून दिलीन. ती विहिरींत पडली तों अन्नपूर्णाचें फूल झालें. तें छान फूल पाहून सर्वजण तें काढून पाहूं लागले, पण तें कोणाच्या हातीं लागेना. मग जेव्हां हा पाटलाचा भाऊ गेला तेव्हां झटकन् तें त्याच्या हाताला लागलें. पाटलाचा भाऊ घरीं गेला तर वहिनी म्हणाली, ही तर चांभाराची मुलगी. हीच का अन्नपूर्णा ? पण याला वाटलें, वहिनीला हेवा वाटतोय व म्हणून ती असें म्हणत आहे. त्यानें लगेच बिऱ्हाड थाटलें. मग त्याला फूल मिळालें, तें घेऊन बायको ओवाळायला आली त्या वेळीं त्यानें तिच्या ताटांत टाकलें. चांभाराच्या मुलीनें ओळखलें कीं, हीच आपली सवत. मग आंघोळीच्या वेळेला तिनें त्याचा चोळामोळा करून तें फूल फेकून दिलें. तों तेथेंच एक सुंदर माठाची भाजी उगवली. ती वाढली तेव्हां एक दिवस पाटलाच्या भावानें पाहिली. मग तो बायकोस म्हणे, आपल्याला ही भाजी एक दिवस कर. बायकोनें भाजी चिरून तेलावर टाकली तर ती भाजी लागली नाचायला व म्हणे, 'घाट घाट घाटलं आणि राजाचं घर चांभारणीनें बाटलं.' बायकोनें तें मडकें धरलें आणि उकीरड्यावर नेऊन फेकून दिलें, तर तेथें आंब्याचें झाड उगवलें. तें झाड झपाझप मोठें झालें आणि त्याला आंबे येऊं लागले, तर हिच्या पोटांत आड[1] उठली कीं, हें झाड माझी सवत, हें झाड नको. तिनें नवऱ्याला सांगितलें. तो आतां पाटील झाला होता, कारण त्याचा भाऊ मेला होता. त्यानें हुकूम दिला कीं, सर्वांनीं हें झाड तोडावें आणि प्रत्येकाच्या घरीं थोडें थोडें ठेवावें, नाहीं तर त्याला शिक्षा होईल. करतां करतां एक गांवांतला साधु अखेरीला राहिला. तो घाबरून पाहूं लागला तर त्याला एक पिकलेला आंबा मिळाला. तो त्यानें घरीं आणून ठेवला, तर त्या आंब्यांतून सुंदर मुलगी निघाली. साधु तें पाहून पळूं लागला तर ती मुलगी म्हणते, बाबा, पळूं नकोस. मी भूतबित नाहीं. मी तुझी धर्ममुलगी आहे. तेव्हां साधूनें तिला वाढविली. तो साधु कांहींबाई वाळत घाली तेव्हां ती मुलगी राखत

१ तिडीक.

बसायची. पाटलाचा एडका[1] तें वाळत घातलेलें खायला यायचा, तर ही मुलगी त्याला लाथ मारून हुसकायची. हिच्या लाथेनें त्या एडक्याच्या अंगावर सेंदराचें पाऊल उठायचें. पाटलाला वाटलें कीं, हा कांहीं तरी चमत्कार आहे. मग त्यानें सर्व नागरिकांना हुकूम दिला कीं आज घरीं कोणीच शिजवायचें नाहीं. सर्वांनीं पाटलाकडे जेवायला यायचें. पण ही मुलगी कांहीं आली नाहीं. तेव्हां साधूकडे जाऊन तिला बलात्कार करून आणलें. तिनें आल्यावर पाटलाला सर्व हकीकत सांगितली. मग पाटलानें चांभाराच्या मुलीस सात पाट काढून पुढें गाढवावर बसवून हाकलून दिली व अन्नपूर्णेला घेऊन तो आनंदानें राहूं लागला.

## ६. हुशार शेतकऱ्याची गोष्ट

एक हुशार शेतकरी होता. त्याच्या शेतांत कांहीं चांगला दाणा पिकत नसे. तेव्हां त्याला मोठी काळजी पडली कीं आतां काय करावें ! मग त्यानें देवाची प्रार्थना केली. देवाला म्हणे, माझ्या शेतांत चांगलें पीक येऊं दे. तुला मी निम्मं देईन. देव झाला कबूल. मग शेतकरी म्हणे, तुला खालचा अर्धा भाग पाहिजे कीं वरचा ! देव आपला भोळा. तो म्हणे वरचा. मग शेतकऱ्यानें भुईमुगाचें पीक काढलन्. खूप पीक आलें. मग आपण ठेवल्यान् शेंगा व देवाला दिलान् वरचा वरचा पाचोळा. देव म्हणाला बरं ! शेतकऱ्यानें असं फसविलं काय ? पाहून घेऊं ! मग पुढच्या वर्षीं शेतकऱ्यानें फिरून देवाला तोच प्रश्न विचारला. तर देव म्हणे मला खालचा भाग पाहिजे. मग शेतकऱ्यानें लावली नाचणी. खूप पीक आलं. आपण घेतलीं कणसं आणि देवाला दिलीं ताटं खालचीं ! देव म्हणे अरेच्या, यंदाहि मला फसविलन् ! हं ! बरं ! पाहून घेऊं ! मग तिसऱ्या सालीं जेव्हां शेतकऱ्यानें देवाला तोच प्रश्न केला, तेव्हां देव म्हणाला, मला दोन्ही पाहिजे— ‘ खालचा निम्मा आणि वरचा निम्मा भाग. ’ मग त्या सालीं शेतकऱ्यानें लावला मका; देवाला दिलीं ताटकं, तुरे आणि आपण घेतलीं कणसं. देव फार रागावला. त्यानें पावसाला आज्ञा केली कीं, तूं पडूंच नकोस वर्षभर ! पाऊस म्हणे, मी पडणार नाहीं, पण माझं पोट फुगलं तर मी काय करूं ! मला जागा द्या. तर देवानें सांगितलं पडलास तर डोंगरावर पड.

---

१ मेंढा.

खालीं मुळींच पडूं नकोस ! शेतकऱ्यानें पाळला होता एक पोपट. त्याचे तो फार लाड करी. त्या पोपटानें देवाचें व पावसाचें बोलणें ऐकलें आणि शेतकऱ्यास येऊन सगळं सांगितलं. मग शेतकऱ्यानें त्या वर्षी डोंगरावर शेत पाडलन्. तेथेंच लावलन् भात. पावसाला जागा झाली थोडी. त्यानें पाऊस खूप पडला आणि पीकहि चांगलं आलं. देव म्हणे अरे ! यानें तर येथें ही युक्ति केली ! मग त्यानें वाऱ्याला सांगितलें, या शेतकऱ्याला उडव्याला मणभरच धान्य दे. जास्त नको देऊंस ! ती पण गोष्ट पोपटानं ऐकली आणि शेतकऱ्याला येऊन सांगितली. मग शेतकऱ्यानें काय केलं ! दर एक भाऱ्याचं घातलं उडवं. मग काय ? दर भाऱ्याला मणभर भात ! भातच भात झालं त्याच्याजवळ ! देवानें पाहिलें इथं ही चकवलं आपल्याला यानें ! मग देवाला त्या शेतकऱ्याचं मोठं कौतुक वाटलं आणि त्यानें त्याचा नाद सोडून दिला !

## ७. निर्बुद्ध जांवयाची गोष्ट

एका मुलाचें लहानपणींच लग्न जाहलें. पुढें दिवसामासा मोठा झाला आणि एके दिवशीं मुरळी आणायला सासऱ्याकडे निघाला. बापानें सांगितलें---बाळा, सासऱ्याकडे जावयाचें आहे. लवून भंजून जावं. मुलगा निघाला सासुरवाडीला. वाटेनें जातांना तो लवून भंजून व वांकून जात होता. मग एक शेळूचें शेत आलें. तेथें शेत शाळूनं भारावलं होतं. राखणदार राखण करीत होता. त्यानं याला हेरलं वांकून चालतांना. तो म्हणे, नक्की हा शेळू चोरायलाच आलाय. येऊं दे तर पुढें म्हणजे दावतों. मुलगा शेतांत पोहचला तों राखणदारानें झोडला त्याला. मुलगा म्हणे, मी शेळू चोरायला नाहीं आलों. मी चाललोंय बायकोला आणायला. तर बाप म्हणे लवून भंजून जावं. म्हणून वाकून चाललोंय. तर राखणदार म्हणतो, लवून नको जाऊं, हा हो करीत जा. मग पोरगा तसाच पुढें चालला. पुढें फासेंपारध्यांनीं टाकलं होतं जाळं. पांखरं आलीं जाळ्याकडं. तर हा आला हा हो करीत; नी पांखरं गेलीं उडून. फासेपारधी म्हणाले, यानेच आपली शिकार घालवली. त्यांनीं काढलं पोराला झोडपून. मग पारध्याला पोरांनीं सर्व हकीकत सांगितली. पारधी म्हणाले, असें नाहीं करूं. म्हणावें, तशीच गुंतो, तशीच गुंतो. मग पोरगा चालला ' तशीच गुंतो ' करीत. तर पुढें भेटली एक

बैलगाडी. ती चिखलांत रुतली होती आणि गडी घसरले होते चाक बाहेर काढायला. तितक्यांत हा पोरगा आला तशीच गुंतो करीत. ते गडी म्हणाले, आमचा इकडे जीव चाललाय चाकं काढण्यांत आणि हा म्हणतो तशीच गुंतो. त्यांनीं पण त्याला काढलं झोडून. पोरगा म्हणे, मला पारध्यांनीं सांगितलं असं म्हणायला. गडी म्हणाले, तर मग तूं असं म्हणत जा—अशीच निघो, अशीच निघो. पुढें 'अशीच निघो, अशीच निघो' करीत पोरगा पुढें चालला. मग पुढें त्याला भेटलं मढं. चौघेजण मढं मसनवटींत नेत होते. पोरगा आला अशीच निघो,अशीच निघो करीत.खांदेकऱ्यांनीं मढं ठेवलं खालीं आणि काढलं पोराला झोडून. पोरगा म्हणतो, मला गाडीवाल्यांनीं सांगितलं. पण तें कुठें ऐकतात. त्याला पार काढला झोडून. एक घासाची पण भूक नाहीं ठेवली. तसाच पोरगा पुढं गेला सासुरवाडीला. तिथं त्याला सासऱ्यानं या बसा केलं, घोंगडी दिली बसायला नी पाणी दिलं शेकून आंघोळीला आणि स्वयंपाक सांगितला करायला. तेवढ्यांत सांजची वेळ झाली आणि गायबा गुरं घेऊन आला. आतां सासऱ्याच्या एका बैलाचं नांव होतं पाहुण्या आणि दुसऱ्याचं नांव होतं काळ्या. सासरा गायबाला म्हणतो, तूं पाहुणा बांध, मी काळ्या घेऊन आलों. जांवई हें ऐकून फारच घाबरला. मनांत म्हणतो, आतांपर्यंत मार खात खात आलों आणि आतां सासरा म्हणतो, पाहुण्याला बांध, मी काळ्या घेऊन आलों. आतां इथें राहणेंच नको. मग तो जो पळाला तो थेट घरीं आला. सासुरवाडीचे लोक म्हणतात, अहो जांवई, थांबा. अहो, जांवई, थांबा. पण ऐकतोय कोण आणि मागें वळून पाहातोय कोण ?

## ८. आंधळा गांजेकस व चार चुत्ये

एक होता गांजेकस. तो रोज रात्रीं बायकोस सांगे, गांजाची गुंडी तयार कर व बायकोनें बिनबोभाट बिनतक्रार काम करावें म्हणून वर सांगे कीं, तूं गुंडी तयार कर, मग तुला चार चुत्यांची गोष्ट सांगेन. बायकोनें गुंडी दिली भरून कीं, हा आंधळा गांजा ओढायचा आणि त्या नशेंतच झोंपून जायचा. असा क्रम चाले आणि गोष्ट कधीं होतच नसे. एकदां गांवांत शिपाई गस्त घालीत होते. त्यांच्याबरोबर प्रधानहि गस्त घालण्यास आला. प्रधान एकटाच हिंडत होता. तो या आंधळ्या गांजेकसाच्या दारापाशीं आला व त्यानें त्याचें बायकोजवळचें बोलणें ऐकलें व आतां चार

चुत्यांची गोष्ट ऐकायला सांपडेल म्हणून तो तसाच दाराला कान लावून थांबला. पण सगळी रात्र गेली–तरी गोष्ट नाहीं न् कांहीं नाहीं. आंधळा तर कधींच झोपीं गेला होता. सकाळीं प्रधान दरबारांत आला. तर त्याचे डोळे तांबडे, तारवटलेले. राजा पुसूं लागला कीं, काल काय जागरण वगैरे झालें कीं काय ? तेव्हां प्रधानानें घडलेली सर्व हकीकत जशीच्या तशीच सांगितली. मग राजानें त्या आंधळ्याला शिपाई पाठवून बोलावून घेतलें व चार चुत्यांची गोष्ट सांगायला सांगितलें. आंधळ्याला कांहीं सुचेना. कारण त्याच्याजवळ गोष्टच नव्हती. शेवटीं हिय्या करून त्यानें विचार केला न् अन् सांगितलें कीं, पाहिला चुत्या दारापुढें पिंपळाचें झाड लावणारा. दुसरा चुत्या केळी आणि बोरी शेजारीं लावणारा. तिसरा चुत्या चांगला उपदेश न मानणारा व चवथा चुत्या एकटाच प्रवास करणारा.

दुसरे दिवशीं प्रधानाचा एक परममित्र त्याला भेटायला आला व शेजारच्या गांवीं येऊन त्यानें निरोप पाठविला कीं, तूं मला भेटायला इकडे ये. प्रधानाचा तो फार दोस्त असल्यामुळें प्रधान घाईघाईनें लगेंच निघाला. राजधानी सोडल्यावर त्याला चार चुत्यांच्या गोष्टीची आठवण झाली व आपण एकटेच निघालों ते चुत्ये, असें त्यास वाटूं लागलें. म्हणून तो सोबती शोधूं लागला; तों त्यास शेजारच्या ओढ्यांत एक मोठा खेकडा दिसला. त्यानें त्यासच पाठुंगळीला उपरण्यांत बांधून घेतलें व तो वाट चालूं लागला. मग दुपारीं ऊन झालें म्हणून विसाव्यासाठीं तो एका पिंपळाच्या झाडाखालीं पारावर निजला. आतां त्या झाडावर एक साप व कावळा यांची दुक्कल राहात असे. कावळा बसायचा डहाळीवर व साप राहायचा खालीं ढोलींत. कोणी मुसाफीर आला कीं, कावळा ओरडायचा व मुसाफीर निजलेला असतांना कावळा ओरडे. तें त्याचें ओरडणें ऐकलें कीं, साप ढोलीबाहेर येऊन त्या मुसाफिरालाच डसायचा. मग कावळा त्या मुसाफिराचे डोळे फोडायचा. असा त्यांचा क्रम असे. इकडे प्रधानाला झोंप लागतांच कावळा ओरडला व सापानें बाहेर येऊन प्रधानास दंश केला. मग प्रधान गुंगल्यावर कावळा येऊन त्याचे डोळे फोडूं लागला. तोंच उपरण्यांतलें खेकडें वळवळूं लागलें. कावळा मनांत म्हणूं लागला, मुसाफीर तर आहेच पण आधीं हें काय वळवळत आहे तें तरी पाहूं या. मग त्यानें चोंचीनें उपरण्याची गांठ सोडली, तर खेकड्याने आपल्या आंकड्यानें कावळ्याची

मानच पकडली. आतां कावळ्याची मान खेकडा चिरणार तों कावळ्यानें गयावया करण्यास सुरुवात केली. खेकडें म्हणालें, माझ्या मित्राचे प्राण वांचवलेस तर मी तुला सोडीन. तेव्हां नाइलाजानें कावळ्यानें सापास बोलाविलें व विष फिरून शोषून घेण्यास सांगितलें. मग सापानें विष शोषून घेतलेन्. त्याबरोबर प्रधानाचें विष उतरलें. पण साप मात्र मरून पडला. इकडे त्याच वेळीं खेकड्यानें आपले आंकडे दाबून कावळ्याची मान चिरली. अशा रीतीनें ती दुष्ट दुक्कल जगांतून नाहींशी झाली व प्रधान पुढें मित्राकडे गेला.

## हुमाणे

यांत कूट उखाणे व कोडीं येतात.

### ( १ ) ब्राह्मणाघरचा बोकड

एका ब्राह्मणानें हौसेनें एक बोकड पाळला होता. एके दिवशीं चोरांनीं तो खांडून खाऊन टाकला. ब्राह्मणानें प्रथम सूर्यास विचारलें कीं, चोर कोण? तूं सर्व जग पाहतोस. तूं चोर पाहिलाच असशील. सूर्य म्हणाला, माझ्या समक्ष चोरी झाली नाहीं. मला कशी कळणार? मग चंद्राला विचारलें, तर तोहि तसेंच म्हणाला. मग त्यानें धरित्रीला विचारलें. तिनेंहि सांगितलें कीं, जमिनीवर त्यांनीं बोकड खांडला नाहीं. सरपण नेलें असेल म्हणून झाडांना विचारलें. त्यांनींहि सरपण चोरांनीं नेलें नाहीं म्हणून सांगितलें. पाण्याला विचारलें, भांड्यांना विचारलें. कोणींच पाहिलें नसल्यानें पुरावा देईना. तर चोरांनीं बोकड केव्हां खंडला, कुठें खंडला, कसा खांडला व शिजवला?

उत्तर:—चोरांनीं बोकड अंधाऱ्या रात्रीं तिरडीवरून स्मशानांत नेला व तेथें तिरडीच पेटवून, मडक्यांत पाणी नेलें होतें, त्यांत शिजवला. स्मशानाची भूमि नीच म्हणून धरित्री त्या भूमीस आपली म्हणेना. तिरडी व मडकें त्यांतलें पाणी स्मशानांतच टाकतात, परत आणीत नाहींत म्हणून तें सामानहि नीच. सरपण, तिरडीला सरपण कसें म्हणणार? स्मशानांत मडकें नेतात, तें भांडें कसें? व त्यांतील पाणीहि आपलें पाणी म्हणत नाहीं.

## ( २ ) चौघा मित्रांचा स्वयंपाक

चौघे मित्र होते. ते प्रवास रस्त्यानें करीत होते. जेव्हां त्यांना स्वयंपाक करण्याची वेळ आली तेव्हां त्यांना वारकरी भेटला. त्यानें चौघांना चार कामें सोपवून दिलीं. पहिल्याला सांगितलें कीं, तूं शिधा आण; पण पुरुषाकडून नको व बाईकडून नको. दुसऱ्यास सांगितलें कीं, तूं पाणी आण; पण झऱ्याचें नको, विहिरीचें नको व नदीचें नको. तिसऱ्याला सांगितलें, तूं भाडें आण; पण तें धातूचें नको आणूं व मातीचें पण नको आणूं. चौथ्यास सांगितलें कीं, तूं सरपण आण; पण तें वाळलेलें नको व ओलेंपण नको. तेव्हां त्या लोकांनीं स्वयंपाक कसा केला ?

उत्तर:—त्यांनीं हिजड्याकडून तांदूळ आणले. ते नारळाच्या पाण्यांत भिजाविले. तिसऱ्यानें शिंप्याकडून रुमाल आणला. त्यांत पुरचुंडी करून वाळूंत ती पुरचुंडी पुरली व वर कोळसे पेटवून ठेवले.

## ( ३ ) धर्मराजानें सांगितलेली कलियुगाची स्थिति

पांडव वनवासांत असतांना एकदां पाण्यासाठीं त्यांना जावें लागलें. प्रथम अर्जुन विहिरीवर गेला. तेथें नारदानें मेरु पर्वत मेणाला लटकावून हालत ठेवला होता. नारद अर्जुनास म्हणाला, हा पर्वत कां हालतो आणि मेणाला कां लटकून राहिला, याचें उत्तर मला दे. मग येथून पाणी घेऊन जा. अर्जुनास सांगतां येईना. म्हणून तो तसाच अडकून पडला. मग त्याला शोधायला भीम गेला. त्याला नारदानें गाय दाखविली. ती आपलें वासरूं खात होती. भीमाला या गोष्टीचा उलगडा करण्यास व मग पाण्यास हात लावण्यास नारदानें सांगितलें. भीमाला उत्तर सांपडेना, म्हणून तोहि अडकून पडला. मग नकुल आला. त्याला खडकावर खूप भाजलेले भोपळे दाखवून नारदानें या गोष्टीचें उत्तर त्याजजवळ मागितलें. नकुलाला सांगतां येईना, म्हणून तोहि अडकून पडला. मग सहदेव आला. त्याला नारदानें रांजण दाखविले. एका रांजणांतलें पाणी पांचशें रांजणांत जात होतें. पण पांचशें रांजणांतलें पाणी एका रांजणांत जाईना. सहदेवास याचें उत्तर देतां येईना. तोहि अडकून पडला. मग धर्मराज आले व त्यांनीं समर्पक उत्तरें देऊन सर्व भावांना सोडविलें.

उत्तर:--( १ ) कलियुगांत पाप मेरुपर्वताएवढें व पुण्य मेणाएवढें थोडें असें राहील. व त्या पुण्याच्या आधारावर पाप हेलकावें खात राहील. (२) कलियुगांत पोटची मुलगी बाप देज घेऊन जांवयास विकील. ( ३ ) कलियुगांत औरस प्रजेपेक्षां अक्करमासी प्रजाच जास्त होईल. ( ४ ) कुलियुगांत बाप आपल्या पांचशें मुलांना पोशील पण तीं पांचशें मुलें बापाला पोसायला कांकूं करतील.



# ठाकूर समाज

संग्राहिका : श्री. **सौ. अनसूया लिमये,**

महादेव कोळी जमातीप्रमाणेंच ठाकूर या आदिवासी जमातीची वस्ती महाराष्ट्राच्या ठाणें, कुलाबा, नगर व नाशिक या जिल्ह्यांच्या डोंगरी भागांतून आहे. शहरापासून दूर जंगल भागांतून या लोकांच्या वाड्या विखुरलेल्या असतात. कोळ्यांच्या वाड्या स्वतंत्र व ठाकरांच्या स्वतंत्र असतात. मोठाल्या वाड्यांतून एखादें घर चांभार, न्हावी, तेली, सुतार, लोहार, भोई वगैरे, आढळतें. जुन्या ग्रामव्यवस्थेची कल्पना त्यावरून येते. कोळी व ठाकूर या लोकांचा प्रमुख धंदा शेतीचा. अधिक पावसाच्या व डोंगराळ भागांत यांची वस्ती असल्यानें भात, नागली, वरई हीं धान्यें यांच्या शेतांतून पिकतात. जोडीला हिरड्यासारख्या जंगलांतील उत्पन्नांचा व्यापार, जंगलकुपांत काम हे उद्योगहि लोक करतात. स्त्रिया मोळ्या विकणें, अंडीं व विड्याचीं पानें विकणें, गौऱ्या थापणें हे जोड उद्योगहि करतात.

काटक्यांच्या भिंती मातीनें लिंपून वर गवत किंवा क्वचित् कौलें टाकून यांचीं घरें बनविलेलीं असतात. मात्र घरें व्यवस्थित सारवलेलीं व स्वच्छ असतात. मोठ्या घरांतून काड्यांच्या किंवा कोथळ्यांच्या पडदी घालून स्वयंपाकाची व बसण्याउठण्याची जागा संरक्षित केलेली असते व बाहेरच्या बाजूस शेळ्या, कोंबड्या, गुरें, बांधण्याची व्यवस्था असते. मातीच्या माठांतून किंवा मातीनें लिंपलेल्या काड्यांच्या कोथळ्यांतून धान्य भरलेलें असतें.

मोजकीं पितळेचीं भांडीं, मडकीं, शिंकीं व पेट्या असें मोजकें सामान घरांत आढळतें. पुरुषांचे पोषाख म्हणजे कमरेला गुंडाळलेली लुंगी व डोक्याला रुमाल. स्त्रिया खालीं फडक्याचा काचा मारतात व वर चोळी घालतात. पदर क्वचितच असतो. पुष्कळशा जाड मण्यांच्या माळा, पितळेचे दागिने स्त्रिया गळ्यांत, कानांत व हातांत घालतात.

लग्न अगदीं लहानपणीं करण्याची प्रथा अद्याप आहे. पुरुष दोन, तीन लग्नें सुद्धां करतो, किंवा घरांत दुसऱ्या स्त्रिया ठेवतो. पटत नाहीं, मुलासाठीं म्हणून अशा अनेक कारणांनीं दुसरें तिसरें लग्न करतात; अर्थात् पहिल्या लग्नाच्या बायकोचा मान मोठा समजतात. पुढील उखाण्यावरून तें दिसून येईल—

हंडयावर हंडा, हंडयावर होती परात, परातींत किसला कांदा,
त्याचा केला रेंदा,

XXX पाटलानें किती गोळा केल्या रांडा तरी मीच गुलाबाचा झेंडा. स्त्री देखील पतीशीं पटत नाहीं म्हणून सोडून जाऊं शकते व दुसरा घरोबा करते. पण स्त्री पळून गेली तर पंचायतीकडून न्याय मिळवितात. अशा वेळीं पुष्कळदां मुलीच्या वडलांकडून १०० रुपये घेऊन तिला काडीमोड दिली जाते. लग्नांत मुलीला ३०० रुपये व ३ मण धान्य देण्याची प्रथा सधन कुटुंबांतून आहे.

आजाराच्या बाबतींत भगत बोलावणें, डागणें किंवा अघोरी वनस्पतींचा उपयोग करणें सर्रास आहे. खंडेराव, बहिरी, पांढरी, चव्हाटा हे यांचे गांवदेव. व्याघ्र म्हणजे वाघ हेंहि या जंगली जमातीचें एक दैवत आहे. पुष्कळशा झोपडयांवर वाघाचीं चित्रें काढलेलीं असतात.

ठाकूर लोक हे वारली लोकांतील एक. ठाकरांत गोडे किंवा म-ठाकूर व कडवे किंवा क-ठाकूर असे दोन प्रकार आहेत. गोडे ठाकूर स्वतःला श्रेष्ठ समजतात. कडवे ठाकूर हे चेटूकविद्या जाणणारे अशी समजूत आहे. या दोन पोटजातींत रोटीव्यवहार होतो पण बेटीव्यवहार नाहीं. ठाकरांतील प्रमुख सण म्हणजे पोळा, भाद्रपद शु. पौर्णिमा, सर्वपित्री अमावास्या, दसरा इ. ठाकूर लोक गौरी बसवीत नाहींत. पूर्वी बसवीत असत. कुडांच्या गौरी असत. खालीं सफेद व वर लाल असलेलें फूल याकरितां

निवडलें जाई. पण केव्हां तरी ठाकरी बाया व त्यांचीं मुलें हीं फुलें आणायला गेलीं तेव्हां त्यांच्यांतील एक मूल वाघानें पळविलें, अशी दंतकथा आहे व "तेव्हांपासून आम्हीं गौरी पूजीत नाहीं. आमच्या गौरी वाघानें नेल्या," असें हे लोक सांगतात. गणपति आणतात पण सर्रास नाहीं. पोळ्याला अळूवड्या व खेकडें करण्याची प्रथा आहे. बलिप्रतिपदेला गुरांना अग्नींतून नेतात. अग्नींतून जाऊन वांचलीं तर तीं पुढें सर्व संकटांना तोंड देतील असें मानतात. या प्रसंगीं खरोखरच कांहीं गुरें मरण पावतात. दसऱ्याला खुरासणीकरितां पुरुष टोळ्यांनीं गांवोगांवीं हिंडतात. स्त्रिया झगडा निर्माण करायला त्यांच्याकडे जातात.

महादेव कोळी व ठाकूर या दोन्ही आदिवासी जमातींची लोकसंस्कृति संपन्न आहे. लावणीचीं कामें संपलीं कीं, या आदिवासी लोकांचे खेळ, नृत्यें, चढाओढी सुरू होतात. या प्रसंगीं कलेमध्यें रममाण झालेले हे आदिवासी लोक पाहिले म्हणजे त्यांचें संस्कृतीचें जग एक वेगळेंच आहे असें वाटूं लागतें. भौतिक जगांतील दारिद्र्य, संकटें, दुःखें ते पूर्णपणें विसरले आहेत असें वाटतें. नृत्याच्या वेळीं त्यांच्या अंगांत जोश संचारतो. विशिष्ट प्रसंगीं ही मंडळी एकत्र आली म्हणजे रात्रभर त्यांचे नृत्याचे फड चालू असतात. अशा वेळीं तहानभूक ते संपूर्ण विसरतात. जेवण तर घेत नाहींतच. चहा किंवा दारू मात्र पितात. स्त्रीपुरुषांचे मिश्र नाच करण्याची प्रथा यांच्यामध्यें नाहीं. पुरुषांच्या नृत्यांत बैठका, फेर, कमानी कमानी करून त्यांतून जाणें, एकमेकांच्या हातांवर उभे राहून पिरॅमिड्स बनविणें, डुक्कर, उंदीर, अस्वल यांचीं सोंगें घेणें, असे विविध प्रकार आहेत. स्त्रियांच्या नृत्यांत पदन्यास व लालित्य पुष्कळच असतें पण विविधता नाहीं. ठाकूर लोक आपल्या नृत्यांना कांबळनाच ( म्हणजे कांबळें हांतरलें तर त्यावर बसेल असा नाच ) म्हणतात. पुरुषांच्या नृत्याच्या वेळीं जीं गाणीं म्हटलीं जातात तीं दोन दोन चार चार ओळींचीं असतात. केवळ कल्पनांच्या लहरी वाऱ्यावर सोडतात. अर्थाच्या दृष्टीनें त्यांना महत्त्व नाहीं. कांहीं वेळ स्त्रियांच्या गीतांप्रमाणेंच हीं असतात. केवळ नृत्याला साथ देण्यासाठीं त्यांचा उपयोग करतात. स्त्रियांचीं गाणीं मात्र अर्थपूर्ण असतात. नृत्यांचे फड एकत्र जमतात त्या वेळीं सवालजवाब चालतात ते फारच ऐकण्यासारखे असतात. पूर्वीं हे सवालजवाब उद्धट किंवा अश्लील असत. आतां त्यांचीच जागा

पांडवप्रताप, भागवत, रामायण इत्यादि ग्रंथांतील माहितीनें घेतली आहे. त्यांच्यांतील तज्ज्ञ पंच मंडळी ग्रंथ घेऊन बसतात. एक फड सवाल विचारतो व दुसरा उत्तर देतो. रुमाल, पंचे यांचीं पारितोषिकेंहि दिलीं जातात. पुराणग्रंथांतील अतिसूक्ष्म माहितीवराहि हे सवाल-जबाब आधारलेले असतात. उ० " पांडवांनीं अश्व सोडला तो कुणाचा होता ? त्याच्या कपाळावर सोन्याचा पत्रा बांधलेला होता त्यावर मुद्रा कुणाची होती ? ब्रह्मदेवाच्या नाभीपासून श्रीविष्णु जन्म पावले त्याला किती वर्षे झालीं ! अशोकवनांत सीता बसली होती तिचें तोंड कोणत्या दिशेला होतें ? " इत्यादि.

नृत्यकलेबरोबर चित्रकलाहि या आदिवासींना अवगत आहे. स्वच्छ सारवलेल्या भिंतींवरून गौरींचीं चित्रें काढलेलीं असतात. तांदुळाचें पीठ भिजवून त्यांत बोटें रोवून ठिपक्याठिपक्यांनीं ( किंवा वर्तुळांनीं ) हीं चित्रें काढतात. विज्ञानापासून दूर असलेल्या निसर्गाशीं तादात्म्य पावलेल्या आदिवासींचें हें जीवन आहे.

## पावसाळी नाचाचीं गाणीं ( स्त्रियांचीं )

( १ ) माझ्या मामांचा मोठा बरू
माझ्या मामानं प्याली दारू
मामा दारूनं झिंगयिला
मग रंगण्या[१] निजविला
मंग सासूनं उठविला
मंग बाजवरी ठेवियिला
मंग चकणा माझा भाचा
मला डोळा कांहीं खुणावितो
मला हातानें पालवितो.

( २ ) माझ्या माहेरीं माहेरीं वो केळीचे खांब
माझ्या भावानें भावानें वो घेतीले तोडे
माझ्या पायाला पायाला वो भिडुनी गेले
माझ्या माहेरीं माहेरीं वो केळीचे खांब
माझ्या भावानें भावानें वो घेतल्या वेळा

१ अंगणांत.

# ठाकूर समाज



पुरुषांचें नृत्य
( फेरांतील लहान गोल )



पुरुषांचें नृत्य
( बैठक )



पुरुषांचें नृत्य
( जलद गतीचा एक प्रकार )



पुरुषांचें नृत्य
( जोडीचा खेळ )

# कातकरी समाज



पुरुषांचें नृत्य
( पिरॅमिड )



मुलांचें नृत्य
( दोन पायांतून एक छोटा मुलगा उंदीर म्हणून जातो )



स्त्रियांचें नृत्य
( पायांचें लालित्य )



मुलींचें नृत्य
( टाळीचा झिम्मा )

माझ्या दंडाला दंडाला वो भिडूनी गेल्या
(याप्रमाणें सर्व दागिन्यांवरून गाणें).

(३) जाईचीं पानं मीं खुडिलीं कां तूं खुडिलीं ?
जाईला पानी मीं घातीलं कां तूं घातीलं ?
जाईच्या कळ्या मीं खुडील्या कां तूं खुडील्या ?
खुडिल्यात हो शंकर भरतारानं खुडिल्या
जाईच्या वेण्या तूं माळील्या कां मीं माळील्या ?
माळील्यात वो शंकर भरतारानं माळील्या.

(४) ढोल्याचा ढोल वाजे देशावरी वो देशावरी
याचा कां नाद आला कानांवरी वो कानांवरी
ढोल्या मी येतें तुझ्या संगं वो तुझ्या संगं
नको नारी येऊं माझ्या संगं वो माझ्या संगं
घरची असुरी राग भर ग राग भर.

(५) उगवांतल्या बाजूला बाई ग
ढग उपललं बाई ग ढग उपललं
त्या ढगाचा पानी बाई ग
आढ्यावर पडीला बाई ग
आढ्याचा पानी बाई ग
वळसणीला आला बाई ग
वळसणीचं पाणी बाई ग
ओढाला गेल बाई ग
ओढ्याचं पानी बाई ग
झुरीला गेल बाई ग
झुरीच पानी बाई ग
ओहोळाला गेल बाई ग
ओहोळाचं पानी बाई ग
नदीला गेलं बाई ग
नदीचं पानी बाई ग
समुद्राला गेलं बाई ग.

(६) दारीं पोर ठाकराची जशी फुलल जाय
हातीं रुमाल ठिपक्याचा घोडा उधळीत जाय
दारीं पोर आगऱ्याची जशी फुलल जाय
हातीं रुमाल ठिपक्याचं

याप्रमाणें कातकरी, बामण, इ. नांवें घालायचीं व गाणीं वाढवायचीं).

(७) जाईच्या पाण्यांत लवंगा घातल्या भिजत
भरत[१] गेला खायाला लवंगा लागल्या तिखट.
जाईच्या पाण्यांत लवंगा घातल्या भिजत.
राम गेला खायाला लवंगा लागल्या तिखट

(८) वावडी वो वावडी वावडी वो वावडी वो
कोऱ्या नी कागदाची वो कोऱ्या नि कागदाची वो
वाऱ्यानं उडविली वो वाऱ्यानं उडविली वो.
पडाया कुठं जेली[२] वो पडाया कुठं जेली वो
मुरबाड तळ केलाय मुरबाड तळ केलाय
कोळ्याच्या वो पोरानं वावडी झेल केली
वावडी झेल केली वाचुनी वो पाहिली
ढोल्याचं नांव निघाला ढोल्याचा नांव निघाला
ढोल्या वा गुपित गेला ढोल्या वा गुपित गेला
गेलाया पळस बुडा वो गेलाया पळस बुडा वो
मोडील्या पळस डहाळ्या वो मोडील्या पळस डहाळ्या वो.

(९) डोंगर खंगाळ फोडुनी डोंगर खंगाळ फोडुनी.
लावलाय वो लोंब्याचा झाड लावलाय वो लोंब्यांचा झाड
दंडीं रुमाल हिरवा दंडीं रुमाल हिरवा
काय तुझ्या रुमालाची तऱ्हा काय तुझ्या रुमालाची तऱ्हा
जमनाबाई रडुं लागली वो जमनाबाई रडुं लागली वो
नको रडूं जमनाबाई वो नको रडूं जमनाबाई वो
तुला किसना झाला नाहीं तुला किसना झाला नाहीं
झाला नाहीं कांहीं म्हणूं झाला नाहीं कांहीं म्हणूं
रातोरिजी खेळ नाहीं रातोरिजी खेळ नाहीं.

---

१ घरांतील मुलाचें नांव घालावें. २ गेली.

(१०) तांबड्या माळाला तांबड्या माळाला
तलाव करीला तलाव करीला
तेही ना तळ्याला तेही ना तळ्याला
चार कोनीं सारीख चार कोनी सारीख
चार कोनी कोणाला चार कोनी कोणाला
समया लावील्या समया लावील्या
समयाच्याहि जोडं आल समयाच्याहि जोड आल
नारी खेळविल्या नारी खेळविल्या
समया वझल्या[१] समया वझाल्या
नारी गहप[२] झाल्या नारी गहप झाल्या

☆ ☆ ☆

## पुरुषांच्या नृत्यांचीं कांहीं गीतें

संग्राहिका : श्री. सौ. **अनसूयाबाई लिमये**

( १ ) बारा भाकरी थाळीभर लाह्या
गोपीची नाहीं झाली न्याहारी
बारा खणाची चोळी शिवली दसऱ्याला
चोळी नाहीं पुरली लाविली दोरी
बारा बैलांचा जुपला गाडा
तरी वर बसल्यावर तुटला नाडा.

( २ ) कंबरला माझ्या कंबरपट्टा
तुला काय वाटली माझी थट्टा
अब्रूला लागल तुझ्या बट्टा.

( ३ ) दर्या खणीला खणीला मुरुंबाचा
खांब रोयीला रोयीला लोखंडाचा
पाणी आलंया आलया वळीवाचा
गोण्या भिजल्या भिजल्या तांदुळाच्या

---

१ विझल्या. २ गप्प.

धन झाली हो झाली या वऱ्हाडयाची
नवरा आलाया आलाया शिवावरी
आधीं शिवाला शिवाला मानु द्यावा
नवरा आलाया आलाया नदीवरी
आधीं नदीला नदीला मानु द्यावा
मंग नवरी नवरी परणार
नवरा आलाया आलाया वाडीवरी
आधीं वाडीला मान द्यावा
मंग नवरी परणार
नवरा आलाया आलाया येशीमधीं
आधी येशीला येशीला मानु द्या
मंग नवरी परणाहर
नवरा आलाया आलाया मांडवांत
आधीं नवऱ्याला मानु द्यावा
मंग नवरी परणाहर.

(४) जेठाच्या र महिन्यांत जेठ
धुकट मात्र दुकल्या बाळा गोळावया
आभाळ गेलय गंगनाला
गंगनीं जाऊनी छाया धरली
आवसला हो या पुनवला
धारा पाण्याच्या मोकलीला
गंगू वैतरणी एका कडीला
शेरणी बेटा मोडीत गेल्या
राग रुसत या चालल्पा.

(५) वरच्या वनामधीं सुतारदादा करवत लाविल
चंदनाचं झाड धरणीला पाडीलं बुडहि टाकिलं
शेंडाहि टाकिल मधीली बा बंडी
सुतारदादानं पुतळा बनविला
उभी कां केली कां केली पहिली ग सती सोनारदादाची
सोनारदादा सोनारदादा काय बोल

अशी र पुतळा असहि मजला
दुसरी ग सती शिंपी या दादाची
शिंपीदादा शिंपीदादा काय बोल
अशी कां पुतळा असेहि मजला.

(६) रंग नाचूं रे आजच पाय दिला
देवांतून देवरे देव कुणाचा उजळ
चंद्र सूर्य रे उजळ.

(७) सोनकेळीचीं एका माळेचीं बाळं रे
एका माळेशीं ओवूं जीवाला जीव लावूं रे
खेळाया आपण जावूं रे
घांगऱ्याचा घोळु रे गरिबी विसरू.

(८) येगा रंगणावर आजच पाय दिला
आजच पाय दिला आजच नाच केला
ढोल्या तुझ्या थापा र येऊं दे झरोझरी.

(९) दादा तोंडिली कुंभई बांधिली मुंबई
गडी रे आपुन गडी एका शिवचे रे गडी
शिणेला उभे राहूं रे.

(१०) अशी मी मोठी झालें रे आईच्या हाताखालीं हो
आईला मानून नाहीं दिलें परघरीं.

(११) रुसली रुसली फुकेरी रुसली
फुकेरीनं सांगितल्यापासून र ढोल्यांची गरदी झाली.

(१२) रामा रे रामा र आंब्या तुझ्या पुढं दगडी खंदाया आली रे
दगडी खंदाया आली रे पाणी झंझाया आला रे.

(१३) भिंतीच्या कपारीले पारवा सिपारिले[1]
पारध्यानं पारवा न मारिले पारव्याला जोडी नाहीं रे.

(१४) रामा तुझा बाण बाण कां ताडमाड
रामानं रामानं रामफळ झुगारिलं
सीतेनं सीतेनं रामफळ झेलिलं.

---

१ लपून बसला.

(१५) वैतरणीचा गंगाबाईचा र दोघींचा ओढ पडला
ओढ पडला वैतरणी रांग गेली
गंगा गेली उगांवांत वैतरणी माळवांत
वैतरणी माळवांत कडेकापरे तोंडीत गेली
कडे कापरे तोंडीत गेली वाटेचा संभु आडवा आला
वाटे संभु आडवा झाला कुशीला भोक पाडुनी गेली रे
गंगा गेली उगांवांत नाशकाचे निघाली मधवानं
नाशकाचे निघाली मधानं गंगा बांधीत नेली रे
गंगा बांधीत नेली रे गंगा सोडून गेली र बुरखान
गंगा सोडून गेली रे सूर्यातळीं जाऊन उमटली रे.

(१६) घोटीच्या पालथीनं गाडी चालली जोरानं रे
हिंवाळे पुलावर रे गाडी फिरे दुहेरी रे
आगीनगाडी काळी डब्याला डब्बा वाली रे
गाडींत आरडते ओरडते गाडी बोगद्यांत शिरली रे.

(१७) एरंड मातला वईमधीं घातला रे
कोळ्याच्या पोरा धमकावितो कुणाला रे
पटेकराच्या पोरा जलम तुझा गेला रे.

(१८) समींदराच्या कड सीताबाई ओवीते मोतीहार.
ओवीते मोतीहार घरीं लक्ष्मनदीर
उघड सीते दार मला पाहूं दे मोतीहार.

(१९) पठारीचा वाघ या देव वाघ यासी रे
वळणीं उमटला देव नवसाला पावला रे
देव उमजला रे.

(२०) माहुलीच्या पाठीमागें पत्र्याच्या बाहुल्या
पत्र्याच्या बाहुल्या त्या हळदीनं पिवळ्या.

(२१) आवतपेऱ्या दादा नको मारूं बैलाला
नको मारूं बैलाला माझ्या पाठीच्या भावाला.

(२२) नाशिक शहरांत चोरी र कशाची झाली
कांगऱ्याच्या पोरीची नथ सरजाची गेली.

(२३) घाटाच्या तोंडाला सारंगी लावली
सारंगीच्या पाण्या जाऊं दे निमनी भागाला
तिठुली पुढं गेलं नारळी भागाला.

(२४) कुऱ्हाड कोयता घेरे भाऊ चल जाऊं मोहरी फोडाया
मोहरी तोडतां तुटला पाय चालवना माझ्या भाव
भाऊ रे चल जाऊं आंबवाडीला
हिरडयाचे हिरडये कां तोर्डाले.

(२५) कडयाच्या वावच्या गळती थपाथपा
गळती थपाथपा माकड घेती झोपा.

(२६) माळाचा पठार दिसतो निपाळ
वरियाचं सुकाळ.

(२७) उभे येळूंच्या साऊलीला
वाघ डरकावतो माहुलीला.

(२८) फुटलं माझं शेत भरून पाणी येत
धरून पाणी जात बारीक भात आंत.

☆ ☆ ☆

संग्राहक : **डॉ. ल. ना. चापेकर**, बदलापूर.

## कोल्हा–हेल्यांची गोष्ट

एक कोल्हा व एक हेला दोस्त होते. ते पाणी प्यायला झऱ्यावर गेले. कोल्हा म्हणे, तूं आधीं पी. आणि हेला म्हणे, मी प्यालों तर पाणी संपवीन, म्हणून तूं आधीं पी. कोल्हा ऐकेना. मग हेल्यानें सर्व पाणी गाळासुद्धां पिऊन घेतलें. कोल्हा म्हणतो, मला तर फार तहान लागली. आतां मला पाणी कुठंय. हेला म्हणे आतां माझ्या पोटांत जा तूं. आंत गेलास तर वर बघूं नकोस हं. असाच पाणी पिऊन ये. तर कोल्हा आंत गेला. पाणी प्याला आणि वर बघून पाहातों तों काळजाचा घड.मग कोल्ह्यानें तो ओढला व खायला सुरुवात केली. तर इकडे हेला मरून गेला आणि त्याचें धड गडबडां लोळूं लागलें. कोल्हा म्हणतो, हेल्या, दादा थांब, हेल्या

दादा थांब.तर तो थोडेच थांबतोय.वाऱ्यानें धड चाललं गडगडत पुढं. करतां करतां वाटेंत कांहीं गुराखी गाई चारत होते. ते म्हणत यांत काय? म्हणतोय हेल्या. दादा थांब, हेल्या दादा थांब. तर एका गुराख्यानें काठी मारली. तसें तें कातडें फुटलें आणि कोल्हा सुटला.

☆ ☆ ☆

# कातकरी समाज

[ आदिवासी जमातींत कातकरी ही एक निकृष्ठ जात आहे. सह्याद्रीच्या उत्तर भागांत यांची वस्ती आहे. मूळचे काथ पिकविणारे म्हणून त्यांचें नांव काथकरी, काथोडी असें पडलें. कातकऱ्यांचा मुख्य धंदा म्हणजे कोळसा करणें. या धंद्यापायीं त्यांचा जंगल कंत्राटदार, सावकार यांच्यांशीं संबंध आला. कातकऱ्यांनीं कंत्राटदारांचा फार जुल्म सहन केला आहे. आतां त्यांना फारसा जाच सहन करावा लागत नाहीं. त्यांची कमाई चांगली असली तरी त्यांच्यांत संग्रही वृत्ति बिलकूल नाहीं. यामुळें कातकऱ्यांच्या झोपडींत नेहमींच दारिद्र्य दिसून येतें. कातकरी स्वतःला ' जंगलचे राजे ' म्हणवितात व मेलेल्या माणसाचे दिवस करतांना, " बामणाच्या जन्माला येऊं नको, कारन लिवून लिवून मरशील; कुनब्याच्या जनमाला येऊं नको, कारन काम करकरून मरशील; पन काथोडयाच्या जनमाला ये, जंगलचा राजा होशील " असें म्हणतात.

हे लोक अगदीं सडपातळ व काळे असतात. वागण्यांत घाणेरडे दिसतात. हे खोपट्यांतून राहतात व शिकारीचीं साधनें स्वतःच बनवितात. चकमकीपासून विस्तव तयार करतात. आतां कांहीं शेतकी करतात. तथापि यांना ती साधत नाहीं. मजूर म्हणून साधारण बरे असतात. कुणब्यापेक्षां कातकरी कमी पैशांत मजुरी करतो, म्हणून त्याला फार मागणी असते; पण तो सहसा जात नाहीं. शिकार किंवा चोरीमारी करूनच राहणें त्याला आवडतें. जादूटोणे करून कातकरी भुतेंखेतें काढतात. त्यांचे देव म्हणजे क्षुद्र ग्रामदेवता किंवा दगडधोंडेच दिसतील. त्यांत वाघदेव मुख्य आहे. यांच्यांत नाचगाणीं फार व तीं जुनींहि असतात. बाटलेल्यांची शुद्धि करून पुन्हां जातींत घेतात. त्यांना वरप असें नांव

आहे. गोमांस खाणारे कातकरी ( ढोर-घेड ) अस्पृश्य समजले जातात. ठाकूर, कोळी, वगैरे जातींतून पैसे देऊन लोक जातींत घेतात. पूर्वी कातकरी बायका इतर जातींतील पुरुषास पळवून जातींत आणीत असें सांगतात.

प्रथम वराला विधवेशीं लग्न करावयाचें झाल्यास प्रथम त्याला रुईशीं लग्न करावें लागतें. बायकोला मूल होऊन जगत नसेल तरीहि नवरा रुईशीं लग्न लावतो; असें केल्यानें मूल जगतें अशी समजूत आहे. यांच्यांत मुलें झाल्यावरहि नवराबायको लग्न लावतात; म्हणजे लग्नावांचूनहि कांहीं काळ एकत्र राहूं शकतात. रंगपंचमी, बलिप्रतिपदा व सर्वपितरी आंवस या तीन दिवशीं कातकरी पितरांना पिंड देतात. यांच्यांत ढोरकातोडी आणि सोनकातोडी अशा दोन पोटजाती आहेत. ढोरकातोडी ढोरें खातात म्हणून त्यांना सोनकातोडी शिवतहि नाहींत. तिरकमठ्यानें हरिण-ससा वगैरेंची शिकार करतात व त्यांचें मांस खातात. यांच्याविषयीं सविस्तर माहिती ना. गो. चापेकरकृत ‘ बदलापूर ’ पुस्तकांत मिळेल. त्यांत यांच्या तोंडच्या कांहीं गोष्टीहि दिल्या आहेत.--संपादक ]

## कातकरी गाणीं

संग्राहिका : **श्री. सौ. अनसूया लिमये**

गौरीच्या सणाच्या वेळीं स्त्रिया नृत्य करतांना म्हणतात.--

( १ ) चल वनांत सजणा दूर जाऊं या
दूर जाऊं या आपण चेंडू खेळूं या
चल वनांत सजणा दूर जाऊं या
दूर जाऊं या आपण पट्टा खेळूं या.

( २ ) बामणाची पोर कशी वेड्यावाणी
नाटकांत गेली हेडुळवाणी [1]
बामणाची पोर कशी वेड्यावाणी
हातांत फूल कशी मुसलमानीण.

( ३ ) नवरा बसला पोराला घेऊन
बायको पळाली वो सोद्याला घेऊन

१ हडळीसारखी.

उचलला ग पोर गेला घेऊन
बायकोला आणली हाताला धरून.

(४) नखऱ्यानं मोठ्या डौलानं चाले मुंबईची गुलजार नार
नयनीं काजळ घालुनीया
लाल रंगाची बारीक टिकली लावुनी
फिर फिरते नार.

(५) यादी[१] गणाला[२] हो रणीं आणीला हो
भर फुलाचा हो कोऱ्या रुमाली हो
फुलं खुडेली हो.

(६) दहीं दूध लोणी घ्या ग साऱ्याजणी
कनीयाची[३] राधा मागें राहिली घरीं
उलटा पदर डोकीवर माथा
कोणती कनीयाची राधा.

(७) सूट बूट करुनी मवाल्याचा कारटा
पगाराच्या नोटी यांनीं लाविल्याच वाटा.

(८) चला चला रे शेवंतीच्या वनीं चला रे
निरनिराळे फुलाला वास
गेला गेला रे चंद्र उजळुनी.

(९) मुंबई धक्क्यावरी उभा पारशी ग बाय उभा पारशी
धांवत पळत आला धक्की दिली जागा केला
जागा केला ग गाय तंबू ठोकला
तंबू ठोकला ग बाय खुर्च्या टाकल्या
खुर्च्या टाकल्या ग बाय राजा बसला.

(१०) हौसींनीं नवरा केला खर्च बाई केला
दारुबाज पदरीं पडला
काळणाच्या[४] ओटीवर बाई गेला
पहिलीची[५] दारू त्यानं प्याला.

---

१ याहो. २ गणपतीला. ३ कन्हैयाची. ४ कलालीण. ५ पहिल्या धारेची दारू.

(११) पती आला घोडयावरी ग बाय
ऊन पड तोंडावरी
ऊन पड तोंडावरी ग बाय नदर तिची छातीवरी
नदर तिची छातीवरी ग बाय पदर तिचा टाचेवरी.

(१२) नारी तुला पाहिली होती ओघावरी[१]
नारी तुझ्या हातावरी गोंदण निळा गार ग
नारी तुझ्या छातीवरी पुतळ्याचा हार ग.



# गोंड समाज

संग्राहक : **वि. वा. जोशी**, चांदा.

गोंड हे प्राचीन काळापासून भारतीयच असल्यामुळें त्यांची मनोवृत्ति प्राचीन भारतीय संस्कृतीस अनुसरून आहे. गोंडांची गणना अलीकडे भारतीय आदिवासियांत करण्यांत येते. नागविदर्भ विभागांत आदिवासियांच्या तीन संस्कृति दृष्टीस पडतात. त्या सर्वांचें मूळ गोंड संस्कृतींत आहे व वर्षानुवर्षे हे लोक आपल्या संस्कृतीला जागवीत आहेत. एकाच टापूंत आढळणारे हे तीन तऱ्हेचे आदिवासी गोंड भाषेच्या दृष्टीनें फारसे भिन्न नाहींत. कुठें तेलगु भाषेचें प्रभुत्व, कुठें हिंदी मिश्र गोंडी, तर कुठें मराठीचें वर्चस्व आहे; पण एकंदर जीवन मात्र सारखेंच आहे.

या जमातींत परिस्थित्यनुसार घरजांवई जाऊन किंवा घर निघून मोल देऊन अथवा हरण करून कांहीं विवाह होत असले तरी पूर्वापार सर्वसंमत श्रेष्ठ विवाह म्हणजे स्वयंवर किंवा अन्योन्य पसंतीचा गांधर्व-विवाहच मानण्यांत येतो. अविवाहित तरुण-तरुणींचे निवास व क्रीडास्थान असलेल्या ग्रामसंस्थेस ‘ गोतुल ’ ह्या नांवानें ओळखतात. येथें सहवासाच्या दृढ परिचयानें दम्पतींची निवड होत असते व तीच पुढें उभयकुल संमतीनें विवाहबद्ध होतात. असें स्वयंवर निश्चित झाल्यानंतर वधूवरांच्या वागणुकींत

१ हद्दीवर.

परस्परांस कांहीं भेद दिसून आल्यास फारच भयानक परिस्थिति निर्माण होते आणि त्याचा परिणाम क्वचित् प्रसंगीं परस्परांच्या खुनापर्यंत देखील होतो. कांहीं अन्य आदिवासियांतील स्त्रियांत मासिक पाळीचे निर्बंध इतक्या कडक रीतीनें पाळले जात असतात कीं, ऋतुमतीचें मुखदर्शनहि कोणास होणार नाहीं अशा आडोशाच्या जागीं तिची राहण्याची व्यवस्था केली जाते आणि तिच्या भोजनादि गोष्टींत इतरांचा कसलाहि संपर्क होत नाहीं.

अनैतिक संबंधानें गुन्हेगारावर पुढें ठेवल्या जाणाऱ्या वाळींत किंवा बहिष्कार बाबतींत सुद्धां चालू समाज रचनेप्रमाणें जे निर्बंध घातलेले आहेत त्यांचें बंधन आदिवासियांत समाज–प्रमुखांकडून मोठ्या चोख व कठोर निष्ठेनें पाळलें जात असतें. अशा समाज-प्रमुखांचा त्या त्या विशिष्ट जातीवर कोणत्याहि न्यायकोर्ट–कचेऱ्यापेक्षां चांगला वचक असतो.

माडियांच्या लग्नप्रसंगींची एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही कीं, लग्नप्रसंगीं घालावयाचा मंडप त्यानंतर ते सहसा काढीत नाहींत. ह्या मंडपाच्या मध्यभागीं प्रत्येक लग्नप्रसंगाचें शुभ स्मरण म्हणून एकेक कातीव कोरीव चौकोनी खांब रोवलेला दिसेल. एके ठिकाणीं असे पांच खांब पाहण्यांत आले. अगदीं कुजून गेला तरच तो खांब काढावयाचा, एरवीं नाहीं. इतकी त्यांची त्या स्तंभावर श्रद्धा असते. माडियांत मृतांचीं प्रेतें पुरण्याचीच पद्धत आहे. त्यावर ते छत्री तयार करतात. ज्या मानानें ज्या मृताचा दर्जा असेल त्या मानानें कमी अधिक दर्जाची ती छत्री ( गुडसी ) तयार केली जाते. ह्या छत्र्यांचें स्वरूप छोट्या छोटया टुपंखी झोपड्यासारखें असतें. लहान मुलें–मुली किंवा अर्भकें यांच्या बाबतींत मात्र ते अशा छत्र्या उभारीत नाहींत.

**गोंडांचे देव**—या गोंडांत निरनिराळया जाती आहेत. त्यांत माडिया, कोरकू, राजगोंड इत्यादिकांना प्रामुख्य आहे. पण त्या सर्वांच्या धार्मिक भावना व रूढी एकच व परस्परांशीं जुळणाऱ्या आहेत. सर्वांत एक मोठा देव ( महादेव ) मानून प्रत्येक कुळांत अनेक देवांची उपासना करण्याची चाल हा भारतीय संस्कृतीचाच प्रकार होय. हीच प्रथा ह्या गोंडांत होय. ह्या लोकांचे कांहीं देव झाडावर असतात, हें वाचून कित्येकांना आश्चर्यच

वाटेल. ते दरवर्षीं महोत्सवानें बांधले जातात. त्या वेळीं त्या विवक्षित जागेंत असणारे मार्ग रोखून धरिले जातात व तेथील रहदारी पूर्णतया बंद केली जाते. या नियमाचें उल्लंघन करणाऱ्याला देव अत्यंत कठोर शिक्षा करतो अशी त्यांची दृढ भावना असते. महोत्सवाच्या वेळीं ही सर्व मंडळी त्या विशिष्ट जागेंत जमावानें जमत असते आणि त्याला एखाद्या जत्रेचें स्वरूप येतें. त्या जातींतील प्रमुख ( मुखिया ) धर्मोपदेशकाचें काम करीत असतात. तेच हे देव बांधण्याचें काम करीत असतात. जवळ जवळ हा त्यांचा वार्षिक सण असतो. आणि त्या धार्मिक कृतीचा परिणाम एक वर्षपर्यंत म्हणजे पुन्हां देव बांधून होईपर्यंत असतो. हा सण उन्हाळ्याच्या सुरुवातीस पाळण्यांत येतो. पशुपक्ष्यांचा रक्ताभिषेक तर आहेच; पण अशा प्रसंगीं नरबळीहि देण्याचा प्रघात कित्येक ठिकाणीं रूढ आहे. ह्या प्रसंगीं पुरुष अगर स्त्रिया कासोटे मुळींच घालीत नाहींत.

आपणांकडे कोणत्याहि कार्यारंभीं गणपति-पूजनाचें जसें महत्त्व आहे, तसें या जातींत गुणिया ( गुणी ) किंवा ‘ वैगा ’ या नामानें देवाची आराधना करून मग कार्यास लागतात.

**रेलॉं रेलॉं** ( माडिया नृत्यगीत )

रेलॉं रेलॉं आँऽ
नावारे
नावारे च्याते मरका मरा
मरका मरा वारुन वातारे
आली श्रृंगार डोले वातां
रेलॉं रेलॉं..........१
नावारे च्याते लिंबू मरा
लिंबू मरा-वारुन वातारे
आली शृंगार डोले वाता
रेलॉं रेलॉं..........२

नावारे च्याते शितीमरा
रेंगा मरा वारुन वातारे
आली शृंगार डोले वाता
रेलॉं रेलॉं............३
नावारे च्याते सितामरा
सितामरा वारुन वातारे
आली शृंगार डोले वाता
रेलॉं रेलॉं...........४
( नावारे ज्वानी मंता )
हौशा ! तुरं हिद मंता
रेलॉं रेलॉं...........५

मराठी अनुवाद

अहाहा किती सुंदर माझी बाग ही प्रियकरा !
या बागेंतलं हें आंब्याचं झाड बघ,
किती सुंदर बहर आला आहे !
फळांनीं नुसतं लडबडून गेलं असून
मंद मंद वाऱ्यावर डोलत आहे
आणि—१
तसंच हें बघ लिंबाचं झाड,
भरपूर पिवळ्या धमक लिंबांनीं
कसं विनम्र झालं आहे........२
आणि हें शेवतीचें झाड
आपल्या सुगंधमिश्र फुलांनीं
मंद मंद वाऱ्याशीं खेळत आहे. ३
सिताफळाच्या झाडाकडे बघ,
परिपक्व झालेल्या फळांचें

तें फांद्यांतील पानापानांतून
डोकावणं आणि— —
( आणि माझं यौवन असंच )
नाहीं का ? पण——
प्रियकरा, तूं रे या वेळीं कुठं
आहेस !––
रेलाँ रेलाँ............५

### माता मायाचें गाणें

तूं माझी माता माय ।
मातान् माय माझी ।
आली ग गाडींतून ।
मोती फेकले झाडींतून । ग माय ॥
मातान् माय आली ।
आली तशी ग गेली ।
हार गजरा विसरली । ग माय ॥
मातान् मायेच्या अंगणीं
हातरली ग सतरंजी ।
चुडा भरते पंचरंगी । ग माय ॥
मातान् मायेच्या अंगणीं ।
हातरला ग बाई गोना ।
चुडा भरते लेकी सुना । ग माय ॥
मातान् मायेचं ग देणं ।
लिंबा बुडी ग खालीं ठाणं ।
पक्कान्नाचं ताट वो आण । ग माय ॥
मातान् मायेचं अंगण ।
अंगण पैटांगण ।
मी कां जाईन लोटांगण । ग माय ॥

गोंडवनी लोककथा

## जुनगांवचा अंकुम राजा

गोंडवनांतर्गत तेलंगणांतील बहुजनसमाजाच्या लोकजिव्हेवर नाचत असलेली लोकगीतात्मक नितांत सुंदर अशी ही प्रणयकथा आहे.

अंकुमराजा हा गोंडराजाचा मांडलीक असून 'जुनगांव'[१] येथें राज्य करीत होता. त्याच्या बायकोचें नांव गंगुबाई असें होतें. त्याचा मेव्हणा रामजी हा 'राजगड'[२] येथें गोंडराजाचा मांडलीक म्हणून राज्य करीत असे. त्याची बायको वीरुबाई आणि अंकुम राजाची बायको गंगुबाई दोघी बहिणी होत्या. वीरुबाई अंकुम राजाच्या केव्हांतरी दृष्टीस पडली आणि तिजविषयीं त्याचें मन मोहित झालें. कित्येक दिवस त्यानें तिला एकांतांत गांठण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. शेवटीं त्यानें हा विचार आपल्या बायकोच्या कानांवर टाकला. प्रथम तिनें ह्या असल्या विचाराचा निषेध केला. पण पतीच्या अनिवार इच्छेमुळें, धाकदपडशानें किंवा शेवटीं त्याच्या वैतागामुळें तिला अखेर ह्या निंद्य गोष्टीस संमति द्यावी लागली.पण वीरुबाई कशी साध्य होईल याचीच तिला शंका होती. ती भेटीचें निश्चित करून राजगडला बहिणीकडे गेली. गंगुबाईला म्हणजे अंकुम राजाच्या पत्नीला मुलें होतीं, मुलीहि होत्या; पण वीरुबाईला मुळींच अपत्य नव्हतें. तिनें अनेक नवस, सायास व व्रतवैकल्यें केलीं पण अजून तिला त्यांत यश आलें नव्हतें. जुनगांवला नदीकांठीं बालेश्वराचें मंदिर आहे. तेथील दैवत जागृत असा त्या वेळीं लोकांचा समज होता व तो अजूनहि आहे. त्याला नवस ठेवण्याकरितां आणि पूजेला म्हणून तिनें बहिणीला तेथें येण्याचा आग्रह केला. परत येतांना जुनगांवला येण्याचें निमंत्रणहि दिलें. त्याप्रमाणें वीरुबाई आपल्या जुजबी लवाजम्यासह जुनगांवला आली.

पुढें संकेताप्रमाणें वीरुबाई बालेश्वराच्या मंदिरांत आपल्या लवाजम्यासह पूजेला गेली असतां तेथें आगाऊच लपून बसलेल्या अंकुम राजा कौशल्यानें तिला पकडून आपली मनकामना पूर्ण करतो व तेथून पळून जातो. वीरुबाई

---

१ सांप्रतचें आसफाबाद शहर. २ मूलवरून पूर्वेस चार मैलांवर असलेलें सध्यांचें खेडें; पण पूर्वीचें इतिहासप्रसिद्ध असें शहर.

त्या असहाय स्थितींत आपलें काळें तोंड परत बहिणीस काय दाखवावयाचें म्हणून तशीच आपल्या लवाजम्यासह राजगडला येते. तिचें आकस्मिक येणें रामजीला ( तिच्या नवऱ्याला ) जरा विचित्रच वाटतें. पण ज्या वेळीं ती त्याला सर्व कांहीं मोकळेपणानें सांगते व मला मारून टाका अशी विनंती करते त्या वेळीं त्याच्यापुढें मोठाच पेंचप्रसंग निर्माण होतो व तो अंकुम राजावर स्वारी करण्यास सिद्ध होतो. "त्याचा जीव घेऊन परत येईन तरच मी तोंड दाखवीन," अशी प्रतिज्ञा करतो. पण त्याची पत्नी त्या विचारापासून त्याला परावृत्त करते. ती त्या वेळीं त्याला म्हणते, "आतां त्याला मारून काय मिळविणार ? माझ्या बहिणीला त्यामुळें मात्र वैधव्य प्राप्त होईल. त्याला अशी शिक्षा करूं या कीं, त्याला त्याचा जन्मभर पश्चात्ताप होईल आणि त्यावर तिनें आपला पति रामजी–मेल्याचें जासुदाकडून गुप्तपणें अंकुम राजाला कळविलें कीं, "मी आपल्या भेटीसाठीं अत्यंत उत्सुक आहे, तरी कांहीं तरी निमित्त काढून लवकर यावें." गांवांताहि रामजी निवर्तल्याची बातमी चौफेर पसरविण्यांत आली व त्या शोकाकुल स्थितींत वीरुबाई असतांना लौकिकदृष्ट्या घरापर्यंत भेटीस येण्याच्या मिषानें अंकुम राजा तेथें आला. दिवसभराचा श्रमपरिहार, विश्राम, भोजनादि प्रसंग आटोपल्यानंतर व सर्व स्थिरस्थावर झाल्यानंतर, वीरुबाईनें त्याला संकेत स्थळीं बोलाविलें व प्रणयलीलांचें सोंग करून लोखंडाच्या तप्त सळाखींनीं ( अर्थात् पतीच्या साहाय्यानें ) त्याचे दोन्ही डोळे काढून त्याला आंधळे केलें. अंकुम राजा तो प्रकार पाहून मनांत चांगलाच वरमला व चरफडला. पण आंधळा झाल्यामुळें कांहींहि करूं शकला नाहीं. उलट आपल्या कृष्ण-कृत्यांचा बोभाटा होऊं नये म्हणून, रात्रौ कशानें तरी आपल्या डोळ्यांस इजा होऊन आपण कायमचे आंधळे झालों, अशीच त्यानें आपल्या बरोबर आणलेल्या लवाजम्याची खातरजमा करून दिली व ताबडतोब जुनगांवला परत गेला.

ह्या आकस्मिक घटनेमुळें त्याची पत्नी गंगुबाई व मुलें यांना फार आश्चर्य वाटलें. पण तेंच सत्य आहे अशी अंकुम राजानें खात्री करून दिल्यामुळें ते सर्व पुढील औषधोपचारास लागले व असेच कांहीं दिवस निघून गेले. पण अंकुम राजाला पुढें पुढें असलें जीवन नकोसें होऊं लागलें

व त्याचा परिणाम फार झपाट्यानें त्याच्या प्रकृतीवर होऊं लागला. तो नेहेमीं आपल्याच चिंतनांत वेळ घालवूं लागला.

कित्येक दिवसांनीं तो अशा विभ्रम परिस्थितींत असतांना त्याच्या तोंडून शब्द निघाले—

नु एम चेशिनाऊ, अंकुबाबा ?
नी नैनालु चेशिनाई—अंकुबाबा ! !

[ तूं काय केलेंस ? खरं म्हटलें तर तुझ्या पापी डोळ्यांनीं हें सारं केलं आणि त्याचं हें फळ तूं भोगून राहिला आहेस. ]

हे शब्द त्याच्या मुलांनीं ऐकले व ते खोदखोदून त्याला विचारूं लागले. कोणीं त्याला दुखविलें असल्यास व त्या व्यक्तीचें नांव कळल्यास आम्ही जाऊन त्याचा नि:पात करूं, असेंहि ते त्याला सांगूं लागले. परंतु अंकुम बाबानें आपल्या नशिबावर हात ठेवून, कुणींच कांहीं केलें नसल्याचें सांगितलें. गंगुबाईनेंहि खरें कारण शोधण्याचा प्रयत्न केला. वीरुबाईकडून कळण्यास कांहीं मार्गच नव्हता व तसें विचारण्यास तिला तोंडहि कुठें होतें ? पण हळूहळू सर्वच गोष्टींचा उकल होऊं लागला, त्यामुळें अंकुम राजाला जीवन अगदीं असह्य होऊं लागलें आणि त्यांतच त्याचा अंत झाला. त्याच्या अंतिम इच्छेप्रमाणें त्याची जुनगांव येथें समाधि बांधण्यांत आली ती आणि बालेश्वराचें मंदिर दोन्हीहि जुनगांवांत अद्यापहि विद्यमान आहेत.

दिवाळीच्या दिवसांत तेथील तेलंगी आबालवृद्ध मंडळी जेव्हां हें 'लोकगीत' गाऊं लागतात तेव्हां त्यांना ते जवळ जवळ आठ दिवस म्हणजे आठ रात्रीं पुरतें व त्याचा कांहीं तेलंगी भागवताप्रमाणें ते उपयोग करतात.

ज्यांना ज्यांना अंकुम राजाची ही गोष्ट माहीत आहे त्यांना त्या समाधीजवळून जातांना अजूनहि असा भास होतो कीं, त्या जुनगांवच्या प्रस्तर परिसरांत त्या नदीकांठच्या बालेश्वराच्या मंदिरांत आणि आसमंतांतील प्रशांत वातावरणांत अंकुम राजाची ती प्रणयकथा जशी कांहीं नुकतीच घडून गेलेली आहे आणि त्या निश्चल समाधींतून अंकुम राजाचे ते अखेरचे पश्चात्तापदग्ध शब्द अत्यंत खोल व विषण्ण आवाजांत ऐकूं येत आहेत:

नु एम चेशिनाऊ, अंकुबाबा ?
नी नैनालु चेशिनाई अंकुबाबा ! !

☆ ☆ ☆

# माकडवाले

[ कुंचेवाले ऊर्फ माकडवाले ही कैकाडयांची पोटजात आहे. ते गांवा-बाहेर सुरड नांवाच्या गवताच्या पालांत उतरतात. त्यांचीं दहा बारा बिऱ्हाडें एकमेळानें असतात व त्यांबरोबर माकडें, गाढवें, बकरीं, कोंबडया, कुत्रीं असतात. ते माकडांचा खेळ करतात व साळी, कोष्टी, धनगर, मोमीन वगैरेंच्या कुंच्या बांधतात. ह्या कुंच्या ते गवताच्या मुळयांच्या करतात; व त्या सव्वा ते दीड रुपयाला विकतात. त्यांच्या बायका इतर बायकांना गोंदतात, शिंदीचे खुळखुळे विकतात वगैरे व सुपें, टोपलीं फोकाठ्यांनीं सांधितात. बायका, पुरुष, पोरें गांवांत भाकरीचे तुकडे व शेतांत धान्य मागतात—(गांवगाडा).

—संपादक ]

संग्राहिका : डॉ. **सरोजिनी बाबर,** एम्. ए. पीएच्. डी.

( १ )

विठ्ठल बाप रुक्मिण आई ।
चंद्रभागे तीरीं कुंडलिक बाई ।
आपली बहिण दुरुची चांदणी ।
उभी होती अंगणीं वाटणी पाही ।
अग माया बहिणी मज चुकविशी ।
मुक्षाची वाट मज दाखविशी ।
मुक्ष मी जाईल विमान पाहील ।
विमानीं कोण चक्रभुज नारायण ।
बंधु माझे दोन द्रौपदीसारखी आपली बहीण ।
जाईल जाईल जिव झाला वारा ।
मझला विठ्ठला न्यावो माहेरा ।
माहेरीं जाऊनी चवरंगीं बस ।
माझें कौतिक पांडुरंग पूस ।
माझें कौतिक धन्यशी देवा ।
आतां विसरीले गुरूंची सेवा ।
जन्माशीं येऊनी सार्थक कांहीं ।

मातेच्या सेवेला अंतरीलें बाई ।
शाखर काठ हरीनाम गाई ।
मावचे बंधू आले भेटावया ।
झालें वर्तमान पूसा बाईला ।
गांवच्या बहिणी आल्या भेटावशी ।
कस्तुरी उटी लावा बाईशीं ।
ओल्या आवळाची केली चौकोनी ।
चांदीची वजरी आहे तिनकोनी ।
अशा वाशील्यात गांवच्या बहिणी ।
राधाबाई बोले निवला माझा माथा ।
अशा दिसनाला हंडा केला रिता ।
न्हावूनी धुवूनी सौभाग्य होती ।
कुकवाचा करंडा घेऊनी हातीं ।
आरसा घेऊनी मूखजी पहाती ।
कुंकवाचा चांदवा कपाळीं लेती ।
सौभाग्य लावूनी नमस्कार करीती ।
सौभाग्य व्रत जाऊं जन्माव्रत ।
चांदीच्या ताटांत कोत्रेला भात ।
पिठी साखरनी भरली मूठ ।
मुळ्या वाळकाच्या केल्या कोशंबिरी ।
कवळ्या काकडीची भाजी झाली थोडी ।
आंबट आमसूल, चटणी सुंदर ।
खोबऱ्याच्या चटण्या कुटिल्या बहू ।
खाजाव खुजाव अनारसे मऊ ।
बुंदीच्या लाडूंचा प्रकार बहू ।
अशा प्रकारांनीं भरील्या राशी ।
असा बंधू नाहीं जग लोकाशीं ।
सोन्याचें घंगाळ, चांदीचे गडवे ।
तिथं माझा बंधू कुंडलिक नांद ।
अंगीं चोळी दाट कानीं कापलाउ ।

बोळवण केली बंधू कुंडलिकानं ।
उकला साडी चोळी ।
भरा बाईची ओटी ।
ओल्या नारळाचे प्रसाद वांटी ।
रथांत बैसली धुयाचें पाई ।
कुंडलिक बंधू परतूनी पाई ।
रथांत बैसली मनीं चिंतावली ।
नगरीच्या नारी उभ्या होत्या दारीं ।
कवा आल्या राधाबाई आपुल्या घरीं ।
काय सांगू बाई माहेराच सुख ।
आतां विसरले प्रपंच दुःख ।

( २ )

राहू केतु सूर्यदेवाला ।
येरे शनी देवा सोडवी आम्हां ।
फार फार झाली दैना ।
शनी देवा सोडव्या नंदना ॥
सारे दैत गेले तुम्हा जागना ।
देवा शनी देवा सोडव्या नंदना ॥
राया विक्रमाशीं शनीदेव आले ।
साडेसात वर्ष झाले ।
फार फार झाली दैना ।
श्री शनीदेवा सोडव्या नंदना ॥
गुरु महाराजाशीं शनीदेव आले ।
सव्वा प्रहर येतों म्हणूनी ।
लोखंडाचा सूळ केला ।
सव्वा प्रहरांत केला मातेरा ।
देवा शनीदेवा सोडव्या नंदना ॥

( ३ )

उठरे हरी करी आंगोळ ।
वाजंत्री बहू मंजूळ

पाणीयाशीं आधाण आलें
द्राड कारडं निघून गेलं
हरी हरी रे हीच का शाळेची वेळ ।
उठरे हरी करी आंगोळ ।
चंदनाचा पाट वर बसविले रघुनंदन
शेंडीशीं लावूनी तेल ।
आतां येशवदा विनवी हरीला ।
शाळेश्शीं उशीर झाला
संवगडी उंभे दारांत

## ( ४ ) रामाचा पाळणा

पैल्या दिवशीं बोलली गंगा ।
नका बायांनो, करूंया दंगा ।
दशरथ राजाला जाऊन सांगा ।
घोडी उभी पाचीया रंगा, जु जु बाळा जु ॥

दुसऱ्या दिवशीं बोलली भागा ।
निराकार होईल जागा ।
बायांनो तुम्ही चरणाशीं लागा ।
चुड्याचे दाण रामाला मागा, जु जु बाळा जु ॥

तिनव्या दिवशीं बोलली उमा ।
बाळाच्या रूपाची लागेल सीमा ।
असा बोलीतो महादेव भिमा, जु जु बाळा जु ॥

चवथ्या दिवशीं बोलली तारा ।
सोनार आना आपल्या घरा !
बाण धनुष्य रामाला करा, जु जु बाळा जु ॥

पांचव्या दिवशीं बोलली सटवी ।
रामाची सीता रावणानें नेली ।
कशी देवा निद्रा लागली ।
मारुती गेला लंका जाळली, जु जु बाळा जु ॥

सहाव्या दिवशीं बोलली जणा ।
शक्ती लागली लक्ष्मणाला
मारुती गेला पाडा आणाला ।
जिवंत गेला उमलापती, जुजु बाळा जु ॥

सातव्या दिवसीं साती कलींग कोळ ।
राम जन्मला रूप मंजूळ ।
सूर्या मंडळ गर्जी आसमान ।
मारुती आला निळ घेऊन ।
राम निवाला रावणाचा काळ, जु जु बाळा जु ॥

आठव्या दिवशीं बोलली लीला ।
पुत्र झाला हा दशरथ राजाला ।
कौसली मातानें झोका दिला, जु जु बाळा जु ॥

नवव्या दिवशीं नवल बाळाचं ।
अशी खुलती कळी कमळाची ।
प्रसुद झाली त्या वेळाची, जु जु बाळा जु ॥

दहाव्या दिवशीं बोलली गजा ।
संगें घेऊन वैनेरी फोजा ।
आदीं जावून रावण वधा ।
इंद्रादिताच्या उडव्या भूज्या ।
बेबी सिनं केल मुलकाचा राजा, जु जु बाळा जु ॥

आकराव्या दिवशीं आकरावा रंग ।
दास रामाचा उभा भजरंग ।
आसू देवानं लावीला छंद ।
पांच हत्यार रामाच्या संग, जु जु बाळा जु ॥

बाराव्या दिवसीं बिजली बत्तीचा प्रकाश भारी ।
लिला ती पडल्या राजमंदीरीं ।
तेतिस कोटी देव जमले त्याच्या दरबारीं, जु जु बाळा जु ।

☆ ☆ ☆

# वारली समाज

संग्राहक : श्री. **शिवनाथ सखाराम जाधव,** अहमदनगर कॉलेज.

## मोखाडचे आदिवासी

[ या आदिवासींत मुख्यतः वारली येतात; त्या खालोखाल कातकरी व क–ठाकूर आणि म–ठाकूर येतात. ]

**पाडेः**—आदिवासींच्या जीवनाविषयीं विचार करावयाचा म्हणजे पाड्याचा उल्लेख करणें अत्यावश्यक आहे. कारण ज्याप्रमाणें प्राणाशिवाय शरीर व्यर्थ आहे, तद्वतच पाड्याविना आदिवासीच होणें अशक्य आहे.

आपल्याकडे ज्याप्रमाणें एका गांवास अनेक वाड्या असतात, त्याचप्रमाणें त्या कोंकण भागांतील गांवास पाडे असतात. प्रदेश अति डोंगराळ असल्यामुळें आणि शेती गांवापासून खूप दूर असल्यामुळें मुख्य गांवांत राहून कोंकणांतील लोकांना शेती संभाळणें अगदीं अशक्य आहे. म्हणून ज्याचें शेत गांवापासून थोड्याशा अंतरावर आहे तो आपल्या शेतांत जाऊन राहतो. त्याच्या मागोमाग अनेक शेतकरी जातात आणि त्याच्या शेजारीं वसती करतात. सर्वप्रथम जो जाईल त्याच्या नांवावरून अथवा एखाद्या विशिष्ट कारणावरून त्या वसतीस नांव पडतें; उदा.—गांगुरपाडा येथें गांगुर्डे या आडनांवाचे बहुसंख्य लोक राहतात म्हणून यास असें नांव पडलें. तसेंच सूर्यमाळ, हा प्रदेश अत्युच्च आहे म्हणून सर्वांच्या अगोदर येथील लोकांना सूर्यदर्शन होतें; म्हणून ह्या पाड्यास सूर्यमाळ संबोधण्यांत येतें. ह्या पाड्यांत दोन घरांपासून तों जास्तींत जास्त साठ घरापर्यंत घरें असतात. घरें चौमाळी असतात. घरें छोटींच असतात, पण दिसण्यांत सुंदर व टापटिपीनें व्यवस्थित असतात. भिंती कुडाच्या असतात. घरामध्यें एक लाकडी अथवा दगडी उखळ आणि मुसळ असतें. स्वयंपाकासाठीं घराचा $\frac{1}{8}$ भाग कूड घालून बंद केलेला असतो. या भागांत स्वयंपाकाचीं सर्व साधनें ठेवलेलीं असतात. चूल तीन दगडांची अथवा ओबडधोबड बनविलेली मातीची असते. ती मध्येंच ठेवलेली असते. कारण कूड पेटण्याची भीति असते. धन्याजवळ जर शेळ्या असल्यास त्या घरांतच असतात. त्यांच्यासाठीं स्वयंपाकभागाच्या विरुद्ध

$\frac{1}{4}$ भाग कुडविलेला असतो. गाया क्वचित् घरांतच असतात, अथवा त्या पडवींत बांधतात. मात्र पडवी कूड घालून बंद करावी लागते. हीं जनावरें आंत बांधण्याचें कारण म्हणजे हे लोक फार शंकेखोर असतात. त्यांना चोरांची आणि चेटकिणींची फार भीति असते. म्हैस तर ह्या लोकांच्या पाशीं टिकत नाहीं.

घराच्या समोरच खडकावर मातीचें आळें करून त्यांत ऐसपैस पसरलेली तुळस वाऱ्यानें डोलत असते. तुळशीस हे लोक देवीसमान मानतात. तुळशीचें लग्न लावण्याची पद्धत ह्यांच्याकडेहि आहे. रात्रीं तुळशीच्यासमोर गोड्या तेलाचे दिवे पाजळतात.

**पाडेखोतः**—ज्या इसमानें आपल्या पाड्यांत प्रथम वसति केलेली असेल, त्यास पाडेखोत (पाडेखुद) असें म्हणतात. पाड्याचा सर्व कारभार तोच पाहात असतो. वरचेवर सभा बोलावून लोकांच्या अडीअडचणी पाडेखोत लक्षांत घेतो. समजा एखाद्या जवळ बैल नाहींत त्यामुळें त्याची शेती पडीक राहण्याची वेळ येते. मग पाडेखोत सभा बोलावतो व पाड्यांतील सर्व लोकांस त्याला मदत करावयास सांगतो. हा पाडेखोत त्या पाड्याचा पाटीलच समजावयास हरकत नाहीं. मात्र पाटील हा सरकारी नोकर असतो. आणि त्यामुळें त्याचा संबंध सरकारशीं असतो. म्हणून त्याच्यावर एका बाह्य शक्तीचें वजन असतें. तसें पाडेखोताचें नसतें. मात्र पाटील व पाडे यांमधील दुवा पाडेखोत असतो.

पाडेखोत हा चांगला असेल, निर्व्यसनी असेल तर त्या पाड्याचा कारभार सुरळीत चालतो. जर पाडेखोत कनवाळू असेल, प्रजाहितदक्ष असेल तर पाड्यांतील लोक सुखी असतात. मात्र तो जर दुर्व्यसनी असेल तर पाड्यांतील लोकांना त्याच्यापासून त्रास भोगावा लागतो. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, बहुतेक पाडेखोतांना, दारूचें घातकी व्यसन असतें. त्याच्या सहवासांत आणखी लोक दारुडे बनतात. हे लोक इतर बाबतींत फारच चांगल्या वागणुकीचे आणि सुस्वभावाचे असतात.

**आदिवासींचा स्वभाव**—हे लोक दिसावयास फारच गरीब स्वभावाचे दिसतात. पण आंतून धूर्त आणि कावेबाज असतात. आपल्या शेजाऱ्याची चांगली गोष्ट त्यांना अजिबात खपत नाहीं. त्यामुळें राहण्यांत हे

सर्व लोक एकपोषाखी असतात. आणि पोषाख तो कोणता ? तर एक लंगोटी, कुडतें आणि असलें तर पागोटें; आणि हे कपडे फक्त घेतल्यापासून फाटेपर्यंत एकदां धुतात. कारण विचारल्यास सांगतात कीं, कपडे नेहमीं धुतल्यास फाटतात. आणि दुसरें असें कीं, कपडे धुऊन तरी काय करावयाचें ? अशी यांची समजूत असते. अलीकडे मात्र कांहीं लोकांचे दोन पोषाख असतात. कोठें गांवास जावयाचें ठरल्यास राखीव पोषाखाचा उपयोग करतात. मात्र एखादा सुशिक्षित नोकर असल्यास तो मात्र साहेबाच्या पोषाखांत वावरतो. मग तो रेल्वे मजूर असो अथवा साधा व्हालंटरी शाळेचा शिक्षक असो.

पाडयांतील विशिष्ट व्यक्तीवर अथवा परक्या पण परिचित व्यक्तीवर यांचा मोठा विश्वास असतो. त्यांच्या शब्दास ते प्रमाण मानतात. मात्र अपरिचित व्यक्तीशीं ते बोलणार देखील नाहींत.

कांहींहि झालें तरीं लोक मोठे आनंदी वृत्तीचे आणि गोड स्वभावाचे आहेत. खाण्यापिण्यास योग्य प्रकारचें नाहीं, जीवाचें रान केल्याशिवाय खावयास मिळावयाचें नाहीं, तरी पण सणाच्या वेळेला, लग्नप्रसंगीं आणि इतर सामाजिक कार्याच्या वेळला सर्व लोक एकत्र येतील, खूप गाणें गातील, खूप नाचतील आणि एकमेकांची खूपच थट्टा करतील. एकंदरींत सामाजिक जीवन मोठें रंगेल वृत्तीचें असतें.

**उद्योग व आर्थिक जीवन**—प्रदेश डोंगराळ, त्यामुळें खूप उत्पन्न देणारी शेती नाहीं. जमीन माळरानची असते. अशा माळरानांत नागली, तूर, खुरासनी, उडीद ह्यांसारखीं पिकें होतात. लवणाच्या ठिकाणीं अगदीं थोडीशी जमीन असते. अशा जमिनींत भात लावतात. एकंदरींत जमिनींत खूपच कष्ट करावे लागतात. राब करण्याचा एक विशिष्ट प्रकार ह्या लोकांमध्यें आहे तो असा—

पावसाळा संपून उन्हाळा लागला म्हणजे रानांतील गवत वाळतें. हें सर्व गवत एका ठिकाणीं दांतळानें व विळयानें गोळा करतात. नंतर उभ्या झाडांचीं पानें तोडतात आणि मग जमीन नांगरतात. ढेकळें फोडतात. पाणी घालून जमीन गादीप्रमाणें सपाट करतात आणि त्या भुसभुशीत जमिनीवर जमवलेल्या गवताचा थर देतात. त्यांतच झाडाचीं पानें असतात. नंतर

यावर पातळ मातीचा थर देतात आणि मग हें गवत पेटवतात आणि अशा प्रकारें जमिनीस खताचा पुरवठा करतात. पहिल्या पावसाच्या आंत हीं सर्व कामें व्हावींच लागतात; त्यामुळें शेतकऱ्यांना उन्हाळाभर शेतीचें काम पुरतें. पाऊस पडला कीं लगेच पेरणी करतात, अथवा पावसाच्या अगोदरहि पेरणी करतात. भात आणि नागली ह्यांचीं रोपें तयार करून तीं पाऊस पडल्यावर लावावीं लागतात. त्यासाठीं गाळ–जमिनीची खूपच मेहनत करावी लागते. उभ्या पावसांत गाळ तुडवावा लागतो आणि दिवसभर ओणवें होऊन रोपें लावावीं लागतात. रोपें लावण्याच्या शेवटच्या दिवशीं दिवसभर स्त्रिया व पुरुष एकत्र खेळतात आणि खूप एकमेकांची थट्टा करतात. हा दिवस त्यांचा आनंदाचा असतो; कारण येथूनच पुढें तीन महिने कामाचा खरा हंगाम संपलेला असतो. खुरपणी करण्यासारखीं किरकोळ कामें करावीं लागतात. शेवटीं पीक निघण्याच्या वेळेस खळें करावें लागतें. त्या वेळेस ह्यांचा एक विधि ठरलेला असतो. तिव्हड्याखालीं नारळ पुरावा लागतो; पंचमहाभूतांना संतुष्ट करण्यासाठीं बकरा मारावा लागतो आणि त्याचें रक्त दोंही दिशांना शिंपडावें लागतें. खळ्यांत निरनिराळ्या धान्यांच्या राशी होतांना असे विधी होतात. इतकेहि कष्ट करून धान्य जेमतेम पोटापुरतेंच होतें. इतर खर्च करण्यास धान्य विकल्याशिवाय पैसा नाहीं. त्यामुळें पोटास चिमटा घेऊन बाजारच्या दिवशीं धान्य विकावयास नेतात व त्यांतून हळद, मीठ, मिरची, कपडे ह्यांसारखे जिन्नस खरेदी करावे लागतात.

ज्यांना अजिबात शेती नाहीं अशा कातकरी आणि ढोर कोळी-सारख्या आदिवासींना नेहेमीं उदरनिर्वाहासाठीं भटकावें लागतें. लाकूड तोडणें, खडी फोडणें, यांसारखीं कामें करावीं लागतात. ह्यांचें आर्थिक जीवन फारच मागासलेलें असतें.

**आदिवासींचे देव**:—आदिवासींची ग्रामदेवता वाघ्या. ह्यासच लोक चव्हाट्या असेंहि म्हणतात. गांवाच्या आसपास विशेषतः पूर्वेला वडापिंपळाच्या झाडाखालीं ह्या दैवताचें स्थान असतें. खैराच्या अथवा सागाच्या लाकडावर वाघाची आकृति कोरून ह्या सबंध लाकडास माणसाचा आकार देतात आणि हें लाकूड वडापिंपळाच्या सावलींत रोवतात. तोंड पूर्वेकडे असतें. देव बस-वितांना एक विधि करावयाचा असतो. ऐन मध्यरात्रीं सर्व पुरुष-मंडळी

एकत्र येतात. वाघ्याची मूर्ति खांद्यावर घेतात. बळी देण्याचें बकरें बरोबरच असतें. मग सर्व लोक उघडे होतात आणि वाघ्यास सर्व गांवांतून फिरवून आणतात. हे वाघ्या, तूंच आमचें अधिदैवत आहेस; तुझी कृपा जर आमच्यावर असेल तर आमच्यावर कोणतेंच संकट येणार नाहीं; तुझ्या कृपेनेंच आमचीं शेतें पिकतात; तुझ्या कृपेनेंच आमचें रोगराईपासून संरक्षण होतें; तूंच आमचा कर्ता आहेस; अशा प्रकारें वाघ्यास आळवितात. शेवटीं त्यास ज्या ठिकाणीं बसवावयाचें त्या ठिकाणीं आणतात. भगताच्या साहाय्यानें होम करतात आणि अनेक बकरीं, कोंबडीं बळी देतात व दारू शिंपडतात.

हिरवा व चिता हीं आदिवासींचीं कुलदैवतें. कुळांतील मुख्य घराण्यांत हे देव असतात. हा देव म्हणजे एक प्रकारचा कुंचाच असतो. एका लाकडी मुठीला मोराच्या पिसांचा कुंचा तयार करतात. ह्या कुंच्यांत गोफाच्या ठिकाणीं हिरव्या देवाची एक सोन्याची व एक चांदीची अशा दोन मूर्ति आंत ठेवलेल्या असतात. हा कुंचा लाल वस्त्रांत गुंडाळून ठेवलेला असतो. हीं वस्त्रें एकावर एक अशीं अनेक असतात. कारण, ज्याचें लग्न होईल अशा सर्व पुरुषांचे शेले ह्या देवावर घालण्याची प्रथा असते. त्यामुळें चिमुकल्या हिरव्यावर खूप वस्त्राचें ओझें झालेलें असतें. सणावारासच हीं वस्त्रें पूजा करण्यास सोडलीं जातात. पण पूजा करून परत गुंडाळलीं जातात.

चिता ( चित्ता ) देव ह्या मागें मुठींत असतो. तो अंगठीच्या आकाराचा असतो; ही अंगठी दोऱ्याच्या साहाय्यानें मुठीस लोंबती बांधलेली असते. चिता हा क्रूर श्वापदापासून संरक्षण करतो आणि हिरवा हा ग्रह-गंडांतरें दूर करतो, अशी ह्यांची समजूत आहे.

मृतात्म्यांनीं आपणांस त्रास देऊं नये म्हणून आदिवासी त्यांना देवाप्रमाणें मानतात, त्यांची पूजा करतात, क्वचित् नवसहि करतात. ह्यांना ‘ वीर ’ संबोधण्यांत येतें.

आदिवासी महालक्ष्मीची पूजा करतात. ही पूजा आश्विन शुद्ध द्वादशीस असते. कारण ह्या वेळेस पिकें ओथंबलेलीं असतात. अर्थात् ही वनदेवीची कृपा म्हणून ह्या दिवशीं आदिवासी देवीची पूजा करतात. त्या वेळेस पोळ्यापाळ्यांचा सण करतात आणि ह्या दिवसापासून तो

दिपवाळीपर्यंत रात्रीं प्रत्येक पाड्यांत नाच रंगलेला असतो. दिपवाळी आपल्याप्रमाणेंच साजरी करतात. मात्र नाचाची चाल अधिक आहे.

आदिवासींना नीति शिकविणारा देव नांदेर. त्यास हे लोक नारनूदेव म्हणतात. नारनूदेवाच्या अनेक नैतिक कथा सांगून आदिवासी पंच अनेक प्रकारच्या गांवगुन्ह्यांचा न्याय देतो.

ह्याशिवाय धरतरी, परमेसर ( पाऊस ), गायतरी ( गायत्री ), वनदेव, बेल, उंबर, तुळस, पिंपळ ह्यांना आदिवासी देव मानतात व त्यांची पूजा करतात.

**हिरव्याची जन्मकथा**--एक वाडवीन ( म्हातारी ) रानांत गुरें चारीत होती. एक दिवशीं भयंकर पाऊस आला. थोड्या वेळांत पाऊस उघडला. नदीला खूप पूर आला. म्हातारी तीरावर मजा पाहात उभी होती. इतक्यांत तिला एक सोन्याची मूर्ति पाण्याबरोबर वाहात येतांना दिसली. म्हातारी गुडघाभर पाण्यांत शिरली. मूर्ति तिच्या समोर आली. ती मूर्ति घेऊन म्हातारी संध्याकाळीं घरीं आली. तिनें ती मूर्ति शिंक्यावर ठेवली. रात्रीं घरास आग लागली. सर्व माणसें बाहेर पळालीं. मूर्ति देखील शिंक्यावरून खालीं उतरली आणि बाहेर जाऊं लागली. पण दारांत जों आली तों दाराचा उंबरा उंबराचा बनवलेला. उंबरास आदिवासी देव मानतात. एक देव जवळ असतांना दुसऱ्या देवानें पळून जाणें बरोबर नाहीं, म्हणून ती मूर्ति उंबऱ्यांतच थांबली. घर विझून शांत झालें. म्हातारीला देवाची आठवण झाली. ती धांवत धांवत घराकडे आली तों मूर्ति तिला उंबऱ्यांत उभी दिसली. आगीचा कांहींच परिणाम मूर्तीवर झालेला नव्हता. हें पाहून घरांतील सर्व लोकांस आनंद झाला. ते ती मूर्ति घेऊन सोनाराकडे गेले आणि सांगितलें कीं, ह्या मूर्तीसारखीच आम्हांला दुसरी मूर्ति घडवून दे. पण सोनारानें नकार दिला. कारण ज्या देवाला अग्नि जाळू शकत नाहीं अशा देवाला सोनार कसा घडवूं शकणार ?

तेव्हां देवाला जतन करण्यासाठीं त्याला मोराच्या पिसांत गुंडाळून ठेवण्यांत आलें. हीच प्रथा कायम चालू झाली. पुढें पुढें त्यास लग्नशेले गुंडाळून जखडून टाकण्यांत आलें आणि आज देखील ही हिरव्याची मूर्त ह्याच स्वरूपांत पाहण्यास मिळते.

**पृथ्वीचा जन्म**—एकदां शंकरानें दरबार भरविण्याचें ठरविलें तेव्हां नारनूदेवाला आणि बरहमदेवाला सर्व देवांस बोलाविण्यास पाठविलें. हे दोघे स्वर्गांत गेले आणि त्यांनीं ढगेसर, परमेसर ( पाऊस ), इजेसर, गरजेसर, सुरेसर, चंदरसर या सर्वांना महादेवाचा विचार कळविला. त्यावर त्या सर्वांनीं ह्या गोष्टीस नकार दिला, कारण ते सर्वजण त्याच्या कामांत तत्पर होते.कामांत कोठल्याहि प्रकारची ढिलाई नसतांना ह्या कटकटीचें काय कारण असें सांगून ह्या सर्वांनीं नारनूदेव आणि बरहमदेव ह्यांना परत पाठविलें.

नंतर नारनूदेव व बरहमदेव हात हालवीत शंकरापाशीं आले आणि घडलेला प्रकार त्यांनीं मोठ्या लीनतेनें महादेवास सांगितला.

आपल्या चाकरांनीं आपला अशा प्रकारें अपमान करावा ही गोष्ट शंकरास खपली नाहीं. त्यानें आपला तिसरा डोळा उघडला आणि सर्व विश्व सागरांत बुडविलें. सारखीं बारा वर्षें ही पृथ्वी पाण्यांत ठेवली. शंकर, पार्वती, नारनूदेव व बरहमदेव सारखे पाण्यांत पोहत होते. त्यांना भेटण्यास मनकेसर आला आणि त्यानें शंकरास विनंती केली कीं, झालें तें झालें; आतां आपण दुसरें जग निर्माण करावें. भोळ्या सांबाचा राग शांत झाला आणि ते नवें जग तयार करण्यास लागले. पण जग तयार करण्यास माती कोठें होती ? तेव्हां शंकरानें नारनूदेवास कुंभारीन[1] नांवाच्या प्राण्याकडून माती आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नारनूदेव माती घेऊन आला. ह्या मातीच्या महादेवानें दोन चाणक्या केल्या; त्या एकमेकांवर ठेवल्या. पण त्या बाजूला होईनात. कारण, त्यापैकीं पृथ्वी व दुसरीपासून आकाश तयार करण्याचें होतें. तेव्हां ह्या चाणक्या वेगळ्या करण्यास- भीमशक्ति नांवाच्या बलाढ्य व्यक्तीस बोलाविण्यास सांगितलें. भीमशक्तीनें आपल्या बलाच्या सामर्थ्यानें ह्या चाणक्या वेगळ्या केल्या. त्या जसजशा दूर जाऊं लागल्या तसतसा त्याचा आकार मोठा होत गेला. सारख्या परस्परांपासून दूर जाऊं लागल्या. तेव्हां बरहमदेवानें व्हकारी घालून परस्परांस थांबविलें.

नवें जग निर्माण झालें खरें, पण तें अगदींच लिबलिबीत होतें.

---

१. कुंभारीन—कुंभारीन ह्या नांवाचा एक हिरव्या रंगाचा प्राणी असतो. तो भिंतीला मातीचें घर करतो. तसेंच दगडाला वा लाकडाला देखील त्याचें घर असतें.

त्यावर चालतां येईना म्हणून शंकरानें एका खडे घोळशा[1] प्राण्याकडून खूप खडे मागविले आणि ते ठिकठिकाणीं ठेवले. त्यापासूनच पुढें पर्वत व खडक निर्माण झाले. अशा प्रकारें नवें जग तयार झालें.

कोणत्याहि रोगानें पछाडलेला मनुष्य तो अगोदर भगतास दाखवितात. भगतावर त्याचा पूर्ण विश्वास असतो. भगतास ज्योतिष देखील समजतें.

गांवांत एखादी रोगाची साथ आली तर वाघ्याचा कोप झाला असें समजतात. पाऊस वेळेवर न पडला तर वाघ्याचा कोप झाला असें समजतात; अथवा पिकावर रोग पडला तरी वाघ्याच्या पूजेंत कांहीं तरी घोटाळा झाला असें समजतात. मग अशा वेळीं भगतास बोलावतात आणि मग भगतास गाऱ्हाणें सांगतात.

भगत सुपांत तांदुळ घेतो ते मुठींत घेऊन दोनदां तीनदां मोजतो व तोंडानें कांहीं तरी पुटपुटतो. ह्या वेळेस गांवांतील सर्व लोक कामधंदा टाकून भगताच्या समोर एकाग्र चित्तानें बसतात. मग भगत सर्वांना खड्या आवाजांत सुनवतो कीं, तुमच्यापासून अमुक अमुक चूक झाली आहे. त्यावर गांवकरी गुन्हा कबूल करतात आणि त्यावर उपाय काय ? असें भगतास विचारतात. मग भगत सांगतो कीं, हें गंडांतर जाण्यासाठीं तुम्हांला इतकीं बकरें आणि इतकीं कोंबडीं द्यावीं लागतील. ह्याशिवाय दारू निराळीच.

लगेंच सर्व सामान जमवतात आणि ह्या सर्वांचे बळी वाघ्यास देतात. मांसांतील राखीव वांटा भगताच्या बाजूला काढून उरलेल्या मांसाचे समान वांटे करून ते घरोघर घेऊन जातात आणि मग रात्रीं मजेदार मेजवानी होते. मग सर्वजण एकत्र येऊन दारू पितात. वरील विधि करण्यास कसेहि सात आठ दिवस लागतात. तोंपर्यंत वाघ्याचे तितके बळी घेऊन साथ थंडावते. पण ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. आणि सर्वांची खात्री होते कीं, देवाचाच कोप आपल्यावर झाला होता. देवाचें देणें देवास दिल्याबरोबर कशी साथ बंद झाली !

१. खडे घोळशा—हा एक उंदरासारखा प्राणी असतो. तो नेहेमीं बिळांत राहतो. त्याच्या बिळाच्या दाराशीं खूप खडे पडलेले असतात.

वाटी चालविणें:—एखाद्या इसमाची गाय उडवली अथवा गांवांतील एखादा मनुष्य रोगानें आजारी पडला तर गांवांतील एखाद्या चेटकीनें हें संकट आणलें असें सर्वांना वाटतें. मग लगेच भगताला बोलाविलें जातें. भगत गांवांतील सर्व स्त्रियांना एकत्र बोलावतो आणि रंगण धरून त्यांना उभें करतो. मध्यभागीं थोडीशी जागा सारवली जाते. त्या जागेवर तांदूळ अंथरले जातात. त्या तांदळावर एक वाटी ठेवतात मग भगत जादूचे भार त्या वाटीवर घालतो. लगेच ती वाटी ज्या बाईनें चेटूक केलें असेल त्या बाईकडे जाते. मग ती बाई नाइलाजानें गुन्हा कबूल करते. मग त्या बाईस सर्वांसमक्ष भगत चांगला सटकावतो.

भगत हा विद्येंत चेटकिणीपेक्षां श्रेष्ठ असतो. त्यामुळें भगतास ह्या चेटकिणी थरथरां भितात.

रोग्याची खडी पाहणें—एखादा मनुष्य आजारी पडला कीं, ताबडतोब भगतास बोलावण्यांत येतें. भगतहि आलेली संधि दवडीत नाहीं. तो लगेच रोग्याच्या अंथरुणापाशीं जातो. रोग्याच्या शरीराची तपासणी करतो, नाडी पाहतो आणि बाहेरावा आहे कीं अंगरोग आहे, हें ताबडतोब सांगतो. अंगरोग असल्यास जंगलांतील वनस्पति देतो आणि बाहेरावा असल्यास दिवा हेरावा लागतो. दिवा हेरणें म्हणजेच खडी पाहणें.

सुपांत तांदूळ घेतले जातात. त्या तांदळावर दिवा लावला जातो. मग भगत एक मूटभर तांदूळ घेऊन ते रोग्याच्या अंगावरून चारपांच वेळां उतरतो. दिव्यावरून फिरवतो. कांहीं तरी मंत्रानें ते तांदूळ तो भारतो. मग मनांतल्या मनांत एखाद्या देवाचें नांव घेऊन ते भगत मोजतो. आणि ह्यावरून अमुक अमुक देवाचा कोप तुमच्यावर झाला असें भगत सांगतो. मग पुढचा विधि ठरलेलाच आणि समजा चेटाकिणीची करणी असेल तर वाटी चालविण्याचा प्रयोग केला जातो.

**हेडली** ( हडगळ )—गरोदर स्त्री वारली म्हणजे ती भूत होते आणि एखाद्या अडचणीच्या ठिकाणीं झाडाला झोळी बांधून आपल्या मुलास हलवीत बसते. ही हेडली रस्त्यानें मनुष्य चालला असतांना ताटकळ त्याचें नांव घेऊन हाक मारते. आणि म्हणते कीं, "हे अमक्या अमक्या, मला येऊं देना! इतका कां बेइमान झालास?" आणि इसमानें मागें वळून



वारल्यांचे भगत



ठाणें जिल्ह्यांतील आदिवासींचा तमाशा

पाहिल्यास तो तिला पाहून भेदरतो आणि कांहीं दिवसांनंतर दगावतो; असा या लोकांचा अनुभव आहे. आणि असा दगावलेला मनुष्य जर पुरला, तर तो ह्या हडमळणी उकरून नेतात आणि समान वांटे करून खातात.

पण अशी हडगळ होऊं नये म्हणून एक उपाययोजना आहे, पण ही गोष्ट फार हृदयंगम आहे. ती अशी गरोदर स्त्री मेली म्हणजे तिचें पोट फाडतात व आंतील मूल काढून घेतात. नंतर तिच्या पोटांत शिजविलेला भात भरतात आणि पोट परत शिवून टाकतात. नंतर पोर एका बाजूला पुरतात आणि बाईच्या कपाळास व पायाच्या अंगठ्यास भारलेल्या टांचण्या ठोकून तिला जाळून टाकतात.

**वशीकरण**:—कोंकणांतील कांहीं स्त्रिया व कांहीं पुरुष जादू करण्यामध्यें अगदीं प्रवीण असतात. त्यांना वशीकरणादि अनेक विद्या येत असतात. समजा एखाद्या स्त्रीला एखादा पुरुष पसंत पडला तर ती त्याला आपल्या घरीं कांहीं दिवस ठेवूं शकते. तसेंच एखाद्या पुरुषाला एखादी स्त्री जर पसंत पडली तर तो त्या स्त्रीला आपली सहचारिणी करूं शकतो. पण नैतिक बंधनामुळें अशीं उदाहरणें क्वचितच घडतात.

**चेड्याचा प्रकार**:—चेडा हे आदिवासींचें दैवत आहे. चेडे सात प्रकारचे; म्हणजे एक तोंड्या, दोन तोंड्या, तीन तोंड्या असे सात तोंडाचे चेडे असतात. हे चेडे जारण-मारणाचें काम करतात. चेडे हे गुळगुळीत गोटे असतात. त्यांचा रंग काळसर जांभळा असा असतो. हे चेडे घरांत कोठेंतरी पालथे पुरलेले असतात. हे चेडे ज्यानें बाळगलेले असतात त्याच्या-वर चाल करूं शकत नाहींत. मात्र तो सांगेल त्याच्यावर ते चाल करूं शकतात. मात्र तो चेडा त्याच्या घराच्या आसपास नेऊन पुरावा लागतो. हे चेडे विशिष्ट काम करणारे असतात. जो चेडा धन मिळवून देण्याचें काम करतो त्याला धन-चेडा असें म्हणतात. जो चेडा प्राण घेण्याचें काम करतो त्यास प्राण-चेडा असें म्हणतात. पण हे चेडे पाळणें फारच कठीण असतें. कारण त्याच्या सेवेंत थोडासा बदल झाला कीं, ते बाळगणाराच्या अंगावरच उलटतात.

**धवलेरी**:—आदिवासी लोकांचे लग्नासारखे विधि करणारी एक स्त्री असते. ती मंत्रतंत्र, जादूटोणा तसेंच लग्नविधीमध्यें प्रवीण असते, ही

विद्या ती भगताकडून शिकलेली असते. भगत ही विद्या तिला एकांतांत शिकवीत असतो. हे मंत्र ती घरीं आल्यावर आणि सर्व माणसें झोपल्यावर एका कोपऱ्यांत बसून पठण करीत असते. पुढें पुढें ती सांगते कीं, हे मंत्र मला देवीनें रात्रीचे शिकविले. अर्थात् तिच्यावर देवीची कृपा झाली, ती एक थोर स्त्री आहे, असें मानून आदिवासी तिला चांगला मान देतात. ज्या स्त्रीला मंत्राविधि चांगले येत नाहींत तिला अघोरी धवलेरी असें म्हणतात.

लग्न लावणारा जर पुरुष असेल तर त्यास ' मेदिंग्या ' म्हणतात.

**खाल:**—खाल करण्याची एक विशिष्ट पद्धत आहे. पाऊस पडत नसला, अथवा पिकाची नासाडी होत असली म्हणजे गांवांतील वा पाडयांतील तरुण मंडळी गांव सोडून गांवापासून लांब अंतरावर आणि एकान्त स्थळीं जातात. त्यांच्याबरोबर भगत देखील असतो. रानांत गेल्यावर तेथें ते मांडव घालतात. भगत त्यांना मंत्र जपावयास लावतो. त्यांना पथ्यें फार असतात. स्त्रीच्या कंकणाचा नाद देखील ऐकावयाचा नसतो. स्त्रीच्या हातचें कांहीं खावयाचें नसतें. मोठया पहाटेस उठून व हातांत घोळकाठया घेऊन स्नानासाठीं ओढ्यावर जावें लागतें. तिकडून शेतांना काठया फिरवीत यावें लागतें. नंतर जेवण करतात. दुपारचा वेळ झोपा काढून घालवितात. हें तप चालू असतांना घरची अजिबात काळजी करावयाची नसते.

संध्याकाळीं पांचच्या सुमारास वारें घेण्यास बसतात. ज्याच्या अंगांत येत नसेल त्याच्या समोर खुळखुळें वाजवतात आणि मोठमोठ्यानें आरोळ्या ठोकतात. नंतर ज्याच्या अंगांत संचारून येतें त्यास वारें आलें असें म्हणतात. मात्र हीं वारीं बोलतीं नसतात. आणखी पांच वर्षांनीं हें वारें बोलतें होतें मग त्याच्यापाशीं गाऱ्हाणीं लावलीं जातात.

अंगांत आल्यावर हे कांहींहि करूं शकतात. कोणी झाडाला पाय उलटे टांगून झोके खेळतें. कोणी झाडाला टकरी घेतें. कोणी खैराच्या इंगळाच्या गोळ्या करून खेळतात. वाटेल त्या संकटास तोंड देतात आणि जोंपर्यंत वारें अंगावर आहे तोंपर्यंत त्यांना कोणत्याहि प्रकारचा अपाय होत नाहीं.

वारें बोलतें झाल्यावर कोंबडें कापावें लागतें. भगत एक आटवर्ते कोंबडें घेतो. तें वाऱ्यास न कळत लांब कोठें तरी जंगलांत लपवतो. नंतर

वाऱ्यास तें गवसून आणण्यास सांगतो. वारें ताटकळ ज्या ठिकाणीं कोंबडें लपून ठेवलें असेल त्या ठिकाणीं जातें आणि कोंबडें घेऊन येतें. आल्यावर कोंबडयाची मान लवणींत धरून कापतात.

ह्या वाऱ्यास अजगऱ्याच्या मण्याची माळ हवी असते. आणि एक तागाचा कडाखा असावा लागतो. ह्या वस्तूंनीं तें स्वतःचें अंग मऱ्या आईच्या भगताप्रमाणें सडकतात.

**जन्मविधि**:——मूल जन्माला आल्यावर त्याची नाळ तीक्ष्ण बोरूच्या साहाय्यानें कापतात. ह्या कांबीस ' करसोट ' असें म्हणतात. मूल पांच दिवसांचें होईपर्यंत त्याच्याजवळ कोणतेंहि लोखंड न्यावयाचें नसतें.

**झोळी बांधणें**:——झोळी बांधण्याचा एक विधि असतो. सोयारीन घरांत दोन खांब रोवते. नंतर त्या खांबांना धोतराची झोळी बांधते. झोळी-खालीं सुपांत तांदूळ ठेवतात. तांदळावर तांदळाच्याच पिठाचा दिवा ठेवतात. दिवा पेटवतात. नंतर एका बाजूनें आई आणि एका बाजूनें सोयारीन होऊन मूल चार पांच वेळां झोळीच्या खालून वरून घेऊन फिरवतात. ह्या वेळेस झोळी पैशानें वाजवतात. नंतर सुईणीच्या हस्तें मूल झोळींत निजविलें जातें. ह्या वेळेस भिंतीवर सटवाईची व पाळण्याची आकृति काढलेली असते. असें करीत असतांना सोयारीन खालील गाणें म्हणते——

सरकारा दरबारा बिह जा नको ।
पाटील कारभाऱ्या बिह जा नको ।
रानीच्या सावजा बिह जा नको ।
सहराच्या मांज्या बिह जा नको ।
आसनी[1] वहाटला[2] त पळून जा ।
बापानें-वहाटला त धांवूनच ये ।।*

**पंचमी**:——मुलगी असेल तर चौथ्या दिवशीं पांचवी करतात. आणि मुलगा असेल तर पांचव्या दिवशीं पांचवी साजरी करतात. सोयारीन हीच बाळंत करणारी असते. हा एक आनंदाचा विधि मानला जातो. ज्याच्या त्याच्या ऐपतीप्रमाणें आणि खर्च करण्याची कुवत असेल त्याप्रमाणें खर्च करतात आणि जेवण घालतात. आपल्या कडच्या बारशाप्रमाणेंच हा विधि असतो.

१. आई. २. बोलावणें. *( निवेदक—राधा धोडी. )

मुलाचें नांव ह्याच वेळेस ठेवतात. मुलाचें नांव जन्मावरून ठेवलें जातें; उदा०—एखाद्या बुधवारीं जन्मला असेल तर त्याचें नांव बुध्या; चैत्रांतील चैत्या; श्रावणांतील सर्वण्या किंवा सर्वानी. तसेंच वड, पिंपळ, अशीं देखील मुलांचीं नांवें ठेवलीं जातात.

**लग्न**:—लग्न जवळ जवळ पांच दिवसांचें असतें. पहिल्या दिवशीं हळद लावण्याचा कार्यक्रम असतो. दुसऱ्या दिवशीं सर्वांची सभा असते. तींत परस्पर कामें वांटून दिलीं जातात. तिसरा दिवस तेलवणाचा. चौथ्या दिवशीं नवरा नवरीच्या घरास जातो. त्याच दिवशीं लग्न लावलें जातें. पांचव्या दिवशीं नवरा नवरीस घेऊन येतो. आणि सहाव्या दिवशीं वरात असते. त्याच दिवशीं हळद धुऊन टाकली जाते आणि नवरी परत माहेरा येते. यास मुळवटी असें म्हणतात.

**मांडव**:—मांडव घालण्याचा एक विशिष्ट कार्यक्रम असतो. गांवांतील तरुण लोक, कलवऱ्या आणि धवलेरी उंबर तोडावयास जातात. उंबरास ते फार पवित्र मानतात. जातांना धवलेरी खालील गाणें म्हणते—

नारनदेव आला हो.
निघुन गेला हो धवलेरीचे दारीं
याये हो बाहेर निघ जो
कां रं देवा कामारं पडली ?
माला पडली हो लगिनाची कात्रा
माला पडली कात्रा उंबराची
दिल्हा देवाचें हातीं उंबराची बिया हो
देवा न बिया पेरली हो
ये मेघा गराडली हो
ये पानी वसुन येथ हो
ये बी रुझली हो
उंबराला डिरा रं फुटली
उंबराला एक पान हो
दोन पानं आलीं हो

आंर पानं हो आली
फांद्या रं फुटल्या रं
एक फूट राक्षी[1] दमणी[2] गेली
दुसरी फूट उगवत[3] मावलत[4] गेली
तिसरी फूट देवादारीं गेली
ये उंबर कोणाच्या लगनाचा
हे उंबरा मांगण आला हो.

यानंतर कलोऱ्या, वाजंत्री, धवलेरी, नवऱ्याचा वा नवरीचा मामा आणि मामी उंबऱ्यास न्यावयास येतात. मामा झाडावर जाऊन फांदी तोडतो. मामी खालीं झेलावयास सावध असते. नंतर कलोऱ्या वाहून नेतात. त्यांना मदत करण्यास इतर जन असतातच. उंबरास तोडावयास येतात, त्या वेळेस उंबर रडूं लागतो.

ये उंबर परंद कोणाच्या लगिनाचा
ये उंबर देवाच्या लगिनाचा
ये उंबर रडे सोन्याच्ये असवानें.

( निवेदक–राधा धोडी )

मांडवाला नऊ मेढी असतात. एक मध्यभागीं असते. ती उंबराची असते. ती मामानें रोवायची असते आणि तीस नवऱ्या मुलाचा हात लावलेला असावा लागतो नंतर ह्या मेढीस तेल लावलें जातें. पांच सवासणी ह्या उंबराच्या मेढीस पुजतात. आंब्याच्या पानांचीं तोरणें मेढीस बांधलीं जातात. मेढीखालीं नारळ, सुपारी व पैसा पुरावयाचा असतो.

**हळद लावणें**:——प्रथम एक दाह्या बायकोचें जोडपें येतें. तें हळद कालवतात. हळद पतीनें कालवावयाची असते. पत्नीनें फक्त त्याच्या भुजांना हात लावावयाचा असतो. नंतर पति हळदीनें बोटें भरवून नवऱ्याच्या पायापासून सुरुवात करून डोक्यास नेऊन भिडवतो. अशीं पांच जोडपीं हळद लावतात व मग नंतर कोणीतरी चवथ्या दिवशीं नवरा नवरीच्या गांवास जातो. तो गांवाच्या बाहेरच थांबतो. त्याला एक रात्र तेथें जागत काढावी लागते. पुरोहित व धवलेरी आगामींच सर्व तयारी करण्या-

१. दक्षिण. २. उत्तर. ३. पूर्व. ४. पश्चिम.

साठीं नवरीकडे जातात. नंतर नवरा नवरी मांडवांत आणलीं जातात. परस्परांचे मामे त्यांच्या पाठीशीं असतात. धवलेरी व पुरोहित मंगल म्हणतात व लग्न लावलें जातें. नंतर जेवणें खावणें होतात. दुसऱ्या दिवशीं नवरा नवरीस घेऊन निघतो. त्या वेळीं नवरीचा चुलता नवरीच्या कानाशीं मोठ्यानें ओरडून सांगतो, "आथा आमी तुला इकलं हाये. आथा तूं नवऱ्याच्या घरीं जाये.. आनंदानं राहे. आमच्यांत राहूं नको." ह्या वेळेस नवरीची आई बाप व इतर इष्ट गणगोत रडत असतात. मग वऱ्हाडक्या त्यांची मोठ्या कुशलतेनें समजूत घालतो आणि दोन्ही बाजूंच्या लोकांना प्रेमानें नांदण्यास सांगतो. वऱ्हाडक्याचीं वाक्यें अशा प्रकारचीं असतात--

"आंबा पडल त चिच धरल, चिच पडल त आंबा धरल."

सणाच्या वेळेस स्त्रिया आणि पुरुष एकत्र नाचतात. पुरुषांप्रमाणें स्त्रिया देखील नाचत असतांना गाणें म्हणतात.

कांहीं वेळेस एका बाजूला स्त्रिया आणि दुसऱ्या बाजूला पुरुष असे दोन गट करतात आणि मग प्रश्नोत्तरांच्या साहाय्यानें गाणें गातात व खूप नाचतात.

**पोषाख**:--स्त्रिया आपल्या केशभारांत फुलें खोवतात. घरांत पुष्पाच्या माळा अडकवतात. दाराच्या दोन्ही अंगांस आपल्या कडच्या वेणीप्रमाणें फुलांचा गजरा करून तो चौकटीच्यापासून अर्धा फूट अंतरावर दोन्ही बाजूंस लटकावतात. सर्वसाधारण स्त्रिया डोक्यावर पदर घेतात. मात्र तो मारवाडी पद्धतीचा उजव्या खांद्यावरून असतो. खालीं लुगडें कमरेभोंवतीं तंग असतें. अगदींच गरीब स्त्रिया फक्त लुगड्याच्या थोड्याशा घड्या आपल्याकडील पहिलवानाच्या जांग्याप्रमाणें भक्कम नेसतात, आणि चोळी घालतात. वर डोकें उघडेंच असतें. हा जांग्या नेसण्याची एक विशिष्ट पद्धत असते.

स्त्रियांना दागिने घालण्याचा मोठा नाद आहे. दागिने मात्र साधेच असतात. काळे, पांढरे, तांबडे असे मोठाले पोतीचे मणी माळेंत गुंफतात व त्या माळा त्या घालतात. कानांत रुप्याचे दागिने असतात. हातांत मनगट भरून कोपरबरसाच्या बांगड्या असतात. क्वचित् लोखंडाच्या देखील असतात.

**नाच:**—आदिवासी म्हटला म्हणजे त्याच्या जीवनांतील मोठ्यांत मोठा आनंद म्हणजे नाच होय. कोणत्याहि प्रसंगीं आदिवासी नाचतात. नाचासाठीं ढोल तारपा ह्यांची अवश्यकता असते. तेव्हां प्रत्येक पाड्यावर आपणांला ढोल व तारपा हा प्रथम पाहावयास मिळेल.

संध्याकाळीं सर्व कामें आटोपलीं म्हणजे जेवणें होतात. जेवणें झाल्यानंतर सर्वजण पटांगणावर जमतात आणि नाचास सुरुवात होते. कांहीं विनोदी पात्रें देखील असतात. कांहीं प्रसंगीं दोन बाजू पडतात आणि ह्या बाजूचा नाच झाला कीं त्या बाजूचा नाच; ह्या बाजूचें गाणें झालें कीं, मग विरुद्ध बाजूचें भाषण होतें. ह्या भाषणास ते 'सबादणी' असें म्हणतात. कांहीं प्रसंगीं रावण, कुंभकर्ण, अग्यावेताळ, देवी ह्यांचे बोहाडे नाचविले जातात.

**नाचाचे प्रकार**—

(१) तारपा—तारपा हें एक पुंगीच्या आकाराचें वाद्य असतें. एक भोपळा असतो. त्याच्या एका बाजूस दोन नळ्या (बांबूंच्या) असतात. त्या आपल्या पाव्याप्रमाणें असतात आणि दुसऱ्या बाजूस भोंगा असतो. हा भोंगा माडाच्या झावळ्यांपासून तयार करतात. हें तारपें एक जण वाजवतो व स्त्रिया आणि पुरुष घेर धरून एकत्र नाचतात.

(२) माधळावरचा नाच—हा नाच वैयक्तिक असतो. एकाची पाळी झाली कीं दुसरा, असें पाळीपाळीनें नाचतात. कांहीं वेळेस दोघे देखील नाचतात. ह्याला वाद्य म्हणून ढोलकीच्या आकाराचें एक वाद्य असतें.

(३) काठ्यावरचा नाच—प्रथम सर्वजण खालीं बसून गाणें म्हणतात. ह्या गाण्याचे देखील प्रकार पाडलेले असतात. काठ्यावरचें गाणें, ढोलावरचें गाणें, माधळाचें गाणें, तारप्याचें गाणें इ., गाणें झाल्यानंतर इगुत (गंमत म्हणून) एक मनुष्य उभा राहतो. आणि नकलेचें आडवें तिडवें गाणें गातो व सबादणी (भाषण) करतो आणि खूप नाचतो. बाकीचे त्याला साथ देतात.

(४) ढोलावरचा नाच—ह्या नाचांत मुख्यत: बोहाडे नाचवतात. सर्व बोहाडे एकदम नाचवीत नाहींत. त्याचे तीन भाग करतात.

पहिल्या दिवशीं साधीं साधीं सोंगें नाचवलीं जातात. फक्त येताळदेवी, रावण ह्यांसारखीं सोंगें तिसऱ्या दिवसासाठीं ठेवतात आणि तिसऱ्या दिवशीं योग्य सजावट करून सर्व सोंगें नाचवलीं जातात. हीं गंमत पाहण्यासाठीं बाहेर गांवचे लोक देखील येतात.

धांगळी वाद्य——दोन भोपळे असतात. त्यांच्या एका बाजूच्या टोंकास एक वेळूची वांकड्या बोंडाची काठी बांधतात. ह्या काठीला विण्याच्या खुंट्याप्रमाणें दोन खुंट्या असतात आणि वांकडें टोक व ह्या खुंट्या यांना तारा बांधतात. हे दोन्ही भोपळे बगलेस धरून व छातीपुढें असलेल्या आडव्या तारा दोन्ही हातांनीं छेडतात व गाणें गातात. हें वाद्य आनंदप्रसंगीं वाजवतात. उदा.——मुलगा झाला, मळ्यांत अमाप धान्याची रास पडली आहे, एखाद्या व्यवसायांत चांगलें यश आलें, अशा प्रसंगीं धांगळी वाजवतात.

डाक——आपल्याकडील आठव्याच्या आकाराचें हें वाद्य असतें. आपण त्यास डमरू म्हणतों. ह्याचीं पृष्ठें गाईच्या श्वासपटलाचीं केलेलीं असतात. ह्या आंतड्यास खोरा असें म्हणतात. हें वाद्य हिरवा देव उजळ-ण्याच्या वेळेस व वर्षश्राद्ध करण्याच्या वेळेस वाजवतात. तसेंच एखाद्याच्या अंगांत आणावयाचें असल्यास ह्याचा उपयोग करतात. हें घोट्याजवळ बांधून वाजवतात.

## कांहीं विधि——

काज——आपल्याकडे ज्याप्रमाणें वडील माणसाचें वर्षश्राद्ध घालतात, त्याप्रमाणेंच हा काजाचा प्रकार आहे. प्रथम शेतांत भगताच्या हस्तें मांडव घालतात. नंतर ह्या मांडवांत तांदळाचे ढीग छोटे छोटे असे पांच, सहा करतात. नंतर सर्वजण ओढ्यावर जातात. तिकडून चार पांच मडकीं पाण्यानें भरून आणतात. नंतर मांडवांत केलेल्या तांदळाच्या ढिगावर हीं मडकीं ठेवतात. बाजूला नारळ, नागिलीचीं पानें, हळद कुंकू ठेवलेलें असतें. येथें बरेचसे भगत आणि त्या भगताचे वीर आलेले असतात. हे वीर लांबून नाचत येतात. नंतर मडक्याजवळ गुडघे टेकून बसतात. केसांचा भांग पाडतात आणि ह्या भागांत हातांतील तरवारीनें वार करतात. नंतर रक्ताच्या धारा त्या मडक्यांत सोडतात. थोडक्याच वेळांत भगत त्या वीरांना बरे करतो. कांहीं भगत हटवाद देखील करतात.

पान वाहणें---आपले वाडवडील संतुष्ट ठेवण्यासाठीं आदिवासी लोक आपल्या वाडवडिलांना प्रत्येक सणास एक विशिष्ट प्रकारचा नैवेद्य दाखवतात. सर्व प्रकारचें धान्य एकत्र शिजवतात. नंतर सर्व प्रकारच्या भाज्या तयार करतात. हे शिजविलेले पदार्थ सुपांत भरतात. त्यावर तूप, दूध, तेल ओततात आणि हें सूप घरावर ठेवतात. त्यास कावळे खातात. समजा कावळे जर शिवले नाहींत तर वडील संतुष्ट नाहींत असें समजावें. मग भगताकडे गाऱ्हाणें लावावें लागतें. ह्यास पान करणें वा वाहणें, असें म्हणतात.

हिरवा उजळणें ( गोंधळ घालणें )---आपल्या पाठीशीं कोणतेंच गंडान्तर येऊं नये म्हणून मधून मधून हा विधि करावा लागतो. एका कढईंत तेल घेतात; त्यास जाळ लावतात. कढईंत देव टाकतात. नंतर तेलाला उकळी आल्यानंतर भगत हात घालून आंतील देव काढतो. नंतर जेवणाचा कार्यक्रम होतो. जेवणास बकरें व दारू ठरलेली. ह्या वेळेस धांगळा वाजवतात. महादेव कोळी यांना कमी लेखतात. हे शेंकडा ४० भटके आहेत. कातकरी ह्यांच्याप्रमाणेंच आणि वारली व म. कोळी स्थिर आहेत. ते शेती करतात आणि जनावरें पाळतात.



## १ वारली कथा

( वारली भाषेंत )

संग्राहिका : **सौ. प्रभा परुळेकर**

वाघेला जनला. ओसराविऱ्या खन, गर्भाऱ्या डोंगराला. आईस जाय व्हळावर पान्याला, बासन घेन, कापड घेन. तव त झाडाला झोली कर बालाची. बाल निज ती पान्याला जाय. आस जाय तंव वाल झोलींतून बाहीर पड, आन जाय उंडारायला. कोंबडी खाय बकरी खाय. गोजरू भेटल तंव त गोजरू पन धरून खाय. आईस येय. नाय तंव त येन झोलींत निसूर निज.

गांववाल्यांनीं बोंब केली. कोन धर आमची कोंबडी ना बकरी. तंव त्यांनीं टप लावला. वाघेला येय आन कोंबडी चाव. कोंबडा टाक केला तंव त तयशी पलला ना बकरीला घास भरला, बकरा टाक केला तव त तथशी जाय आन गांजरू धर.

गांववाल्यांनीं वाघेलाच्या आसला गाऱ्हाना क्येला आस त सांग ' माजा बाल आजुक मेढ्यान पन जाय नाय. '

तंव त गांववाल्या झोलींत नांगत. वाघेल्याचा तोंड त रगत भरेला. आस सांग ' हा काय माझे पोटीं पिकला ! ' तंव त गांववाल ठेमक घेत झोंबाट करत.

वाघेला पलला. तंव त्यांत चार वस्त्या करेल आहा. अथ त्याची एखाद वस्ती. तंव त अथच वडलांनीं देऊल केला. अथशी तो पार डोंगराला पलला.

ते वेला वाघयाचा उजागरा पाडला. मंडळी रानांत जाय. वाघेळाच्या ठावाला. भजनाचा ताल इथेल. एक मानूस पोराला घेन गेलता. पोराला त नीज येय. मानूस त भजनांत पडेल.भजन पुराटला तशी नींजेचा घराशीं निघून इथेल. पोर तंव त रानांतच नीजेल. बायलस रड. एखला रानांत जाया तव त भ्या लाग. ' वाघराच्या तोंडांत माझा बाल दिला. ' बायलस त छाती कुट.

तंव त पानी इथेल. हीं वायधुल सुटेल. आता त सांग ग्येलाच पोर हातचा.

दिसान गोंडा घालला ना निंघली मंडली. रानांत जान पायत त बाल निंजेल. बाल धीला वेंगेंत ना मंडली सांगत, ' पांखुर दोवा. '

## २ शिकलेलें पोर

### संग्राहक : उ. ब. विटेकर

[ खेड्यांतील एक वारली जातीचा मुलगा जरा शिकला म्हणून तो दुसऱ्याच मोठ्या गांवीं गेला. तेथून परत आल्यावर जेव्हां त्याला प्रथम आई भेटते त्या वेळीं त्यांमध्यें खालील बोलाचाल झाली. अशाच प्रकारची

बोलाचाल शिकलेला मुलगा प्रथम आईस भेटल्यावर करावी ही वारली लोकांत प्रथा पडली आहे. ]

त्यानं गर्दींत इचारलं, " चांगूनाबाई इठं आहेत का ? "

त्याच्या आईनं पाहिलं व म्हणाली, " अहं आबासारखा दिसतुया आणा. खादीनी टोपी, पानरं चांगलं कपडं त्यालं इकलं चांगलं कुठून मिळल्याती ? "

आबा आईजवळ गेला व म्हणाला, " आई ! " त्याची आई पुन्हां म्हणाली, " मी मनतों आतां कचा जातोय नी कवा नाय. "

आईच्या मागेंच लग्नातरच्या घालून एका घमेल्यांत बरेंत घटखटे गोळा करून डोक्यावर घेऊन धाकटी बहीन आतीऽती म्हणते, " आयाव हाये बघ भात, बाजी काय काय तरी हाय ? "

त्यावर आबा म्हणाला, " ही ऐशी का ? "

त्यावर चांगुणाबाई म्हणाली, " हां तूं ग्येलाल तवा चालत बी नवती. "

आबा म्हणाला, " ही धुतली तर किती छान दिसल ? "

आई म्हणाली, " हां चालत व्हती कीं लई तुरतुर, वळखलंस का ग ? आबा आबा करीत व्हतीस ना ? "

डोक्यावरील तने त्यावील अन्न खायास कावळे येत जात व्हते तेव्हां त्यांना हांकचसाठी बहीन येशी म्हणते, " हात मेल्यानं हाय तरी काम कितीदा हांकाव तरी पुना हाया ? "

तितक्यांत आईचा हात लागून सर्व खरगटें अन्न खिदळत खालीं पडलें व आई म्हणाली, "हा रांड, हात मोडलं का काय तरी ?"

त्यावर येशी म्हणाली, "तूंच तर ढकाललं अन् माहा मारतीया ?" येशीनं रस्यांतलं अन्न भराया सुरुवात क्येली तवा आईला मनली, " आई, जाले घेतरा ते अन्न."

त्यावर आई म्हणाली, " अं म्हंजे ? इतकं अन्न इठं टाकायचं व्हय ? "

मंग आईनं दुपारीं तेंच अन्न खालं पन् आबानं खालं नाई. राती

आईनं मडक्यांत तांदळ शिजवीलं तातच येक उशीर शिजला पग तसाच त्यो घोंगडीया भात वतून ठेवला तव्हावी आबा जेवला नाहीं. तेव्हां आई म्हटली,

" येडा, धूळ, घान, जहर हवा नाय अमासारख्यास्नी नाय "

" वस्तीतं ताडीमाडी पिऊन वडबड करायची मर्दाची सुद घेली कीं बाईमानसाची पन्. एहा आमचा जात ताडीमाडी देवाया वाहायची नी करायची चोरी. नरकांत होवा कुठल्या जगांत आनून सोलडस् हे माला चिकळ, किळस बिह्यात्यापना. मी जातों रात पळून. जाऊं का ? "
असें आबा म्हनला.

मंग आई म्हनली,

" पन आबा कुठं पळशील हें तर त्वाह घर. "

( निवेदक : बाबूरावजी )

## कांहीं गाणीं

### संग्राहक : श्री. वासुदेव बळवंत कार्णिक

( १ ) वारल्याच्या पोरी तूं खाल्लीस ग चूनेरी पान ।
पोरी खाल्लीस ग चूनेरी पान ।
चुन्याची मळमळी जिव कसा तळमळी पान खातांना ।
ग हो रंगला । कोकणाच्या[१] पोरी तूं ।
खार्साल ग चूनेरी पान ॥

( २ ) शिपाय मारी बंदुक सायबाय[२] किल्ला लढ ।
लढलढ महराज जव्हारचा किल्ला लढ ।
शिपाय मारी बंदुक सायबाय किल्ला लढ ।
लढलढ महराज डहाणूचा किल्ला लढ ॥

लग्नाचीं गाणीं

( १ ) बामून बसला पारावरी वरी जी ।
ऊठ बामना आंगुळीला जी ।
आंगुळी करतां देखला मासा ।

---

१ कोकणे : ठाणें जिल्ह्यांतील एक आदिवासी जमात. २ साहेबाचा.

बामून म्हणं मी मारूं कसा ।
घे फासा मार मासा ।
बामून म्हणं मी रांदूं कसा
घाल पानी धर रस्सा ।
बामून म्हणं मी जेवूं कसा ।
घाल मेंटा वरप रस्सा
बामून फुगला दोडका[१] जसा ।
बामून म्हणं मी उठूं कसा ।
घे काठी ऊठ जसा तसा ॥

( २ ) चिबोटेचा पान वो पान वो ये ।
त्यावर वाढलं धान वो धान वो ये ।
आम्ही नाहीं आलों तुमच्या धानाला धानाला ये ।
आम्ही आलों नोवरीच्या मानाला ये ॥

( ३ ) तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचें वऱ्हाडी आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचे तुरी[२] आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचे सवासनी आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचा घोडक्या आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याची आई आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडेमाळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचे बाबा आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडे माळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याचा मामा आम्हांला दावा आम्हांला दावा ।
तांबडे माळी वाजेला पावा वाजेला पावा ।
नवऱ्याची मामी आम्हांला दावा आम्हांला पावा ।

---

१ बेडूक. २ वाजंत्री.

☆ ☆ ☆

# गावड समाज

[ यांची वस्ती कोंकणांतली. गोव्यांतहि बरेच आहेत. गावड्यांना मीठ गावडे असेंहि म्हणतात; कारण यांचा मूळचा धंदा मीठ पिकविण्याचा. आतां हे बहुधा शेती व मजुरी करतात.

यांच्यांत वत्स, भारद्वाज व काश्यप अशीं तीन गोत्रें आढळतात. काश्यप गोत्रांत मात्र सगोत्र विवाह होतो. आते व मामे-बहिणीशीं लग्न करतां येतें. यांचे आचार भंडाऱ्यासारखेच असतात.--संपादक ]

## गोव्यांतील गावडे

संग्राहक : **पं. महादेवशास्त्री जोशी**

### विवाहाचें मंगलाचरण

दांतीं मांडून । तीळ तांदूळ शेस् या
दांत्यालागीं बोस्या । दुर्गेमाये
पांच पानांचा इडो । घेगा हातीं बोटा
आदी मान व्हडल्या । पुरुसा देवा
आंब्याचो ताळो । फुलांचो झेलो
आदीं मान केलो । गुरुदेवा
आंबे पोणोस मारागे । घड्या कदेलां
देवां बसया । माना तेंच्या
येयलो वडील देव । येतां देखलां
दांडीं तेंकलां । देरां दरवंट्यां
येयलो भूतनाथ । उबो रावलो मार्गार
हातीं धरून हाडगा । यजमान्या तेकां
येयलो नारायण देव । ओणखलो देरां
मानवलो घरा । यजमान्याच्या
येयली लक्षुमा । उबी रावली वाटेर
चल बेगीन भेटे । यजमान्नी
येयली म्हाळसामाया । ओणखली मुड्यां

मानवली चुडयां । होंकले तुझ्या
थेयलो वेताळ देव । उबो रावला मार्गार
हातीं धरून हाडूंया । यजमान्या
नेणतो गा यजमानी । कार्या आरंभिलां
व्हडल्या देवान् । तेचां सिद्ध केलां
नाछ हातीं घेवन । यजमान भायर सछा
व्हडल्या देवान । तेकां म्हूर्त दिला.



# आदिवासी कला

लेखक : **श्री. रा. पोतदार**

खानदेशांतील नंदुरबार व तळोदें तालुक्यांत भिल्लांच्या चार प्रमुख जाती आहेत. त्यांचीं नांवें : ( १ ) वळवी, ( २ ) पाडवी, ( ३ ) नाईक, व ( ४ ) वसावे. वास्तविक पाहतां हे सर्व लोक सातपुड्यांतूनच खालीं दाक्षिणेंत सरकले आहेत. पूर्वीं त्यांची वस्ती सातपुड्यांतील जंगलांतच असावी, कारण अजून तेथें त्यांची वस्ती आढळून येते. सातपुड्यांतील पावरे लोकां-प्रमाणें भिल्लांची दिवाळी मार्गशीर्ष महिन्यात असते व प्रत्येक गांवची दिवाळी वेगवेगळ्या दिवशीं साजरी करतात. नृत्यप्रसंगीं पुरुषांची रांग व स्त्रियांची रांग वेगवेगळी असते. माणसाच्या मृत्युप्रसंगीं हे भिल्ल नृत्य करतात. त्या वेळीं नृत्यांचे हावभाव व वाद्यांचे स्वर शोकमय असतात.

' पांढरदेव ' व ' हिंवाऱ्या देव ' या भिल्लांच्या दोन देवता होत. पांढरदेवीची मूर्ति मातीची असते. देवळाच्या घुमटासारखा आकार व पुढच्या बाजूला दोन बैलांचीं त्यावर तोंडें असे पांढर देवीचें स्वरूप असतें. ह्या देवीला शेताच्या झाडाखालीं बसवितात. सातपुड्यांतील चौथें शिखर ' देवमोगरा ' असून तें भिल्लांचें तीर्थक्षेत्र आहे. इंदल देवी असेंहि त्या देवीस ते म्हणतात. पांढरदेव ही देवमोगऱ्याची मुलगी व हिंवाऱ्या देव हा तिचा भाऊ होय. ह्या लोकांत अशी समजूत आहे कीं, जे लोक देवीची मनापासून पूजा करतात त्यांच्या स्वप्नांत ती देवी येते. देवी त्या वेळेस

सांगते कीं, तूं आतां यात्रेला जाऊं नकोस. तुला पूजा करावयाची असल्यास तूं माझ्या मूर्तीची पूजा कर. ह्या देवीच्या नांवानें भिल्ल लोक 'गिंगदेव' म्हणून एक सण साजरा करतात. सणाच्या अगोदर घरांतील प्रमुख पुरुष आठ दिवस शेतांत राहून स्वतःच स्वयंपाक करून खातो. त्या काळांत तो कोणासहि वाईट बोलत नाहीं. तसेंच त्या काळांत त्यानें स्त्रीला स्पर्श करावयाचा नसतो. शेतांतील धान्य खावयाचें असल्यास तें प्रथम देवाजवळ ठेवतात. त्या धान्याच्या राशीवर गोमूत्र शिंपून व नारळ वगैरे फोडून पूजा करतात.

हिंवाऱ्या देवाची मूर्ति मातीचीच असते. ती बैलाच्या शिंगासारखी असते व टोंकावर बैलाचें तोंड बसविलेलें असतें. भिल्लांच्या भाषेंत हिंव म्हणजे सीमा असा अर्थ आहे. ह्या देवाला गांवच्या सीमेचें रक्षण करण्यासाठीं सीमेवर ठेवतात. असें केल्यानें शेतांत रात्रीच्या वेळीं चोर किंवा लुटारू सीमा ओलांडून येऊं शकत नाहीत. हिंवाऱ्या देव गांवाचें व पिकांचें रक्षण करतो. त्याची पूजा केल्यानें रोगराई होत नाहीं अशी त्यांची समजूत आहे. हिंवाऱ्या देव म्हणजे ह्या भिल्लांच्या समजुतीप्रमाणें ब्रह्मदेव होय. त्याचा नवस फेडण्याच्या वेळीं ते नाचत जाऊन त्याच्यापुढें बकऱ्याचा बळी देतात. त्याची पूजा करतात. 'बेर्ना हेजा' हीं श्रीकृष्णाला व अर्जुनाला उद्देशून नांवें आहेत. त्यांसहि ते देव मानतात.

**लाकडावरील कला**—सातपुड्यांतील सर्व आदिवासींत पावरे लोक स्वतःला श्रेष्ठ समजतात. कलांच्या दृष्टीनें विचार केला तर भिल्लांपेक्षां पावरे लोकांत त्यांचा वापर जास्त आहे व ती तयार करणारे कांहीं कारागीरहि त्यांच्यांत आहेत. देवादिकांच्या मूर्ति दगडांत कोरण्याची त्यांची पद्धत नाहीं. वाघोबा किंवा वाघदेव हा दगडांच्या गोट्यांना शेंदूर लावून पूजतात. राजा फाण्टा व गाण्डा ठाकूर यांची लाकडाची मूर्ति माझ्या पाहण्यांत आली. ते घोड्यावर बसले आहेत अशी ती लाकडाची अखंड मूर्ति असून, एकाच लाकडांतून कोरण्यांत आली आहे. तसेंच देवादिकांचे पंचवीस प्रकारचे मुखवटे माझ्या पाहण्यांत आले. हे मुखवटे 'बोंडा' नाच करणारे लोकांच्या जवळ आहेत. ह्यांच लोकांत पूर्वी लाकडावर कोरीव काम करणारा एक कारागीर होऊन गेला. त्यानें हें सर्व कोरीव काम केल्याचें



पात्वरी आदिवासींचीं भांडीं, वाद्य (शिंग) व पाली किंवा धारिया नांवाचें हत्यार.











पावरी आदिवासींचे दागिने

समजलें. तो कारागीर मेल्यावर त्याचें स्मारक म्हणून एका लाकडाच्या मोठ्या ठोकळ्यावर माणसाचें तोंड कोरलेलें आहे असा जमिनींत बसविण्यांत आला. ह्या कारागिरानें शिष्यपरंपरा निर्माण केली नाहीं. लाकडाचीं घरें व शेतीसाठीं लाकडी नांगर हें प्रत्येक शेतकरी स्वतःच करीत असतो. घरें बांधतांना लोखंडाचा किंवा खिळयांचा मुळींच उपयोग करीत नाहींत. लाकडांच्या नैसर्गिक खांचावर तुळया ठेवण्याची पद्धत व बांबूचे तट्टे व त्यांचें विणकाम वाखाणण्यासारखें आहे. लाकूड मुबलक मिळूनहि ते त्याचा गरजेपेक्षां किंचितहि जास्त उपयोग करीत नाहींत.

**वापरण्याचीं भांडीं** पावरे लोकांच्या स्त्रिया मातीचीं भांडीं स्वतःच तयार करतात. पाण्याचा माठ, कटोरे व लहानसहान मातीच्या थाळ्या ते नदीच्या कांठीं मिळणाऱ्या मातीपासून तयार करतात. त्यांना भाजून त्या वस्तु पक्क्या करतात. तांब्यापितळेचीं भांडीं ते मुळीं वापरीत नाहींत. दुधी भोपळ्याचा एक प्रकार आहे. ह्या दुध्या पावसाळ्यांत पुष्कळच तयार होतात. त्या वाळवून ते जमवून ठेवतात. ह्या दुध्यांना मोठे मजेदार आकार असतात व त्यापासून पाणी भरावयाची बाटली, दुधाची चरवी, पाणी घेण्यासाठीं तांब्या, हुक्का, वाद्यें इत्यादि पुष्कळच प्रकार करतात. दुधीचा हुक्का पाहून खूपच करमणूक होते. गाईम्हशींचें दूध हे आदिवासी दुधीच्या चरवींत काढतात. इतर भांड्यांत ते कधींहि दुधाची धार काढणार नाहींत. तेल, तूप वगैरेसारख्या वस्तूंसाठीं दुधींना पोकळ करून त्या बाटल्या सारख्या वापरतात. अलीकडे कांहीं आदिवासी पाहु-ण्यांसाठीं धातूंचीं भांडीं वापरूं लागले आहेत.

**शृंगार कला**—पावरे स्त्रिया हातांवर व तोंडावरील हनुवटीवर गोंदून घेतात. लग्नप्रसंगीं ते हातांपायांना मेंदी लावतात. स्त्रियांना दागि-न्यांची फार हौस असते. चांदीचे दागिने वापरणें हें सुखवस्तुपणाचें लक्षण आहे. अगदीं साधारण आदिवासी स्त्रिया बाजारांतून कांचेचे मणी विकत आणून ते रेशमांत गोठून गळ्यांत घालतात. डोक्यावरून पदर घेण्याची पद्धत असल्यामुळें केसांना कित्येक दिवस तेल नसलें तरी चालतें. साधारण-पणें केसांना एकच आंबाडा घालण्याची पद्धत आहे. केस विंचरण्यासाठीं कांहीं आदिवासी स्त्रिया स्वतःच फण्या तयार करतात किंवा पूर्वीच्या जुन्या

पितळी फण्या कांहीं स्त्रिया वापरतात. कपाळावर कुंकू लावणें व पान खाऊन ओठ लाल करण्याचा प्रघात ह्या आदिवासी स्त्रियांत आहे. लग्नप्रसंगी किंवा नृत्य व सणांच्या वेळीं स्त्रिया उत्तम उत्तम वस्त्रें नेसून चांदीचे व मण्यांचे अलंकार घालून शृंगार करतात. असें सांगतात कीं पूर्वीं ह्या आदिवासी स्त्रिया चोळ्या घालीत नसत. परंतु आतां मात्र सर्वत्र पोलकें घालण्याचा प्रघात आहे.

**दागिने**—आदिवासी स्त्रियांचे दागिने मुख्यतः चांदीचेच असतात. कर्णभूषणें, सरी, वाक्या, वेल्या, कडे, तोडे, पैंजण, नथ हे त्यांचे अलंकार होत. दागिन्यांचे कांहीं नमुने आज महाराष्ट्रांत वापरण्यांत येतात तसे आहेत. ते तयार करणारे सोनार आदिवासींच्या गरजा ओळखून त्यांना आवडणारे असे कांहीं दागिने करतात. रुपयांचा हार हा आदिवासींचा आवडता दागिना आहे. एका आदिवासी पाटलाच्या स्त्रीचे दागिने मला दाखविण्यांत आले. त्या सर्वांचें वजन एकूण सातशें तोळे होतें. पैंजण हा दागिना राजस्तानी घडणीचा दिसला. कानांत घालतात तो 'ओंकरें' हा दागिना म्हणजे कर्णभूषण. आजहि गुजरात व राजस्तानांतील आदिवासी स्त्रिया वापरीत असतात. कांहीं पुरुष कानांत चांदीच्या साखळ्या घालतात.

**वाद्यें**—निसर्गतःच ह्या आदिवासींना नृत्य व गाण्याची आवड आहे. नृत्यासाठीं लागणारीं वाद्यें ते स्वतःच तयार करतात. शें-दोनशें स्त्री-पुरुषांच्या सामुदायिक नृत्यासाठीं ढोलहि तितकाच मोठ्या आकाराचा असतो. पावरी भाषेंत ढोल यास तुर म्हणतात, तर नगाऱ्यास तुतडी म्हणतात. नगारा हा ढोलाच्या मानानें लहान असतो. लग्नप्रसंगीं वाद्यें वाजविणाऱ्यांना गवाल म्हणतात. ते केवळ वाद्यें वाजवून पोट भरतात. तोंडानें जें शिंग वाजवितात त्यास पावरी भाषेंत 'वीरी' व भिल्ल भाषेंत 'दिरी' म्हणतात. हरणांचें शिंग, बांबू व वाळलेली पोकळ दुधी यापासून हें वाद्य बनवितात. तें फारच मंजुळ असतें. त्याला ढोलाची साथ दिली जाते.

**हत्यारें**—तिरकामठा हें पावरे आणि भिल्ल यांचें आवडतें हत्यार आहे. धनुष्य म्हणजे कामठ्याची कमान ते बांबूपासून तयार करतात. बाणहि ते स्वतःच बनवितात. बाणांना अणकुचीदार लोखंडी टोकें ते बाजारांतून तयार घेतात. लाकडें तोडण्यासाठीं कुऱ्हाडीचा उपयोग होतो. तसाच ते कुऱ्हाडीचा उपयोग संरक्षणाचें हत्यार म्हणूनहि करतात. दुसरें एक

संरक्षणाचें हत्यार आहे. त्यास ते धारीया म्हणतात. हे धारीये विळ्यासारखे असतात. परंतु ते लांब काठीवर बसाविलेले असतात. धारीयाच्या टोंकावर मोराचें चित्र असतें. त्याची काठी कांहीं वेळां नक्षीदार केलेली असते. गांवांतील पोलीसपाटील व कारभारी हे बंदुकी बाळगतात. तरवारी किंवा भाले हे सहसा वापरीत नाहीत. धारीया ह्या हत्याराचा उपयोग भाल्यासारखाच करतात.

**कापडाचें विणकाम**—सातपुड्यांतील जे हरिजन आदिवासी गुजरातेंतून आहेत ते कापड विणण्याचा व्यवसाय करतात. पूर्वी हे आदिवासी स्वतःच सूत काढून खादी तयार करीत. अलीकडे मिलमधून तयार झालेल्या सुतापासून खादी व लंगोट्या तयार करतात. पावरे व भिल्ल हे दोघेहि लंगोटी लावतात. त्यामुळें लंगोटया तयार करण्याचा ह्या विणकरांचा एक मोठाच व्यवसाय झाला आहे. ह्या लंगोटयांचीं शेवटचीं टोंकें रंगीत सुतांनीं विणलेलीं असतात. हें विणकाम उत्कृष्ट असतें. स्त्रियांसाठीं जीं लुगडीं वापरण्यांत येतात त्यांस नाटया म्हणतात. ह्या नाटया शहाद्याचे विणकर तयार करतात.

**सोंगें घेण्याची कला**—'भंगोऱ्या' म्हणजे होळीच्या सणांत पुरुष नृत्यकार निरनिराळीं सोंगे घेतात. मोराचीं पिसें डोक्यावर, पाठीवर लावून व तोंडांना रंगवून तीं सोंगें नाचूं लागतात. राक्षसांचीं, देवादिकांचीं व वाघ-सिंहाचीं तीं सोंगें पाहिलीं म्हणजे मोठी करमणूक होते.

**जातें, पाटा व वरवंटा इत्यादि**—प्रत्येक आदिवासीच्या घरीं जातें असतें. त्यासाठीं इतरांच्या घरीं जाऊन किंवा गिरणींत धान्य दळण्याची पद्धत नाहीं. जातें स्वतः आदिवासी तयार करून घेतो. जात्याचा आकार मोठा असतो. जात्याची योजना अशी असते कीं तें पाहिजे त्याप्रमाणें हलकें किंवा जड करतां येतें. साधारणपणें आपल्याकडील दोन किंवा तीन स्त्रियांना झेंपणार नाहीं असें तें जातें आदिवासी स्त्री एकटीच फिरवूं शकते. ह्या जात्यांची योजना उत्कृष्ट आहे. पाटेवरवंटेहि ते स्वतःच तयार करतात. मिरची व मसाला तयार करण्यासाठीं पाटे व वरवंटे ही त्यांची अवश्य अशी वस्तु आहे.

☆ ☆ ☆